# प्रपंचशास्त्र.



त्र्यंबक रामचंद्र लुकतुके.

प्रकाशक,

बाबाजी सखाराम आणि कंपनी.

मुंबई,

"तत्वविवेचक" छापखान्यांत छापिलें.

सन १९०२.

# प्रस्तावना.

" प्रपंचशास्त्र " या नांवाशीं सदृश दिसणारीं पुस्तकें मराठींत आजपर्यंत तीन चार झालीं आहेत. पण त्या पुस्तकांचा उद्देश " प्रपंचशास्त्र " या पुस्तकापेक्षां फार निराळा आहे. तीं पुस्तकें तात्विक विचार व पारमार्थिक सुख या कल्पनांच्या पायावर रचिलेलीं असून, त्यांत गहन विषयांचा संग्रह केलेला आहे; पण शाळांतील मुलगे आणि मुली; आणि प्रपंचभार अंगावर वहाणाऱ्या इतर स्त्रिया यांच्याच साठीं व हरघडी ज्या गोष्टी त्यांना कराव्या लागतात, त्या गोष्टीं संबंधानें सशास्त्र व सोपी माहिती दिलेलें एखादें पुस्तक असल्यास विशेष उपयोग होईल असें वाटल्यावरून हा प्रयत्न केला आहे. तो कितपत तडीस गेला आहे हें पहाणें अर्थातच, लोकांचें काम आहे.

हिंदुस्थानांतील शाळाखात्यांत मुंबई इलाखा खेरीज करून इतर सर्वत्र ठिकाणीं Domestic Economy म्हणजे प्रपंचशास्त्र हा विषय शाळांतील अभ्यास क्रमापैकीं आहे. तसा आपल्या इलाख्यांत कां नाहीं हें जाणून घेण्याची ज्यांची इच्छा असेल, त्यांनीं आमच्या इलाख्यांतील विद्याखात्याचा मागील पंचवीस वर्षांचा इतिहास अवलोकन करावा, म्हणजे त्यांस असें दिसून येईल कीं, " चाललेल्या रहाट गाडग्यांत कांहीं फेरबदल करावयाचा नाहीं " असें मत आजपर्यंतच्या विद्याधिकाऱ्यांचें असल्यामुळें, एकवार जें ठरलें तेंच पुष्कळ वर्षें चाललें, म्हणून नवीन पुस्तकें, नवीन पद्धति व नवीन शोध यांनां आमच्या शाळाखात्यांत आश्रय मिळण्याची मोठी पंचाईत पडत असे. तो मनु आतां बदलला. अमुक अमुक गोष्टी सुरू कराव्या कीं न कराव्या असा खल तरी निदान सुरू झाला आहे

व आज ना उद्यां तरी या चळवळीचा परिणाम चांगला होईल असा अदमास आहे.

पुस्तकाचें नांव "प्रपंचशास्त्र" आहे, पण तें शास्त्र लिहिणारा एखादा विद्वान् शास्त्रज्ञ असेल, अशी जर कोणा वाचकाची कल्पना झाली, तर ती मात्र चुकीची होणार आहे. या पुस्तकांतील जेवढा शास्त्रीय भाग असेल तेवढा या विषयावरील उपलब्ध असलेल्या कित्येक पुस्तकांतून घेतलेला आहे; व जर कांहीं उपयुक्त माहिती व कल्पना असतील तर त्या आमच्या मित्रमंडळीं पैकीं, ज्यांना ज्यांना हें पुस्तक दाखविलें, त्यांच्या दुरुस्तीचें व सूचनांचें फळ आहे व ही सर्व सामुग्री एके ठिकाणीं करून पुस्तकरूपांत आणणें येवढी मात्र कामगिरी माझी आहे. ह्मणजे पुस्तकांत जर कांहीं गुणलेश असेल तर त्याचा मालक मी नसून, त्याबद्दल जे कांहीं आभार मानावयाचे ते वर लिहिलेल्या ग्रंथकारांचे व आमचे हितचिंतक मित्र यांचे मानावे व दोषां संबंधानें जबाबदारी मजकडे सोंपवावी, असें वाचकांस विनयपूर्वक सुचविणें आहे.

त्र्यंबक रामचंद्र लुक्तुके.

# प्रपंचशास्त्राची अनुक्रमणिका.



# प्रपंचशास्त्र.

## भाग पहिला.

### प्रपंचप्रारंभ.



प्रत्येक पुरुषाने किंवा प्रत्येक स्त्रीनें, प्रपंचाचा प्रारंभ केव्हां करावा, या प्रश्नाचे उत्तर देणें, फार कठिण आहे. वास्तविक विचार केला तर, मानवी प्राण्याच्या जन्मापासूनच तो प्रपंचांत गढून गेलेला असतो. प्रपंच गळ्यांत पडला, हें समजण्याची मुख्य खूण, चिंतेची उत्पत्ति. ज्याला प्रपंच आहे, त्याला चिंता ही आहेच. बरें व वाईट यांतील फरक कळणे, हेंच चिंतेचें बीज, तात्पर्य, मनुष्याला अमुक गोष्ट बरी व अमुक वाईट, असें ज्ञान उत्पन्न होऊं लागल्यापासूनच तो प्रपंच करूं लागतो, असें म्हणावें लागतें. अमुक एक वस्तु आपली व अमुक एक दुसऱ्याची, अमुक हवें, अमुक नको वगैरे, फरक उत्पन्न करणाऱ्या कल्पना मनांत उत्पन्न होऊं लागल्यापासूनच, मनुष्याचा प्रपंच सुरू होतो खरा, पण मुलगे आणि मुली यांच्या लहानपणीं, त्यांचे आईबाप अगर इतर पालनकर्ते, यांनीं प्रपंचाचा मुख्य भार शिरावर घेतला असतो, त्यामुळें सज्ञान मुलांमुलींच्या मनांत प्रपंचाचें बीज पेरलें असलें तरी, त्यांचा तो खरा प्रपंच नव्हे. तो बाळपणींचा खेळां–

तला प्रपंच, त्याला विशेष महत्व देतां येत नाहीं. कारण, तो अगदीं अल्प काळ टिकणारा असा असतो. वास्तविक प्रपंचप्रारंभ केव्हां होतो, याचा विचार केला तर, ज्यावेळीं स्त्रीपुरुष वयांत येऊन, पुरुषानें द्रव्य सपादन करावयाचें व त्या द्रव्याचा योग्य उपयोग करून, आपणावर पडलेली जबाबदारी स्त्रियांनीं पूर्णपणें ओळखूं लागावयाची, अशी जी स्थिति, तीच खऱ्या प्रपंचाची सुरवात. आतां ही सुरवात प्रत्येक मनुष्यानें केव्हां करावयाची, याविषयीं सरसहा नियम घालून देणें अगदींच अशक्य आहे. जगाच्या रहाटीप्रमाणें प्रपंचप्रारंभ व्हावयाचा ह्मणजे, मुलांची विद्यार्थीदशा संपून, लग्न वगैरे होऊन, नोकरी करून, आपलें पोट आपण भरण्या इतकीं तीं समर्थ झालीं, ह्मणजे त्यांनीं प्रपंचप्रारंभ केला, असेंच ह्मटलें पाहिजे. कित्येक सुदैवी स्त्रीपुरुषांवर प्रपंचप्रारंभाचा हा प्रसंग फार उशीरानें, ह्मणजे त्यांचे निम्याचे वर आयुष्य संपून गेल्यावर येतो व कित्येकांनां तर प्रपंचप्रारंभाची ओळखही न होतां, सर्व आयुष्य परावलंबी व दीन स्थितींत कंठून, त्यांस इहलोकच्या यात्रेची परिसमाप्ति करावी लागते. सारांश, प्रत्येक व्यक्तीच्या बऱ्यावाईट स्थितीवर ही गोष्ट अवलंबून असते व तीबद्दल सर्वत्र लागू होणारा, असा नियम देऊनही चालावयाचें नाहीं. योग्य वय, योग्य विद्या अगर कसब व योग्य द्रव्यप्राप्ति, या तिन्ही गोष्टींचे एकीकरण झाल्याखेरीज शहाण्या मनुष्यानें प्रपंचयात्रेचा प्रारंभ करूं नये, असा एक ठोकळ नियम सांगतां येण्यासारखा आहे. पण या व्याख्येंतील **योग्य** शब्दाचा अर्थ काय करावयाचा, हें सांगणें फार कठिण काम आहे. संसारोपयोगी योग्य वय ह्मणजे, परस्परांचा योग्य विवाहकाल होय. तो काळ कोणता, या प्रश्नाचा उहापोह आज कित्येक वर्षे चालून, सूज्ञ लोकांच्या परिश्रमानें हा महत्वाचा काल पूर्वीच्या पद्धतीपेक्षां बराच पुढें लोटलेला आहे व आणखीही पुढें लोटला जाण्याचीं सुचिन्हें दिसत आहेत.

प्रौढविवाहपद्धति हीच केवळ संसारसुखाची गुरुकिल्ली आहे. प्रौढविवाहाची रुढी जसजशी जास्त जास्त फैलावत जाईल, तसतशी प्रपंचसुखाची इयत्ताही वाढत जाईल, यांत कांहीं शंका नाहीं. हल्लीं आपण जे मुलांमुलींचे विवाह करितों, ते केवळ एकदेशीय असतात. म्हणजे ज्यांचे विवाह आपण करितों, त्यांच्या मनाचे कल, त्यांची आवडनिवड व त्यांच्या महत्वाकांक्षा या तिन्हीं गोष्टींचा विचार सध्यांच्या विवाहपद्धतींत नसतो मुलगा कुलशीलानें, विद्येनें व सामर्थ्यानें चांगला आहे, कीं नाहीं, याचा विचार मुलीचा बाप करीत असतो व मुलगी देखणी, सदृढ व कुलवान् आहे कीं नाहीं, या गोष्टींचा विचार मुलाचा बाप करीत असतो आणि दोन्ही पक्षांकडील आईबापांची या गोष्टीविषयीं खात्री झाली म्हणजे, एकाचा मुलगा व दुसऱ्याची मुलगी, असा विवाह होत असतो. या सर्व कृत्यांत मुलगा आणि मुलगी यांचा प्रत्यक्ष संबंध "सुमुहूर्त सावधान" करून घेण्यापलीकडे येत नाहीं, हें बरें नव्हे. त्या उभयतांचाही विचार या कृत्यांत घेणें, योग्य आहे व तीं प्रौढ झाल्यावर जर विवाह करण्याची चाल पडली, तर त्यांचीं स्पष्ट मतें सहज समजण्यासही मार्ग मोकळे होतील, असा माझा तरी समज आहे. सध्यांच्या पद्धतींत फरक जो करावयाचा, तो विशेष कांहीं नसून, आईबापांच्या मताला प्राधान्य देण्याची चाल कायम ठेऊन, फक्त मुलांमुलींच्या मतांचाही या महत्वाच्या कार्यांत समावेश व्हावा, हें बरें, असें मला वाटतें. मुलगा आणि मुलगी यांच्या आईबापांच्याच स्वतंत्र मताने विवाह करण्यापेक्षां, त्यांच्या या मतांत, नवरा आणि नवरी यांच्या **प्रत्यक्ष** मताची **भर** असावी, असें लिहिण्याचा उद्देश, आईबापांच्या इच्छेला **प्रमुखत्व** यावें, असा आहे, कारण ज्यांची सांगड आपण सुखोत्पत्तीसाठीं घालून देणार आहों, त्यांना जगाचा अनुभव कमी असतो, क्षणिक सुखाकडे त्यांचा ओढा विशेष असण्याचा संभव आहे, वरवर दिसणारें सौंदर्य पाहून, भर

ज्वानींत आलेला पुरुष, भावी बायकोच्या कुलशीलाकडे दृष्टी न देतां, तिच्यावर आसक्त होऊं इच्छील, परंतु या त्याच्या ओढाळ कृतीच्या गळ्यांत, जगाच्या अनुभवांत मुरलेल्या आईबापांच्या मताचें लोढणें बांधून टाकल्याच्या योगानें, त्याचें मन उच्छृंखल होऊं शकणार नाहीं व विवाहाचे परिणाम वाईट कधींही व्हावयाचे नाहींत. आंग्लदेशीय, यावनी, झोरास्ट्रियानुयायी व आर्यदेशीय अशा ज्या विवाहपद्धतींचें आपणांस ज्ञान आहे, त्यांत खरोखर आर्यदेशीय विवाहपद्धत तूर्त अखेरच्या पायरीवर लोक नेऊन बसवितात, पण देशस्थितीच्या मानानें ती पद्धत ठरत आली आहे. तींतील दोष म्हणजे, अपरिपक्व वय व दांपत्याच्या मताला मान न देणें; हे दोन्ही काढून टाकून, त्याच्याऐवजीं आईबापांच्या मतानें व नवरा आणि बायको यांच्या मनाचे कल संभाळून, जर प्रौढविवाहाची रीत सुरू केली, तर आमची विवाहपद्धत सर्वांशीं नाहीं, तरी बरीच निर्दोषी होऊन, तिचा नंबर सध्यां सुरू असलेल्या पद्धतींत, पहिल्या पायरीपेक्षां खालीं येणार नाहीं, अशी बरीच उमेद आहे. आतां,

**प्रौढविवाह**—कशास म्हणावयाचें, याचाही थोडासा विचार करणें अवश्य आहे. आपल्या देशांतील हवामान व समाजरचना यांचा विचार केला असतां, पुरुषासंबंधानें विवाहकाल सध्यां तरी २० वर्षांच्या पुढें लोटतां येईल, असें वाटत नाहीं. स्त्रियांच्या संबंधानें तो काळ १५–१६ च्या पुढें नेणें श्रेयस्कर होणार नाहीं. स्त्रीपुरुषांच्या मधील अंतर, कनिष्ठ मानानें पांच वर्षांचें, मध्यम मानानें सात वर्षांचें, व उत्तम मानानें दहा वर्षांचें असलें पाहिजे. केव्हांही स्त्री १६ वर्षांपेक्षां कमी वयाची असतांना व पुरुष २० वर्षांपेक्षां कमी वयाचा असतांना, त्यांचें **खरोखर** लग्न होण्याचा प्रसंग आणूं नये. वयाचा अशा प्रकारचा फरक ठेऊन,

( १ ) पुरुष आपली व आपल्या कुटुंबाची उपजीविका योग्य प्रकारें करण्याजोगा झाला असल्यास व

( २ ) परस्परांच्या आईबापांची, अगर त्यांच्या ऐवजीं त्यांच्या ठिकाणीं आपण ज्यांस मानतों, त्यांची संमति पडली आणि

( ३ ) नवरा आणि बायको यांची परस्पर मनें एकमेकांविषयीं अनकूल असलीं तर,

संसाराचा मूळ पाया जो विवाह, तो करावा, नाहीं तर करूं नये, असें ह्मणणें भाग आहे. या तिन्हींपैकीं एकाही नियमाचें उलंघन केलें तरी प्रपंचांतील खरें खरें सौख्य, मनुष्यास मिळण्याचा संभव नाहीं. आतां कोणी असें ह्मणूं लागेल कीं, या तिन्हींपैकी एकही नियम न पाळतां लग्न झालेलीं कित्येक जोडपीं आज मितीला जगांत संसार-सुखाचा यथेच्छ अनुभव घेत आहेत; हें कसें? याला उत्तर एव-ढेंच कीं, आगीच्या भडक्यांत शिरूनही, कांहीं लोक जिवंत बाहेर पडले आहेत, भर समुद्रांत पडलेले पुष्कळ लोक तीराशीं जिवंत लागून, चैनीनें कालक्रमणा करीत आहेत. किंवा डोंगराच्या उंच शिखराव-रून खोल दरींत पडलेले, कांहीं लोक सुखरूप आहेत. अशीं कांहीं उदाहरणें इतिहासाच्या माहितीनें मिळूं शकतील खरीं, पण ह्या उदाह-रणांच्या आधारावर, जर कोणी जळक्या घरांत बळेच शिरूं लागला, किंवा तुफान समुद्रांत उडी मारूं लागला, किंवा एखाद्या उंच डोंगरा-वर जाऊन, बळेच खालीं उडी मारूं लागला, तर त्या मनुष्याची रवा-नगी आपण वेड्यांच्या इस्पितळांत करणार नाहीं काय? न कळत जसे दुर्दैवाचे अपघात होतात, तसेच वरच्या अचानक गोष्टी ह्मणजे, अवि-चारी विवाहाचे गोड परिणाम, सुदैवाचे अपघातच ह्मटले पाहिजेत. सारांश, तो नियम नव्हे. योग्य विचाराअंतीं ठरलेल्या नियमांनीं वर्तन ठेऊन, त्यांत नुकसान झालें तरी हरकत नाहीं, असा जगाचा अनुभव

आहे व त्याच अनुभवाच्या रस्त्यानें प्रत्येक मनुष्यानें जावें, हें विहित आहे.

विवाहाच्या संबंधानें जास्त विचार करण्याजोगें हें स्थल नव्हे, वास्तविक पहातां, तो विषय इतका कठिण आहे कीं, सर्व दिशांनीं त्या विषयाचा विचार करून, प्रत्येक विवाहपद्धतींतील गुणदोष काढावयाचे ह्मणजे एक फार मोठा स्वतंत्र ग्रंथच लिहावा लागेल. परंतु सर्वथैव निर्दोष अशी गोष्ट जगांत सांपडणें ह्मणजे मुष्किलच आहे. प्रत्येक गोष्टींत थोडाबहुत दोष हा असावयाचाच. त्यांतल्यात्यांत डावेंउजवें पाहून मनुष्याने वर्तनक्रम ठेवावयाचा, हा व्यवहारांतील मुख्य नियम. त्याला अनुसरून व आजपर्यंत हिंदुसमाजाची जी घडी बसली आहे, तिचा फारसा बिघड न होतां, त्यांतल्यात्यांत काय सुधारणा करावी एवढेंच सुचवून हें " प्रपंचप्रारंभ " प्रकरण पुरें करितों व त्यानंतरची संसारांतील दुसरी मुख्य गोष्ट म्हणजे "राहण्याची जागा,' ह्या विषयाकडे वळतो.





# भाग दुसरा.

## राहण्याची जागा.



शारीररक्षणास अन्नपाण्याची जितकी गरज आहे, तितकीच राहण्यास घराची गरज मनुष्यास असते. मग तें घर भाड्याचें असो, गहाणाचे असो, खरेदी घेतलेले असो किंवा स्वतःसाठीं नवीन बांधलेलें असो. मिळून कसल्यातरी प्रकारचें घर हें संसारी मनुष्यास अवश्य पाहिजे. आतां या वरील प्रकारांपैकीं कोणत्या प्रकारचे घर मनुष्यानें पसंत करावें, हें सांगणें सोपे काम नाहीं. ज्याच्या त्याच्या द्रव्यबलाच्या प्रमाणावर ही गोष्ट अवलंबून राहणार आहे. व राहण्याच्या जागेचे वरील प्रकार तरी त्याच धोरणानें योजिलेले आहेत. सर्वांत कनिष्ठ दर्जा म्हटला ह्मणजे भाड्याचे घर व सर्वांत उंच प्रतीचा दर्जा ह्मटला म्हणजे स्वतःसाठीं स्वतः बांधविलेलें घर. परंतु कोणत्याही दर्जाचा कुटुंबीय मनुष्य असला व त्यानें कोणत्याही पद्धतीनें घराची सोय करून घेतली असली, तरी मानवी जीवनास अवश्य ज्या गोष्टी, ह्मणजे जागेचा कोरडेपणा, खेळती स्वच्छ हवा, मुबलक उजेड व घरांत राहणाऱ्या माणसांच्या संख्येच्या मानानें त्याचा विस्तार, या अवश्य गोष्टींकडे प्रत्येकानें लक्ष्य दिलेंच पाहिजे. वैद्यशास्त्राची सर्व बाजूंनीं माहिती असणाऱ्या अशा कांहीं लोकांच्या ह्मणण्याप्रमाणें, एका मनुष्यास निदान ९०० पासून १०००

पर्यंत घनफूट जागा अवश्य लागते व ती जागा अशी असली पाहिजे कीं, तींत हवा खेळेल, अशा खिडक्या असल्या पाहिजेत, ह्मणजे श्वासोच्छ्वासानें बिघडणारी हवा स्वच्छहोऊन, तेथें राहणाऱ्या मनुष्याच्या प्रकृतीवर अनिष्ट परिणाम व्हावयाचे नाहींत. ९०० घनफूट खेळती हवा मावण्याजोगी खोली ह्मणजे १० फूट लांब, ९ फूट रूंद व १० फूट उंच, अशी असली पाहिजे. दहा फुटां पेक्षां, कमी उंची नसावी. लांबीरूंदीमध्यें फरक केल्यास कांहीं हरकत नाहीं. घनाची प्रत्येक बाजू १० फूट असली, तर १००० घनफूट होतात, हें उघड आहे. सारांश, उंची वाटेल तर १० फुटांपेक्षां जास्त ठेवल्यास हरकत नाहीं, पण कमी मात्र अगदीं उपयोगी नाहीं, हें लक्षांत ठेवावे.

घरांतील प्रत्येक मनुष्यास मोकळ्या हवेचा सांठा वरील प्रमाणानें मुबलक मिळेल, अशी खात्री असल्यावर, मग घर भाड्याचें आहे, गहाणाचें आहे, खरेदीचें आहे, कीं स्वतःसाठींच मुद्दाम तयार केलेलें आहे, याचा विशेष उहापोह करण्याचें कारण नाहीं. भाड्यानें घर घेणें हें जरी अगदीं कनिष्ठ प्रतीचे संसारसुख असलें तरी "अंथरूण पाहून पाय पसरणें" हीच गोष्ट इष्ट आहे. द्रव्यानुकूलता नसल्यामुळें, भाड्यानें घर घेण्याचा प्रसंग आल्यास, खालील गोष्टींकडे विशेष लक्ष्य दिलें पाहिजेः—

(१) जें घर आपण भाड्यानें घेणार, त्या घराचा मालक त्याच घरांत राहणारा नसावा, ह्मणजे त्याचे राहणें आपल्यापासून होतां होईल तितके दूर असावे.

(२) ज्या घरांत आपण भाड्यानें राहणार, तें घर स्वतंत्रपणें भाडें उत्पन्न होण्यासाठींच बांधलेलें असल्यास उत्तम. मालकाच्या घरांतील एखादा जाबता होतां होईल तों भाड्यानें घेऊं नये.

( ३ ) आपल्या स्थितीपेक्षां ज्यांची स्थिति फार श्रेष्ठ किंवा फार कनिष्ठ असेल, अशा समुदायांत आपण भाड्यानें घर घेऊं नये. साधारणपणें आपल्याच स्थितीचे लोक, ज्या आळींत राहत असतील, त्यांच्या समुदायांत घर घेणे, फार हिताचे आहे.

येथपर्यंत भाड्याने घर घेण्याविषयींचा विचार झाला. संसारसुखाची खरी कल्पना ह्मणजे, भाड्यानें घर घेऊन राहणे, ही नव्हे, पण किंत्येक प्रसंगीं द्रव्यानुकूल्य असूनही इतर अपरिहार्य नडीमुळे भाड्याचें घर घेऊनच गुजारा करावा लागतो, तेव्हां वरील तिन्ही तत्त्वांचा समावेश होण्याजोगें घर पहावें, हा उत्तम मार्ग होय. आतां,

**घर गहाण घ्यावें, कीं नाहीं**–या गोष्टीचा आपण विचार करूं. आपणास अवश्य लागणाऱ्या वस्तूंपैकी घर ही अति महत्वाची एक वस्तू आहे. ती आपली स्वतःची असेल तर उत्तमच; नसेल तर जिच्यावर कांहीं आपला ताबा व कांहीं मालकाचा, अशा दुटप्पी स्थितीत मनुष्यानें राहू नये, हे बरें. घर गहाण घेणे म्हणजे जास्त मुदतीच्या करारानें भाड्याने घेण्यासारखेंच आहे, व पर्यायानें भाडें देऊन, आपण घराचे गुलाम होऊन राहिल्यासारखें होणार, अशा अवघड स्थितींत न राहणें हे बरें. भाड्याचे घर गैरसोईचें वाटल्यास तावडतोब तें सोडून, दुसरें घेतां येतें. गहाण घेतलेल्या घराचा प्रकार तसा होणें शक्य नाहीं. त्यावर आपली पूर्ण मालकी नसते व तें नटविण्यांत आणि शृंगारण्यांत जो बराच पैसा खर्चीं पडलेला असतो, त्याची आशा सोडून, दुसरें घरही घेण्याची छाती होत नाहीं; अशा स्थितींत कुचमत राहवें लागलेल्या कित्येक कुटुंबांची उदाहरणें प्रत्येक गावीं आढळतील. व अशी स्थिति ज्यांची झालेली असेल त्यांपैकीं स्पष्ट बोलणाऱ्या लोकांना आपण जर प्रश्न केला कीं "**घर गहाण** घ्यावें कीं नाहीं?" तर ते लगेच उत्तर देतील कीं, "तसें करूं नये."

आतां अर्थशास्त्राच्या दृष्टीनें व काटकसरीच्या नियमानें असा व्यवहार करणें सोईचें वाटेल खरें. मारवाड्याच्या तत्त्वानें ही गोष्ट उत्तम ठरेल हेंही खरें ; पण जगांतील सर्वच व्यवहारांत व्याजबट्याचा हिशेब करीत बसणें ह्मणजे निव्वळ वेडेपणा आहे. प्रपंचांत प्रत्येक मनुष्याला बरीच मोठी रक्कम सालोसाल बिनव्याजीं खर्च करावी लागत असते. घरदार, कपडालत्ता, दागदागिने, ऐषआराम, जेवणखाण वगैरे गोष्टींत व्याजाचा हिशेब करून, जगांत वर्तन ठेवावयाचे, असा जर कोणी निश्चय केला तर त्याला, दिगंबर राहून, हवेचे भोजन व नदीनाल्यांच्या पाण्याचे प्राशन करून, फार कष्टमय स्थितींत, ह्मणजे जवळ जवळ जनावरांच्या स्थितींत, दिवस काढावे लागतील. येथपर्यंत ज्याअर्थी आपली तयारी झालेली नाहीं, त्याअर्थी प्रपंचांत लागणाऱ्या अवश्य गोष्टींत व्याजबट्याचा विचार करणें, बरोबर नाही.

आतां एखाद्यानें स्वतःच्या सोईप्रमाणें बांधलेलें **घर आपण विकत घ्यावें कीं न घ्यावें**, या प्रश्नाचा विचार केला असतां, असें दिसून येईल कीं, तसें करणे हेंही कांहीं इष्ट नाहीं. जो अंगरखा आपल्या अंगावर बेतला नाहीं व जो दुसऱ्या कोणाच्या तरी पसंतीप्रमाणें केलेला आहे, तो घेण्यांत जी गैरसोय आहे; तीच गैरसोय आयते बांधलेले घर घेण्यांतही आहे. मूळ मालकाची इच्छा, त्याची कल्पना, त्याच्या सोई आणि त्याची ऐपत ही सर्व आपल्या स्थितीशीं जुळतीलच असा कांहीं नियम नाही, व या सर्व गोष्टी जुळून आल्या तर अशाप्रकारें घराची व्यवस्था करण्यासही विशेष हरकत आहे, असे ह्मणतां येत नाहीं. मागील दोन्ही प्रकारच्या व्यवहारांपेक्षां यांत फरक पुष्कळ आहे, आणि चांगल्या तऱ्हेनें बांधलेल्या घरांतील सोईंत विशेषसा फरक नसतो, ही गोष्ट लक्षांत आणली ह्मणजे, अशा रीतीनें घरांची सोय करून घेणे, गैरवाजवी आहे, असें ह्मणतां येत नाहीं. आतां याहीपेक्षां उत्तमोत्तम मार्ग झटला म्हणजे,

**स्वतःसाठीं घर बांधणें**–हा आहे, यांत मात्र कांहीं शंका नाहीं. आपल्या श्रमाचा मोबदला जो पैसा, तो खर्चून बांधलेल्या घरांत राहणें, यासारखी सुदैवाची गोष्ट जगांत व्यवहाररीत्या दुसरी नाहीं म्हटलें तरी चालेल. 'स्वत्व' ही अशी कांहीं मोहक वस्तु आहे कीं, तिच्या प्राप्तीसाठीं हजारों लोक लक्षावधि रुपये खर्च करीत आहेत व पुढेंही अव्याहत खर्च करीत राहतील, यांत कांहीं शंका नाहीं. स्वतःच्या श्रमानें पैदा केलेल्या गुलाबाच्या एका फुलाला जो सुवास असतो, जें सौंदर्य असतें व जी किंमत असते, ती माळ्यानें आणून दिलेल्या शेंकडों फुलांच्या माळेला नसते, हा अनुभव पुष्कळांस असेल. स्वतःच्या पैशानें बांधिलेल्या पर्णकुटिकेंत जी मजा वाटते, ती दुसऱ्याच्या मालकीच्या राजमंदिरातही वाटत नाहीं, याचा अनुभव प्रथम भाड्यानें घरें घेऊन राहिलेल्या व मग स्वतःच्या घरांत राहणाऱ्या, सर्वत्रांस आलेलाच असतो. फार दूर नको. स्वतः बनविलेल्या भाजीभाकरीला जी चटक व जी रुची लागते, तिच्यापुढें भाडोत्री आचाऱ्यानें तयार केलेली पक्वान्नेंही फिकीं पडतात ही गोष्ट थोड्याबहुत अंशानें सर्वांस माहीत असतेच व त्याची थोरवीही अवर्णनीय आहे. जगांतील या न्यायानें पाहिलें ह्मणजे, शक्य असेल तर, प्रत्येक कुटुंबी मनुष्याला स्वतःचें घर असणें, हेंही इष्टच आहे; नाहीं असें कोण ह्मणेल ?

आतां स्वतःचें घर असणें, ही गोष्ट जरी इतकी सुखदायक आणि अवश्य आहे, तरी ती प्राप्त करून घेण्याच्या कामीं ज्या अनेक चुक्या होतात, त्या मात्र प्रापंचिक मनुष्यानें अवश्य टाळल्या पाहिजेत, नाहीं तर सुखापेक्षां दुःखाचाच वांटा जास्त होतो व त्या विवंचनेंत सर्व जन्माची माती होऊन, मनुष्य कवडीमोल होऊन जातो.

स्वतःचें घर असावें, अशी कल्पना मनांत आल्याबरोबर खालील गोष्टींचा विचार मनांत अवश्य आणिला पाहिजेः–

( १ ) आपणास जशा नमुन्याचें घर पाहिजे तसें बांधण्यापुरते **आपले स्वतःचे रुपये आपल्या पिशवींत** आहेत कीं नाहींत.

( २ ) घर बांधण्यांत पैसे खर्च करूनही आपला व आपल्या कुटुंबाचा निर्वाह सुखानें चालेल, अशी आपली स्थिति आहे कीं नाहीं.

( ३ ) व्यापारधंदा अगर नोकरीचाकरी यासंबंधानें, आपलें कायमचें राहणें, आपण बांधलेल्यां घरांत होण्याचा संभव आहे कीं नाहीं.

( ४ ) आपलें घर बांधण्याचा आपण विचार करीत आहों, त्यांत सुखानें कालक्रमणा करून, स्वगृहींचें सुख अनुभवण्याजोगे आपले दिवस जगांत उरले आहेत, कीं नाहींत.

या चार मुख्य गोष्टींचा विचार करून, मग घर बांधणें कीं न बांधणें तें ठरवावें. याचें कारण, आजपर्यंतचे व्यवहारांतील अनुभव असे आहेत कीं, या चारहीपैकीं एखादी जरी चूक केली, तरी घर बांधल्यापासून सुखाचेऐवजीं दुःखच जास्त उत्पन्न होतें.

**घर कोणत्या नमुन्याचें असावें**—या गोष्टीचा विचार करण्यापूर्वी तें कोणत्या स्थितींतील मनुष्यानें बांधावें, व कोणत्या स्थितींतील मनुष्यानें बांधू नये, या गोष्टीचाच विचार ज्यास्त महत्वाचा आहे. आपल्या लोकांत अशी एक फार जुनी ह्मण आहे कीं " घर बांधून पहावें व लग्न करून पहावें. " या दोन्ही गोष्टी करून पाहिल्याखेरीज यांतील सुखदुःखाचें रहस्य कळावयाचें नाहीं, ही गोष्ट अक्षरशः खरी आहे. परंतु या दोन्ही गोष्टी अशा कांहीं विलक्षण आहेत कीं, यांचा अनुभव घेण्यासाठीं ह्मणून एखाद्या मनुष्यानें, जर कां त्या केल्या व त्यांत तो दुर्दैवानें चुकला, कीं जगांतील सर्व सुखाला तो मुकला ह्मणून समजावें. बाकी पुष्कळ गोष्टी करण्याच्या कामांत चुकी झाली तर, ती दुरुस्त

करितां येते. पण (घर आणि लग्न यांत जर कां एकदां चूक झाली, तर तिचे परिणाम मनुष्याला आमरणांत भोगावे लागतात; यासाठीं शहाण्या मनुष्यांनीं या व्यवहारांत पडण्यापूर्वी फार दूरवर विचार करून, मग त्या दिशेकडे आपल्या कृतीचें सुकाणूं वळवावें, हे बरें दिसतें.) या दोन्ही गोष्टी करून पहाव्या, असें जें ह्मणतात, त्याचा अर्थ इतकाच कीं, त्या केल्याखेरीज त्यांतील अनुभव कळणें शक्य नाहीं, असा भावार्थ; परंतु अशा प्रकारचा भावार्थ काढून, प्रत्येकानें फिरून फिरून तीच ती चूक करीत बसणें, ह्मणजे इतिहासशास्त्राच्या अचुक आज्ञा मोडण्याचें पातक करण्यासारखेंच होय. विस्तवांत हात घालूं नये; तरवार मानेवर मारूं नये; पोहण्याचें ज्ञान असल्याखेरीज पाण्यांत उडी टाकूं नये; अशा रीतीचे सर्वमान्य उपदेश करणाऱ्यापुढें एखादा कमकल मनुष्य आला आणि ह्मणूं लागला की मागील अनुभव माझ्या कांहीं कामाचे नाहींत, माझा मी स्वत: अनुभव घेणार, तर त्याची जी अवस्था, तीच अविचारी घर बांधणाराची व अविचारानें लग्न करून घेणाराचीही होणार आहे. वारंवार अनुभव घेऊन काढलेल्या सिद्धांतांची प्रचीति फिरून पाहण्याचें कांहीं कारण नाही. असो, साराश ह्मणून इतकाच कीं, स्वत:चें घर बांधण्यापूर्वी विचार करण्याच्या ज्या चार गोष्टी सांगितल्या, त्या नेहमीं नजरेसमोर ठेवून, मग पुढें पाऊल टाकावें, हें प्रत्येक शहाण्या मनुष्यास योग्य आहे.

**घराची जागा कशी असावी?** ज्या ठिकाणीं आपण घर बांधूं इच्छितों, ती जागा सखल ठिकाणीं असतां कामा नये. ती उंचवट्यावर असली पाहिजे, ह्मणजे पावसाचें अगर राबाचें पाणी घरात न मुरतां, सर्व बाहेर निघून जातें व त्यामुळें घर निरोगी आणि भर पावसाळ्यांत देखील कोरडें राहतें.

**घराला जागा किती लागते?** या प्रश्नाचें उत्तर देणें फार कठिण आहे, असें सकृद्दर्शनीं दिसतें, परंतु आपल्या हिंदु लोकांच्या कल्पनेप्रमाणें व सोईप्रमाणें तें देणें मुळींच कठिण नाहीं; कारण कुटुंबाचीं माणसें जितकीं कमी अगर जास्त त्या मानानें तीन, पांच, सात अगर नऊ, अशा खणांचें घर बांधण्याचा परिपाठ आपल्या लोकांत आहे व दर खणाची रुंदी ५ पासून ७ फुटांपर्यंत असते; या मानानें घराची रुंदी होईल, हें उघड आहे. कमींत कमी तीन खणांपेक्षां कमी रुंद घर बांधीत नाहींत व फार मोठें ह्मणजे ११ खणांपेक्षां रुंद घरें फारच क्वचित् असतात. या खेरीज घराच्या दोन्ही बाजूंस मोकळी जागा निदान १०।१० फूट तरी टाकावीच लागते. त्या खेरीज आसपासच्या घरवाल्यांशीं तंट्यांचें बीज मोडत नाहीं व घरांत स्वच्छ मोकळी हवा व पुरेसा उजेड मिळूं शकत नाहीं. घराला लागणाऱ्या जागेच्या लांबीचें प्रमाणही प्रत्येक कुटुंबांतील मनुष्यांच्या संख्येवरच अवलंबून असतें. प्रत्येक घराला कमींत कमी तीन दालनें हीं असतातच व प्रत्येक दालनाची रुंदी निदान १२ फुटांपेक्षां कमी असतां उपयोगी नाहीं. जास्त ह्मणजे पांच दालनें असतात; तेव्हां भिंतीला जी जागा लागते, ती देखील धरून कमींत कमी ४० फूट तरी खुद्द इमल्यास जागा लागते व मागें परसूं आणि पुढें आंगण मिळून ४० फूट, अशी एकंदर ८० फूट जागा अगदीं अवश्य पाहिजे. यापेक्षां कमी जागेत घर बांधणें म्हणजे कांहीं तरी करणें होय; ह्मणून इतकीही ज्याची सोय नसेल, त्यानें ते न बांधावें हें बरें; घराची रुंदी निदान पांच खण तरी असलीच पाहिजे.

**घराचा नमुना**—प्रत्येक संसारी मनुष्यानें अमुकच नमुन्याचें घर बांधावें, असा नियम घालून देणें फारच अशक्य आहे. इतर देशांची गोष्ट विचारांत न घेतली तरी, खुद्द हिंदुस्थानांत देखील हवामान व मनुष्यस्वभाव यांच्या फरकाप्रमाणेंच घरें बांधण्याचे प्रकारही अनेक

दृष्टीस पडतात. काशीकडील घरांच्या पद्धतीशीं मलबारांतील घरांची पद्धत मुळींच जमत नाहीं, व कलकत्त्यांतील मोठमोठे वाडे आणि म्हैसूरचे वाडे, यांतही बाह्य देखावा आणि आंतील सोई यांत पुष्कळच फरक दिसतो. फार दूरचा विचार सोडून, अगदीं जवळ जवळचीं शहरें घेतलीं तरी, त्यांतील घरांच्या बांधणींत देखील फार फरक नजरेस येतो. धारवाड शहरांतील जुन्या इमारती आणि खानदेशाकडील जुन्या इमारती यांत बराच फरक आहे. तसाच फरक भडोच, सुरत, बडोदें, अमदाबाद वगैरे ठिकाणच्या इमारतींत आणि बारशी, पंढरपूर, सोलापूर आणि रायचूर येथील इमारतींतही दृष्टीस पडतो. कोंकणांतील घरें बांधण्याची पद्धत, देशावरील पद्धतीपेक्षां बरीच भिन्न असते. तात्पर्य एवढेंच कीं, देशकाल व हवामान आणि विशेष सोई, या मानानें घरांच्या रचनेंत फरक आपोआपच होत गेलेला आहे. नगर, सोलापूर, बालेघाट, खानदेश या प्रांतांतील घरांवरील मातीचीं धाबीं किंवा माळवदें जर रत्नागिरी प्रांतांतील घरांवर आणून घातलीं व तिकडील कौलांचीं छपरें, नगर खानदेशांतील घरांवर घालण्यास सुरवात केली, तर कोंकणांतील घरांत पावसाचें पाणी घरांतच साठूं लागेल व सोलापूर आणि बालेघाट इकडील घरांत उष्णतेचा अगदीं कहर उसळून जाईल; सारांश, प्रत्येक प्रांतांत अमुकच नमुन्याचें घर बांधावें, असा सरसकट नियम न देतां सर्वत्र ठिकाणच्या घरांत काय काय अवश्य गोष्टी व सोई असाव्या, यांची माहिती दिली ह्मणजे पुरे होईल, असें वाटतें. हिंदुपद्धतीला सर्व प्रकारें सोईवार अशा घरांतील सर्व सोई, इतर प्रांतांपेक्षां पुणें प्रांतीं जास्त केलेल्या असतात, असें नजरेस येतें. सध्यां कांहीं आगंतुक कारणांनीं पुण्याची हवा खराब झालीं आहे व शहरसफाईखातें असावें तितकें जय्यत नसल्यानें, तें शहर राहण्यास अयोग्य ठरत चाललें आहे; तरी या आगंतुक दोषांचा

विचार मनांत न घेतां पाहिलें तर, आपल्या लोकांच्या घराचा सोइस्कर नमुना पुणें शहरीं व त्याच प्रांतांत इतर ठिकाणींहि मिळेल, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. हिंदुसमाजाची खरी अक्कल त्या ठिकाणीं एके वेळीं सर्व दिशांनीं काम करीत होती व हिंदु राष्ट्रीला सर्वपरी उत्तम अशा वस्तूंचा संग्रह तेथें दृष्टीस पडतो, हेंही स्वाभाविकच आहे. या सर्व गोष्टींचा मतलब इतकाच कीं, ज्याला म्हणून नवीन घर सर्व तऱ्हेच्या हिंदु सोईचें म्हणून बांधावयाचें असेल, त्यानें पुणेरी घराचा एकादा नमुना नजरेपुढें ठेवून, त्यांत आपल्या स्थितीच्या मानानें थोडाबहुत फरक करून, घर बांधावें, हें बरें. उत्तम मध्यम व कनिष्ट, असे जे समाजांतील लोकांचे संपत्तीच्या मानानें तीन वर्ग झाले आहेत, त्यांतील कनिष्ठ वर्गांतील लोकांना स्वतःसाठीं घरें बांधण्याचे प्रसंगच यावयाचे नाहींत, म्हणून त्यांचेविषयीं विचार करण्याचें कारण नाहीं. पहिला उत्तम वर्ग म्हणजे ज्यांना गांवाबाहेरील स्वच्छ हवेंत साहेबी थाटाचे मजेशीर बंगले घेऊन, राहण्याची ऐपत आहे, ते लोक; किंवा गांवांतच मोठमोठे वाडे बांधून राहण्याची ज्यांची ऐपत आहे, ते लोक. अशा लोकांविषयींहि घरासंबंधानें विचार करण्याचा या पुस्तकाचा उद्देश नाहीं. केवळ मध्यम स्थितीचे लोक म्हणजे ज्यांची ऐपत घराप्रीत्यर्थ सबंध आयुष्यक्रमांत एकवार पांच हजारांपासून १० हजारांपर्यंत रक्कम या कामांत खर्च करण्याची असते, त्यांविषयींच विचार करण्याचा आहे. कमींत कमी पांच हजार रुपये तरी खर्च केल्याखेरीज साधारण देखील घर हिंदुपद्धतीचें तयार होऊं शकत नाहीं. तेव्हां एवढीहि ज्यांची ऐपत नसेल, त्यांनीं घर बांधण्याच्या या नादांत पडूंच नये, हा उत्तम मार्ग. द्रव्यानुकूलता आहे व घरांत घातलेल्या पैशाबद्दल कधींहि हळहळ करण्याचा प्रसंग यावयाचा नाहीं; अशी पक्की खात्री असली म्हणजे, मग स्वतःसाठीं

आपल्या कल्पनेप्रमाणें घर बांधून, त्यांत प्रपंच करण्याइतकें सुख प्रापंचिक मनुष्याला दुसरें मिळणें अशक्यच आहे, एवढी मात्र गोष्ट खरी आहे. घर बांधावयाचें ठरल्यावर त्यांतील सर्व साधारण सोई कशा असाव्या, हेंहि ठोकळ मानानें ठरविणें भागच आहे व घराचें काम निर्विघ्नपणें आणि आपणास विशेष दगदग न पडतां कसें पूर्ण होईल, याचाही विचार केलाच पाहिजे. आतां आपण:—

घरांतील मुख्य सोई कोणत्या असाव्या, याविषयीं विचार करूं. घराची मुख्य सोय (१) स्वच्छ हवा. ती मिळण्यास चोंहोंकडून खुली जागा असेल, अशा ठिकाणींच घर बांधलें पाहिजे. (२) उजेड, ह्मणजे सूर्यकिरणांचा प्रकाश घरांत सकाळपासून संध्याकाळपर्यंत राहील, अशी तजवीज, घराला पुष्कळ खिडक्या, सार्णी, झरोके वगैरे ठेवून केली पाहिजे. स्वच्छ हवेप्रमाणेंच उजेडाचाहि प्रकृतीवर परिणाम होतो. अंधारांत राहण्याचा प्रसंग ज्यांचेवर येतो, तीं माणसें निस्तेज, फिकट रंगाचीं व सर्वदां उदास अशीं दिसतात. सूर्याचा प्रकाश ज्या मानानें कमी मिळतो, त्या मानानें शरीरांतील रुधिराभिसरणावर परिणाम होत असतो व सूक्ष्म प्रमाणानें मनुष्याच्या वाढीवर देखील त्याचा परिणाम होतो. मनुष्यांची व तशीच वनस्पतींचीहि वाढ सूर्यप्रकाशावर अवलंबून असते. उत्तरध्रुवाकडील वनस्पति व माणसें खुरटीं कां, आणि अरबस्तान, आफ्रिका वगैरे ठिकाणचीं माणसें व वनस्पति धिप्पाड कां, याचें बिजही सूर्यप्रकाशाचा कमी जास्त पुरवठा यांतच आहे. तात्पर्य, घरांत सूर्यप्रकाशाचा प्रवेश मुबलक असला पाहिजे, हें होय. (३) घर अशा रीतीनें बांधावें कीं, त्यांत हवा व उजेड सर्वकाळ चांगला टिकेल. (४) घरांतील देवघर पूर्व बाजूस, स्वयंपाकघर न्हाणीघर गोठा व शौचकूप हे भाग अशा रीतीनें बांधावे कीं, त्यांतिल

हवा आपल्या घरांत येऊं नये. ( ५ ) मुलांना अभ्यास वगैरे करण्यासाठीं, ह्मणून ज्या खोल्या ठेवावयाच्या, त्या अगदीं निवांत अशा ठिकाणीं प्रपंचाच्या कटकटीपासून अगदीं अलग अशा असाव्या. ( ६ ) निजण्याची जागा ह्मणून जी तयार करावयाची, ती त्याच कामासाठीं निराळी तयार केलेली असावी; सध्यां आपल्या लोकांत जी चाल आहे कीं, कांहीं माणसें स्वयंपाकघरांत, कांहीं माजघरांत व कांहीं जागा सांपडेल तेथेंच निजावयाची, ही रीत आरोग्याला हितकर नाहींच व सोईलाहि हितकर नाहीं. सर्वांना निजण्याजोगी अशी एक अगर अनेक जागा घरांत स्वतंत्र असल्या पाहिजेत व त्यांची बांधण्याची तऱ्हाहि, त्या उपयोगाकडे लक्ष देऊनच केलेली असली पाहिजे. ( ७ ) विवाहित स्त्रीपुरुष निजण्याच्या ज्या खोल्या योजिल्या असतील, त्यांचे आसपास कांहीं अंतरावर मनुष्याचें वारें न येईल, अशा व्यवस्थेनें त्या बांधलेल्या असाव्या. ( ८ ) घरांतील मुख्य मालकाच्या बैठकीची जागा, घराच्या अगदीं पुढच्या अंगास असावी, व ती माडीवर करण्याचा प्रसंग आल्यासहि बाहेरील येणाऱ्या जाणाऱ्या मनुष्यांना गैरसोय होऊं नये, यासाठीं माडीचा एक जिना स्वतंत्रपणें अगदीं बाहेरून असावा. ( ९ ) स्वयंपाकघर आणि कोठीची खोली यांत फार अंतर नसावें. ( १० ) देवघर, भोजनाची जागा आणि न्हाणीघर हीं होतां होईल तों एकमेकांजवळ असावीं. ( ११ ) घरांतील बायकांना मन मोकळें करून बसतां येईल, अशी पडदपोशीची हवाशीर व स्वतंत्र जागा, खालच्या मजल्यावरच असावी.

असा सोईचें घर बांधण्याचें काम शिल्पशास्त्रांत निष्णात अशा लायक मनुष्याचे देखरेखीखालीं करवून घेतलें पाहिजे. कित्येक चांवल्या चांगल्या सुशिक्षित लोकांचा देखील असा समज आहे

कीं, शिकलेल्या व अनुभवशीर इंजिनियरा इतकेंच आपलेंहि ज्ञान शिल्पकलेंत आहे व शास्त्रीय रीतीनें शिकलेल्या मनुष्यास पैसे देऊन, त्याचा सल्ला घेण्याचे ऐवजीं त्याचें काम आपणांसहि करितां येईल. पण ही फार चुकीची गोष्ट आहे. शास्त्रीय ज्ञानाची किंमत आणि त्यांच्या विशेष कामांतील अनुभवाचें महत्व, यांचा दर्जा घर बांधणाऱ्या मनुष्यापेक्षां फार मोठा आहे व त्या ज्ञानाचा आणि अनुभवाचा लाभ इतर लोकांनीं करून घेतला पाहिजे. नीतिशास्त्र, युद्धशास्त्र, रसायनशास्त्र, तर्कशास्त्र, वैद्यशास्त्र, तसेंच शिल्पशास्त्रहि महत्वाचेंच आहे व त्या शास्त्रांत निष्णात अशांच्या मदतीखेरीज घर बांधणें म्हणजे गणपती करण्याचा इरादा असतां माकडाच्या मूर्ती तयार केल्याप्रमाणें बरेंच वेळां होतें.

याप्रमाणें सोईचें स्वतःचें घर असल्यापासून मानसिक, शारिरीक आणि संसारिक सुखहि अनुपमेय मिळत जाईल, यांत शंका नाहीं. सध्यां आपणांमधील मध्यम स्थितीचे नव्हेत, तर उत्तम स्थितींतील कांहीं कांहीं लोक, ज्या पद्धतीनें गृहसौख्याचा उपभोग घेतात, तें इतक्या कमी दर्जाचें असतें कीं, त्या स्थितीस पूर्ण मनुष्यस्थिति असें म्हणतां येत नाहीं. स्वयंपाकघरांतील अंधार व ओल हीं कित्येक घरांत तर मी मी म्हणत असतात. स्वयंपाक तयार करणारणीचे डोळे धुराच्या कोंडमाऱ्यानें निम्मे अंध होऊन जातात; स्वयंपाकघरांतील अडगळ एकीकडे सारूनच, भोजनाची पंगत मांडण्याचा प्रसंग येतो व एकीकडे धान्यानें भरलेले जस्ती डबे आणि दुसरीकडे अंथरुणाच्या वळकट्यांचा अव्यवस्थित ढीग पडलेला असतो व तशांतच गोठ्यांतील जनावरांच्या मळमूत्राची घाण आणि शौचकूपाची दुर्गंधी, हीं येतच असतात. अशा स्थितींत जगांतील आलेले दिवस लोटणारे सुखवस्तु मानवी प्राणी कमी नाहींत. अशा

नमुन्याचीं माणसें केवळ द्रव्यसंचयासाठींच असें करितात ; म्हणजे द्रव्यसंचय हीच जीविताची खरी इतिकर्तव्यता, असें त्यांस वाटत असतें. गरीबीमुळें असें करण्याचा ज्यांच्यावर प्रसंग येत असेल, त्यांना दोष देण्याला मार्गच नाहीं ; पण वरिष्ठ प्रतीचीं सुखें उपभोगण्याची ज्यांची ऐपत आहे, अशा गृहस्थांनीं कनिष्ठ स्थितींत जाऊं इच्छिणें, अनेक कारणांनीं दूषणीय आहे.

महत्वाकांक्षा हे उन्नतीचें बीज आहे आणि समाधान हा ऱ्हासाचा प्रारंभ आहे. आहे त्या स्थितीपेक्षां चांगली स्थिति आपली असावी, असें वाटूं लागणें हीच सुधारणेची पहिली पायरी आहे. रानटी स्थितींतील इंग्लंड, जगांतील श्रेष्ठ राष्ट्रांच्या पहिल्या प्रतींत येऊन बसलें. शुद्ध जंगली लोकांनीं व्यापिलेली अमेरिका, इंग्लंडच्याहि वर चढली आणि जपानांतील मूठभर लोकांनीं, चीनसारख्या बलाढ्य व पुरातन राष्ट्रासहि युद्धांत हार खावयास लाविलें. या सर्वांचें बीजहि महत्वाकांक्षेंतच आहे आयुष्यक्रमणाचे प्रमाण जितक्या उच्च दर्जास नेऊन पोंचवावें, तितका उंच दर्जा राखण्याची खटपट प्रत्येक मनुष्य करीतच असतो, व या खटपटीमुळें व्यक्तीव्यक्तीची होतां होतां सर्व राष्ट्राची सुधारणा होत असते; यासाठीं ऐपत असणाऱ्या प्रत्येक मनुष्यानें सुखाची इयत्ता योग्य रीतीनें वाढवेल तितकी वाढविण्याची वीरश्री धरणें, हा ऐहिक सुधारणेचा एक मार्ग आहे. आणीबाणी संकटसमयीं ज्यांचा उपयोग करितां येईल, असे कनिष्ठ प्रतीचे पदार्थ नेहमी राखून ठेवावे लागतात ; म्हणजे विपत्तिकाल कठिण भासत नाहीं, असा साधारण नियम आहे. जें राष्ट्र सुखाचे दिवसांत देखील कनिष्ठ प्रतीच्या आहारविहारानेंच संतुष्ट राहतें, त्यांतील लोकांवर दुष्काळासारखा एखादा प्रसंग आला तर, त्यावेळीं त्यांस उपजीविकेचें साधनच नाहीसें होतें, असा नियम आहे.

12864 15.10.66

सुकाळांत गहूं खाणारीं माणसें, दुष्काळांत जोंधळे, बाजरी खातात व सुकाळांत जोंधळे, बाजरी खाणारीं माणसें, दुष्काळांत नाचणे खाऊं लागतात. पण नेहमींच नाचणे खाणाऱ्या माणसांना दुष्काळांत कांहीं न खातां मरावें लागतें, हा अनुभव आपल्या देशांत तरी पूर्ण आहे. सारांश, व्यवहारांत खाणेंपिणें, ऐषआराम यांचें प्रमाण आपली ऐपत असून, कमी दर्जाचें ठेवणें हितावह नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

मनाप्रमाणें घर बांधून तयार झाल्यावर, त्यांतील सामानसुमान, कपडालत्ता, दागदागिने वगैरेंची व्यवस्था कशी ठेविली पाहिजे, याचा विचार केला पाहिजे, ह्मणून ते सर्व विषय एकेक घेऊन त्यांविषयीं विचार करूं.





# भाग तिसरा.

## गृहकृत्यांची जबाबदारी.



**गृहकृत्यांची जबाबदारी** पुरुषांपेक्षां बायकांवर जास्त असते व ती जबाबदारी पूर्णपणें अंगावर घेण्याजोगी ज्या घरांतील बायकांची मानसिक अगर शारिरीक स्थिति नसते, त्या संसारांत सुखोत्पत्तीचें प्रमाण, फारच कमी असतें, असा अनुभव आहे. घराच्या बाहेरील व्यवहारांत नवरा दक्ष व शहाणा असून, त्याची बरोबरची जोडीदारीणहि जर संसारकृत्यांत दक्ष व हुषार असेल, तर त्या संसारसुखाची किंमत अनुपमेय आहे, यांत शंका नाहीं. स्वकार्यदक्ष नसणाऱ्या स्त्रियांच्या संसाराला बरकत कधींहि येत नसते व त्या संसारांत सुखाचा लेशहि नसतो.

प्रपंचाची अंतर्व्यवस्था सर्वथैव बायकांच्या शिरावरच असते, यासाठी ती त्यांनीं कोणत्या रीतीनें करावी, हें येथें सांगणें अवश्य आहे.

**घरांतील सामान**—झाड जसें फुलांनीं व फळांनीं सुंदर दिसतें, किंवा स्त्री जशी दागिन्यांनीं सुशोभित दिसते, तसेंच घर हे

त्यांतील सामानानें सुरेख दिसत असतें. आपल्या लोकांत घर सशोभित करून राहण्याची चाल फारच कमी आहे. कोठें तरी व कसे तरी, आयुष्याचे दिवस काढावे, असा पुष्कळ लोकांचा समज आहे. शरीरसुख, मानसिकसुख आणि दृष्टिसुख यांविषयींची कल्पनाहि आमच्या लोकांत विशेष नाहीं, असें म्हणावें लागतें. एखाद्या गरीब साहेबाचा बंगला आणि आमच्यामधील साधारण श्रीमंत मनुष्याचें घर, यातील व्यवस्था जरी बरवर पाहिली, तरी आम्ही काय म्हणतों, त्याचें उदाहरण डोळ्यांसमोर पुढें उभें राहील. गरीबी आणि श्रीमती, यातील फरकामुळें व्यवस्थितपणाच्या सवयींत फरक व्हावा, असें ह्मणता येत नाहीं. श्रीमंताचे घरीं ५० खुर्च्या, २५ मेजें, २० कपाटे आणि १० दिवे असतात म्हणून ते तो व्यवस्थेनें मांडून ठेवितो व गरीबाचे घरीं या सर्व जिनसा एकेकच असतात, ह्मणून त्या त्यानें अव्यवस्थित टाकाव्या, हें युक्तीला शोभत नाहीं.

हिंदुपद्धतीच्या घरात सर्वात जास्त अव्यवस्थित भाग ह्मटला ह्मणजे स्वयपाकघरें. वास्तविक घराचा हा भाग ह्मटला ह्मणजे फारच नीटनेटका व स्वच्छ असावयास पाहिजे आहे व नियमानें थोडी काळजी घेत गेल्यास, आपलीं स्वयंपाकघरेंही चांगलीं नीटनेटकी दिसू लागतील, यात कांहीं शंका नाहीं.

**पाणी सांठविण्याचीं भांडीं**—आपल्या सध्यांच्या पद्धतीप्रमाणें हीं भांडीं अति घाणेरडीं व अपायकारक अशीं असतात. त्यांत एकदां पाणी भरून ठेविले ह्मणजे, ज्याला लागेल त्यानें, वाटेल तो तांब्या अगर तपेली घेऊन, त्यात बुडवावी व पाणी घ्यावें, अशी पद्धत सर्वत्र नजरेस येते; यामुळें निरनिराळ्या भांड्याच्या बुडाला जी माती अगर घाण लागलेली असेल, ती सर्व अखेर पाण्याच्या भांड्यांत जाऊन बसते. पिण्याचें पाणी निराळें आणि इतर खर्चाचें निराळें, अशी ज्या घरांत

व्यवस्था नसेल, तेथें सदर माती आणि मळ पर्यायानें माणसांच्या पोटांत जात असतील, यांत कांहीं शंका नाहीं. हा हलगर्जीपणा व आरोग्यशास्त्राचे नियमाविरुद्ध होत असलेला गुन्हा, अजिबात बंद करण्यासाठीं, पाणी सांठविण्याचीं मोठीं भांडीं व त्या संबंधाचीं इतर लहान भांडीं यांना

( १ ) आंतून चांगली कल्हई केलेली असावी.

( २ ) पाण्याचीं भांडीं नुसत्या जमिनीवर ठेवूं नयेत. त्यांचे खालीं घडवंची अगर तिवई, ठेवून तीं बुडाशीं फुटलीं आहेत कीं काय, हें समजण्याजोगी सोय असावी.

( ३ ) पाण्याच्या भांड्यांतून पाणी काढून घेणें असल्यास, धाकटीं भांडीं त्यांत बुडवून पाणी काढण्याची वहिवाट ठेवूं नये. पाण्याच्या भांड्याला खालच्या कडेस, पाणी बाहेर येण्याचा कांक लावावा व तो फिरवून पाणी घेत जावें.

( ४ ) पाण्याच्या प्रत्येक भांड्याच्या तोंडापुरतें झांकण भांड्यालाच सांखळीनें गुंतविलेलें अगर बिजागरीनें बसविलेलें असें असावें, व त्या झांकणाला बारीक बारीक भोंकें पाडलेलीं असावीं.

वर सांगितलेली व्यवस्था, खर्चाच्या पाण्यासंबंधानें झाली; परंतु पिण्याचें पाणी वरीलपेक्षांही जास्त काळजीनें व व्यवस्थेनें ठेविलें पाहिजे. यासाठीं आपआपल्या अनुकूलतेप्रमाणें प्रत्येक कुटुंबीय मनुष्यानें फिल्टरचा संग्रह करावा, हें चांगलें आहे. प्रथम एक अगर दीड रुपया खर्च केला म्हणजे, दर सहा महिन्यास केवळ १॥ अगर २ आण्यांत फिल्टरची उत्तम व्यवस्था करतां येते, पण ती देखील आपल्या कुटुंबांत दृष्टीस पडत नाहीं, याचें कारण अज्ञान हें नसून, हलगर्जीपणा हेंच आहे. कारण स्वच्छ, चांगलें, निरोगी, पाणी प्यावें हें समजतें ; तें

मिळण्याजोगीं साधनें सुसाध्य असतात व तीं मिळविण्यास द्रव्यानुकूलता पाहिजे, तीहि असते; पण तसें पाणी तयार करून, फारसे लोक पीत मात्र नाहींत तेव्हां याला अलगर्जीपणा म्हणू नये, तर काय ह्मणावें? हा आळस किंवा ही बेफिकिरी सोडून देणें, हें प्रत्येक संसारी मनुष्याचें कर्तव्य आहे. गरीबांचे फिल्टर वरील खर्चांत होतात. त्यापेक्षां श्रीमंती थाटाचें, पण स्वदेशी पाहिजे असल्यास, सोलापूर, सावंतवाडी किंवा मंगळूर येथें विकत मिळतें, त्यांतील वाटेल तें घ्यावें व त्याहीपेक्षां ऐटदार परंतु परदेशी पाहिजे असल्यास, विलायती मिळूं शकतें. यांपैकीं कोणतें घ्यावें, हा विषय या पुस्तकाचा नाहीं. आपल्या आपल्या ऐपतीप्रमाणें व हौसेप्रमाणें, वाटेल त्यानें वाटेल तें घ्यावें, पण पाणी फिल्टर करून घ्यावें, येवढाच प्रस्तुत विषयांतील मुख्य मुद्दा आहे.

पाणी पिण्यासाठीं लागणारीं, आपल्या हिंदु कुटुंबांत, जीं नेहमींच्या प्रचारांतील, म्हणजे तांब्या, गडवा, लोटी, चंपळी वगैरे भांडीं असतात, तीं त्या कामाला अगदींच निरुपयोगी आहेत. पाणी सांडूं नये म्हणून या भांड्यांचें अंग मोठें व तोंड लहान, अशी व्यवस्था केलेली असते खरी, पण वारंवार पाणी भरतांना, त्या भांड्यांच्या आंतील बाजूस जो मळ किंवा सूक्ष्म प्रमाणानें शेवाळ बसलेलें असतें, तें काढतां येत नाहीं व ह्मणून नेहमीं आपणास घाणेरडें पाणी पिण्याचा प्रसंग येतो. कुंजा, सुरई, गेळा आणि अलीकडे प्रचारांत येत चाललेले कर्नाटकी मळसूत्री तांबे, हे इतर रीतींनीं कितीहि सोईवार असले तरी, स्वच्छपणाच्या मानानें त कवडीमोल आहेत, यासाठीं या भांड्यांची सुधारणा झालीच पाहिजे व हीं अरुंद तोंडाचीं भांडीं जाऊन, त्याऐवजीं रुंद तोंडाचीं भांडीं प्रचारांत आलींच पाहिजेत.

पाणी पिण्याचीं धाकटीं भांडीं, ह्मणजे पेले, फुलपात्रें, कटोरीं व पातेल्या यांच्यासंबंधानें विरुद्ध लिहितां येण्याजोगें कांहीं नाहीं; कारण,

हीं भांडीं आंतून बाहेरून स्वच्छ ठेवण्याजोगीं त्यांची रचना केलेलीच असते. आपल्या लोकांत मुलांनीं पाणी पिण्यासाठीं किंवा मोठ्या लोकांना स्नानसंध्येच्या उपयोगी ह्मणून जी झारीची योजना केलेली असते ती मात्र अगदीं अप्रशस्त आहे, त्याचप्रमाणें लहान मुलांचे चंबू, गिंड्या व गडू यांचाहि उपयोग करणें स्वच्छतेच्या व आरोग्याच्या नियमाविरुद्ध आहे. साधारण नियम हाच लक्षांत ठेविला पाहिजे कीं, जें भांडें आंतून स्वच्छ करितां येत नाहीं, त्या भांड्याचा उपयोग कोणत्याच कामाकडे करूं नये.





# भाग चौथा.

## भांडीं.



स्वयंपाकाचीं भांडीं—यांविषयीं विशेष लिहिण्याजोगी गोष्ट म्हटली म्हणजे त्यांच्या रचनेंत जितक्या सोईचा समावेश व्हावयास पाहिजे आहे, तितक्यांचा झालेला नाहीं. या भांड्यांच्या स्वच्छपणाविषयीं हिंदु जातीचा व त्यांतूनहि विशेषतः ब्राह्मण जातींतील व्यवस्थेचा कित्ता जगांतील बऱ्याच जातींनीं घेण्याजोगा आहे. आपणास ज्यांच्या आचाराविषयीं थोडीबहुत माहिती होण्याचा संभव आहे, असे स्वच्छतेविषयीं शेखी मिरविणारे साहेबलोक, यांच्या पाकनिष्पत्तीचीं भांडीं असावीं तितकीं स्वच्छ नसतात, व ही व्यवस्था याच देशांत ते आल्यावर होते, कीं त्यांच्याहि देशांत असाच घाणेरडा प्रकार असतो, याचा तपास करितां, तिकडे हा प्रकार आढळून येत नाहीं, असें ऐकिवांत येतें. आमच्या देशांत ते लोक आल्यावर, त्यांना जे रोधपे व वाढपे मिळतात, ते इतक्या गलिच्छ वर्गांपैकीं असतात कीं, त्यांच्या शरीरांचा व पाण्याचा संबंध उभ्या वर्षांतून होत असेल कीं नसेल, याचीच शंका आहे. त्यांचे कपडे अति गलिच्छ असतात व आचारविचार देखील आरोग्यशास्त्रांतील

नियमांशीं जुळणारे नसतात. असे लोक साहेबलोकांचे रांधपे असल्यावर, मग त्यांचे हातून स्वयंपाकघरांतील व्यवस्था व ठाकठीकपणा चांगल्या प्रकारें रहात नाहीं, यांत नवल तें कोणतें? या वर्णनावरून असा मात्र नियम काढतां यावयाचा नाहीं, कीं ब्राह्मण लोकांचें स्वयंपाकघर म्हणजे अगदीं स्वच्छपणाचें माहेरघर! धार्मिक स्वच्छतेचा परिणाम आमच्या मनावर दृढतर झालेला असल्याकारणानें आम्ही या बाबतींत इतर कांहीं कांहीं लोकांपेक्षां जास्त स्वच्छ आहों, हें खरें, पण आहे तो स्वच्छपणा इतका एकदेशीय आहे कीं, त्यापासून सुखाचे ऐवजीं दुःखच जास्त प्राप्त होतें. समजून उमजून एखादी गोष्ट करण्यांत जितकें पुण्य किंवा पाप आहे, तितकें अंधपरंपरेनें करण्यांत नाहीं, हें शहाण्या मनुष्यांनीं कधींहि विसरतां कामा नये. स्नानविधि, स्वच्छ वस्त्र नेसणें, निराळें ठेवलेलें पाणी संध्यादि कर्मांना घेणें, दुसऱ्यास न शिवणें, वगैरे गोष्टींचा समावेश धर्मशास्त्रांत करण्यापेक्षां आरोग्यशास्त्रांत करणें बरें, असें आम्हांस वाटतें, हें तत्व न समजतां याच गोष्टी करीत बसणाऱ्यांचे हातून कशा चुका होतात, हें आपणांस सध्या रुढींत असलेल्या याच गोष्टींवरून दिसून येतें. मुकटा म्हणजे सोळा आणे सोंवळा, आणि इतर धूत वस्त्र म्हणजे ओंवळें; स्नानाची खरी थोरवी विसरून जाऊन, अंगावर कसलें तरी "दोन तांबे" पाणी घेतल्यानें शरीरशुद्धि होतें असें मानणें; संध्येला सोंवळ्यांतील पाणी पाहिजे, म्हणून कोणत्याहि घाणेरड्या घागरींतील पाणी घेणें, व आपणांपेक्षां दुसरा मनुष्य अधिक स्वच्छ आहे, अशी आपली खात्री असूनहि अपरिहार्य कारणासाठीं देखील त्यास न शिवणें, या गोष्टी विचारशक्तीच्या दर्शक नसून, अंधपरंपरेनें वागण्याची उत्कट इर्षा प्रगट करितात. तेव्हां सारांश काय, कीं प्रत्येक गोष्ट होतां होईल तों तत्व समजून करण्याची संवय ठेवावी, हें बरें.

आपल्या लोकांत जीं भांडीं स्वयंपाकासाठीं वापरतात, तीं स्वच्छ असतात, पण ती स्वच्छता धर्म राखण्यासाठीं पाळली जाते कीं आरोग्यासाठीं पाळली जाते, याविषयीं वर विचार केलाच आहे. आपल्या लोकांच्या स्वयंपाकघरांतील भांड्यांत मोठे दोष खालीं लिहिलेल्या दोन प्रकारचे असतात ; ( १ ) सर्व बाजूंनीं सारखी उष्णता पोंचेल अशा रीतीनें तीं केलेलीं नसतात. ( २ ) त्यांच्यांत, चुलीवर चढविण्याची व तेथून खालीं उतरण्याची सोय केलेली नसते.

पहिला दोष कांहीं अंशीं चुलीच्या रचनेमुळें आलेला असेल असे ह्मणावें तर, त्याच चुलीवर सरळ आकाराचीं भांडीं ठेविलीं तर अन्न लवकर व थोड्या खर्चानें तयार होईल, यांत शंका नाहीं. बुडाशीं लहान, गळ्याशीं बारीक व मध्येंच मोठीं, अशीं भांडीं स्वयंपाकाचे कामीं वापरूं नयेत हे उत्तम. पातेल्याच्या आकाराचीं भांडीं सर्व प्रकारानीं सोईचीं असतात. कारण ( १ ) त्यांस उष्णता सप्रमाण व एकसारखी लागते, ( २ ) त्यांत जिन्नस लवकर घालतां येतो, ( ३ ) व त्यांतून लवकर काढतांहि येतो. ( ४ ) तीं घांसण्याला श्रम कमी पडतात, व थोडक्या श्रमानें तीं स्वच्छ होऊं शकतात. यासाठीं असलीं भांडीं वापरावीं, हें चांगलें आहे.

स्वयपाकाचीं भांडीं सध्यां जीं प्रचारांत आहेत, तीं तापल्यावर खालीं उतरण्याची कांहीं देखील सोय केलेली नाहीं. प्रत्येक भांड्याला लांकडी मूठ असणें अगदीं अवश्य आहे. भांड्यांना मूठ लावण्याची पद्धत नसल्यामुळें, स्वयंपाक करणारणीची किती गैरसोय होते, त्याचा अनुभव सर्वांना पाहून तरी आहेच. लांकडी मुठींचीं भांडीं करण्याच्या संबंधानें सोंवळयाओंवळ्याचे नियम मोडले जातील, असें कित्येकांस वाटण्याचा संभव आहे. परंतु थोडका

विचार केला तर ती कल्पना व्यर्थ आहे, असें वाटल्यावांचून रहाणार नाहीं. मुठी लावणें त्या प्रसंगानुरूप काढतां घालतां येतील, अशा लाविल्यानें सर्वच नडी दूर होणाऱ्या आहेत.

चुलीवरील तापलेलीं भांडीं खालीं उतरण्यासाठीं, उत्तर हिंदुस्थानांतील लोक, कडची ह्मणून एक प्रकारचा चिमटा वापरीत असतात, त्याचा उपयोग आपल्या बायकांनीं कां करूं नये, हे कळत नाहीं. तो वापरण्यांत सुख व सोय असून, त्यांत धर्माविरुद्ध तर कांहींच नाहीं. आपल्या स्वयंपाकघरांत हातीं धरण्याच्या फडक्याचा उपयोग जो होत आहे, तो बंद करण्यांत नुकसान तर मुळींच नाहीं, नफा मात्र फार आहे.

**भांडीं स्वच्छ कशीं करावीं**—स्वयंपाकाचीं अगर इतर उपयोगाचीं भांडीं स्वच्छ करण्याच्या आपणांमध्यें ज्या पद्धति आहेत, त्या अनुभवानें चांगल्या ठरलेल्या आहेतच. परंतु त्यांहून जास्त फायद्याच्या व सुधारलेल्या पद्धतींचा उपयोग केला असतां, विशेष फायदा होण्याजोगा आहे, म्हणून त्या खालीं दिल्या आहेत.

**पितळेचीं भांडीं**—लांकडाच्या ओल्या राखेनें चांगलीं स्वच्छ निघतात व त्यांनां जिल्हईहि चांगली येते. ही राख एका फडक्यानें भांड्यांवर घांसावी व अशा रीतीनें आंतून बाहेरून भांडें स्वच्छ निघाल्यावर, एक कोरडें खरखरीत फडकें अगर खादीचा रुमाल घेऊन, तेंच भांडें नुसत्या कोरड्या राखेनें घांसावें व स्वच्छ पुसून ठेवावें. हींच भांडीं फार दिवस न वापरल्यामुळें त्यांवर घाणेरडे डाग पडले असतील तर, चिंच व मीठ एके ठिकाणीं करून त्या मिश्रणानें तीं प्रथम घांसावीं व मग राखेचा उपयोग करावा. भांडीं स्वच्छ करण्यासाठीं म्हणून एक प्रकारचा साबण असतो, त्याचाहि

उपयोग, ज्याला अनुकूल असेल त्यानें, करावा. अशा प्रकारचे जे साबण सध्यां उपयोगांत आहेत, त्यांत "मंकी ब्रँड" ह्मणून जो साबण असतो, तो सर्वांत उत्तम ठरलेला आहे.

**तांब्याचीं भांडीं**—वरील रीतीनेंच स्वच्छ होतात, पण तीं जर फारच गंजून गेलीं असतील तर "आक्झॅलिक ॲसिड" ह्मणून जो एक विषारी पदार्थ, औषधें विकणारांकडे मिळतो, तो पाण्यांत मिसळून, त्यांत तीं भांडीं कांहीं वेळ बुडवून ठेवावीं व नंतर घांसावीं.

**लोखंडाचीं भांडीं**—नुसत्या राखेनें स्वच्छ निघतात, परंतु तीं उपयोगांत नसतांना त्यांच्यावर जो गंज चढतो, तो चढूं नये, यासाठीं ताजी चुनकळी पाण्यांत विरवून, तो चुना त्या भांड्यांनां लावून ठेवावा, म्हणजे त्या भांड्यांनां गंज चढणार नाहीं, व कित्येक महिने जरी तीं उपयोगांत आणिलीं नाहींत, तरी स्वच्छ रहातील.

**चिनी मातीचीं भांडीं**-स्वच्छ करतांनां, ऊन पाण्याचा उपयोग करणें चांगलें. प्रथम, या भांड्यांत खाण्याचा पदार्थ शिल्लक राहिला असेल, तो सर्व काढून टाकून, तीं ऊन पाण्यांत बुडवून ठेवावीं, मग त्यांतील एकेक भांडें घेऊन नुसत्या ओल्या फडक्यानें तें स्वच्छ घांसावें, व त्यांच्यावर जी नक्षी असते ती आणि त्यांचे दस्ताने (मुठी) एखाद्या कुंचलीनें घांसावे, व तीं फिरून एकवार ऊन पाण्यांत बुडवून, मग खादीच्या कोरड्या फडक्यानें पुसून, एखाद्या फळीवर पालथीं घालावीं; तीं तेथें चांगलीं सुकलीं म्हणजे, कपाटांत अगर फडताळांत पालथीं घालून ठेवावीं.

**कांचेचीं भांडीं**—स्वच्छ करावयाचीं असल्यास 'ब्राऊन पेपर'चे तुकडे साध्या साबणांत भिजवून त्यांनीं तीं घांसावीं, किंवा कच्च्या

बटाट्यांच्या लहान लहान चकत्या काढून, त्या ऊन पाण्यांत टाकाव्या, व तें पाणी भांड्यांच्या आंतून बाहेरून फडक्यानें घांसावें, म्हणजे हीं भांडीं स्वच्छ निघतात. घांसल्याबर तीं अगदीं कोरडीं करून ठेविलीं पाहिजेत.

**दगडाचीं भांडीं**—स्वच्छ करतेवेळीं खालीं लिहिलेला रांधा तयार करून ठेवावा, व त्यानें तीं घांसावीं, म्हणजे त्यांच्या भेगांतून व छिद्रांतून देखील मळ राहणार नाहीं. १ तोळा खडूची पूड, १ तोळा कुजाची माती आणि २ तोळे सोडा, (शुद्ध पापडखार) असें मिश्रण वस्त्रगाळ करून ठेवावें, व तें ओलें करून या भांड्यांवर घांसावें, आणि तीं पाण्यानें धुवून व फडक्यानें कोरडीं करून ठेवावीं.

**लांकडाचीं भांडीं**—होतां होईल तों मुळींच वापरूं नयेत, व निरुपायानें वापरण्याचा प्रसंगच आला तर, त्यांत ओला पदार्थ कधींहि ठेवूं नये. लांकडाला ओलावा लागला म्हणजे तें कुजावयाचें, असा त्याचा धर्मच आहे, यासाठीं तसलीं भांडीं न वापरणें चांगलें. ओला पदार्थ म्हणजे लोणचें, भाज्या, आमटी वगैरे ठेवण्यासाठीं, या भांड्यांचा उपयोग करणेंच असेल तर, तीं आधणाच्या पाण्यांत बराच वेळ उकळून, मग कोरडीं करून ठेवावीं, हें बरें.

**मातीचीं भांडीं**-याविषयींहि वरील नियम ध्यानांत ठेवावा.

**चांदीचीं भांडीं**-स्वच्छ करण्यासाठीं प्रथम तीं ऊन पाण्यांत घालून ठेवावीं, नंतर धुऊन कोरडीं करून ठेवल्यावर कळीचा चुना पाण्यांत विरघळावा, व वस्त्रगाळ करून, तें मिश्रण भांड्यांवर दाट लावावें व वाळूं द्यावें. चांगलें वाळल्यावर फ्लानेलच्या एखाद्या फडक्यानें तीं भांडीं स्वच्छ पुसून ठेवावीं. असें केल्यानें त्यांतील मळ नाहींसा होऊन, त्याची जिल्हईहि कायम रहाते, व त्यांना

घेर मुळींच पडत नाहींत. संध्येच्या पळ्या, चमचे, किंवा नक्षी केलेलीं कांहीं भांडीं असतील, तर तीं स्वच्छ करतांना केंसाच्या ब्रशाचा किंवा कुंचलीचा उपयोग केलाच पाहिजे. त्या खेरीज भांड्यावरील मळ साफ निघूं शकत नाहीं. नक्षीदार भांड्यांच्या भेगांतून चुना न रहावा यासाठीं फार काळजी घेतली पाहिजे.





## भाग पांचवा.

### भांडीं कोठें व कशीं ठेवावीं



भांडीं ठेवण्याची जागा—आपल्या स्वयंपाकघरांत, घांसलेलीं भांडीं ठेवण्याची जागा म्हटली म्हणजे एखादी पांटी किंवा फार झालें तर, फळी असते. पाटींत भांडीं ठेविल्यानें,

(१) वाटेल तें भांडें सहज रीतीनें काढतां येत नाहीं.

(२) एकमेकांवर तीं घांसून त्यांना चरे पडतात.

(३) तीं उघडीं असल्यामुळें त्यांचे आंत घरांतील धुरळा जाण्याचा संभव असतो.

(४) स्वयंपाकघराची शोभा नाहींशी होते.

यासाठीं भांडीं पांटींत ठेवण्याची चाल अगदीं मोडून टाकिली पाहिजे. स्वयंपाकघरांत कपाटें अगर फडताळें करून, त्यांत तीं व्यवस्थेनें व सुरेख दिसतील, अशीं मांडून ठेवावीं. तीं एकमेकांवर पालथीं रचून ठेवणें चांगलें. तीं जातवारीनें लावून ठेविल्यानें त्यांचा उपयोग सहज करितां येतो. तपेलीं, पातेलीं, तांबे, वाट्या,

फुलपात्रें वगैरे भांडीं, जातवारीनें एकावर एक रचून ठेवावीं. ताटें, तबकें, आणि थाळे वगैरे भांडीं कपाटांतील आंतील बाजूस, त्यांचीं आंतील अंगें बाहेर करून, खिळ्याचे आधारानें लावून ठेवावींत. पळ्यांसाठीं कपाटांतच लांकडाची एक रीप सुमारें तीन बोटें रुंदीची घेऊन, तिला पळ्यांच्या आकारमानानें लहान मोठीं भोंकें पाडावीं व ती रीप कपाटांतील जाग्याचे सोईप्रमाणें बाजूला अगर समोर बसवून, त्यांत पळ्या, उलथनीं, झारे, कडच्या वगैरे जिन्नस व्यवस्थेनें लावून ठेवावे. सुऱ्या, चाकू, कात्र्या वगैरे ठेवण्याला देखील ही सोय चांगली आहे. चमचे, संध्येच्या पळ्या वगैरे लहान जिन्नस देखील ह्याच व्यवस्थेनें ठेविल्यास, स्वयंपाकघरास शोभा विशेष येणारी आहे. फुंकण्या, लाटणीं, वगैरे जिनसा कपाटांतच रुंद तोंडाचे हुक मारून त्यावर आडव्या ठेवाव्या, हें बरें, सारांश, स्वयंपाकघर हें अडगळ टाकण्याचें एक ठिकाण आहे, अशी कल्पना मनांत बाळगून, वाटेल ती वस्तू वाटेल त्याठिकाणीं टाकण्यापेक्षां प्रत्येक वस्तू जागचे जागीं ठेवून, स्वयंपाकघरास शोभा आणणें, हें प्रत्येक गृहिणीचें आदिकर्तव्य आहे, व तें प्रत्येक स्त्रीनें करावें हें उचित आहे. प्रत्येक वस्तू ठेवण्याची नियमित जागा ठरवावी व काम संपल्यावर ती त्या ठिकाणीं गेलीच पाहिजे, असा नियम ठेविल्यानें आह्मीं म्हणतों त्याप्रमाणें सहज होईल. सुख, साधेपणा आणि शोभा कशानें साधेल, या गोष्टींकडे प्रत्येक स्त्रीचें लक्ष असलें पाहिजे.





# भाग सहावा.

## कोठी.



स्वयंपाकघराशीं निकट संबंध असणारा घराचा दुसरा भाग म्हटला म्हणजे, कोठी होय. सालवेगमीचे सर्व जिन्नस या ठिकाणी साठवून ठेवण्याची आपल्या लोकांत चाल आहे. घराचा हा भाग स्वयंपाकघराचे शेजारीच असावा, असें मागे सांगितलेच आहे. कित्येक ठिकाणीं कोठीची जागा म्हणजे ओल, अंधार व अव्यवस्था यांचेहि भांडारघरच असते, परंतु अशी स्थिति चांगली नाहीं. धान्य ठेवणें ते उंच घडवंचीवर उजेडांत असें ठेवावें की, अमुक ठिकाणीं अमुक आहे, हें अगदीं परक्या मनुष्याला देखील कळावें. पुष्कळसें धान्य असल्यास तें पोत्यांत भरून, पोती शिवून तीं घडवंचीवर तोंडे बाहेरच्या बाजूस करून ठेवावी व कापडाच्या चौकोनी तुकड्यांवर, जिनसांचे नांव, वजन, माप, खरेदीची तारीख व दर अशी माहिती लिहून, ते तुकडे पोत्यांवर सहज नजरेस पडतील असे शिवून टाकावे. या कामासाठीं कापडी चकत्या विलायतेमध्यें मुद्दाम तयार केलेल्या असतात. त्यांचा उपयोग केला असतां सोय व शोभा या दोन्ही गोष्टी साधतील. त्यांची रचना अशी केलेली

असते कीं त्या पोत्याचें तोंडाशीं बांधण्यासाठीं त्यांना आंगचेंच मजबूत भोंक असतें. लिहिण्याला कागदाइतक्या सफेत व गुळगुळीत असतात; व त्या चुरून फाटण्याची मुळींच भीति नसते. त्यांना इंग्रजींत "जिब्ज" असें म्हणतात व त्यांची किंमत आकारमाना-प्रमाणें एक पैशाला दोनपासून दोन पैशांला एक अशी असते; या कापडी तिकीटांचा उपयोग करण्यापासून आणखी एक फायदा आहे तो हा, कीं प्रत्येक वेळीं पोत्यांतील धान्य किती काढून घेतलें; हें त्यांचे पाठीवर मांडून ठेवण्याची सोय असते. अशा प्रकारची सोय असल्यामुळें अमुक पोत्यांत किती धान्य होतें व त्यांतील किती काढलें आणि शिल्लक किती राहिलें, हें तावडतोब समजतें.

नेहमींच्या खर्चाला लागणारें धान्य जस्ती डब्यांतून ठेवण्याची जी पद्धत अलीकडे पडत चालली आहे, ती चांगली सोईची आहे, पण त्या डब्यांना काळा रंग देऊन, त्यांवर त्यांतील जिनसाचें नांव लिहून ठेवण्याची चाल पाडल्यास, जास्त सोय होऊन, कोठीला शोभाहि जास्त येईल, यांत कांहीं शंका नाहीं.





# भाग सातवा.

## भोजनाची जागा.



जेवणाची जागा—जीं कुटुंबें सुस्थितींत असतात, त्यांचीं स्वयंपाकघरें व जेवणाच्या जागा या बहुधा निराळ्या असतात. क्वचित् प्रसंगीं देवघर आणि जेवणाची जागा हीं एकाच ठिकाणीं असलेलीं पाहण्यांत येतात, व तोहि प्रकार कांहीं वाईट नाहीं. परंतु स्वयंपाकाची जागा व जेवणाची जागा एकच असणें हें मात्र केव्हांहि प्रशस्त नाहीं, असें ह्मणावें लागतें. अत्यंत गरिबीमुळें तसें करण्याचा प्रसंगच आल्यास, तें स्वयंपाकघर अति निर्मळ ठेवण्याची खबरदारी घेतलीच पाहिजे. अन्न शिजून तयार झाल्यावर जितकें मोहक दिसतें, व रुचकर लागतें, तितकेंच मोहक तें तयार होत असतांना दिसत नाहीं; याचा अनुभव पुष्कळांना आहे. पुरण, श्रीखंड, जिलबी, आंबरस, घिवर वगैरे पदार्थ, ताटांत वाढले ह्मणजे फार सुंदर दिसतात, पण ते बनवीत असतांना त्यांचा रंग व रूप पाहून मनुष्याला चिळस आल्याखेरीज रहावयाची नाहीं. एकंदरींत मतलब इतकाच कीं, स्वयंपाक करण्याची जागा, जेवणाच्या जागेशेजारींच, पण अगदीं निराळी असावी, हें बरें. जेवणाचे जागेंत इतर अडगळ नसावी.

ती जागा ठेववेल तितकी नीटनेटकी ठेवावी, व जेवण चाललें असतांना अंतःकरणाची वृत्ति आनंदांत राहण्याजोगी जेवढी म्हणून व्यवस्था करणें शक्य असेल, तेवढी करावी. पाश्चिमात्य राष्ट्रांतील-लोकांचें अनुकरण या गोष्टींत आपण करण्याजोगें आहे. त्यांच्यांतील एखादें गरीब कुटुंब घेतलें तरी, त्यांतील माणसांची जेवणाची म्हणून जी जागा केलेली असते, ती इतकी मोहक असते कीं, तेथील व्यवस्था, टापटीप, नीटनेटकेपणा आणि शोभा पाहून, आश्चर्य वाटतें. हात पुसण्याचे रुमालच असतात, पण ते पांढरे स्वच्छ असून, त्यांच्या नित्य नव्या नमुन्याच्या घड्या घालून, मेजावर मांडलेल्या असतात. भाकरीचे तुकडे मोहक आकाराचे कापून ताटांत वाढून ठेविलेले असतात. भाकरी बरोबर खाण्याचें लोणी कधीं गुलाबाच्या फुलाच्या आकाराचें तर कधीं पैलूदार हिऱ्यासारखें बनवून, एका लहानशा स्वच्छ ताटलींत वाढून ठेविलेलें असतें. दृष्टीला सुंदर दिसतील असे निरनिराळ्या रंगीत फुलांचे गुच्छ मेजावर मांडून ठेविलेले असतात, व आसपास देखील आणवेल तितकी शोभा आणलेली असते. निरनिराळ्या आकारांचीं व तऱ्हेतऱ्हेच्या रंगाचीं कांचपात्रें, कुशल कारागिरांनीं काढलेल्या तसबिरी, नितळ बिलोरी आरसे, चित्रविचित्र दिवे व लहानशा कुंड्यांतून लावलेलीं नाजूक झाडें, यांच्या योगानें भोजनाच्या जाग्याला किती तरी शोभा आणिलेली असते, याची कल्पना त्या लोकांत आपण मिसळून, ती शोभा डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहिल्याखेरीज येणार नाहीं. या वर्णनांशीं, आपणांला नेहमीं आपल्या घरीं जो देखावा दिसतो, त्याची तुलना केली तर, ते लोक आपणापेक्षां किती पुढें गेले आहेत, याची कल्पना चटकन् होते. त्यांचा तो थाट पाहून आपणास वाटतें कीं, तीं स्वर्गलोकचीं माणसें आहेत व आपण मृत्युलोकावरील एखाद्या जंगलांतील रानटी जनावरें आहोंत. आतां ही तुलना अतिशयोक्तीची

आहे, हें जरी खरें, तरी त्यांच्या स्थितींत व आपल्या स्थितींत जमीन-अस्मानाचें अंतर आहे, असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं, व हा फरक इतका स्पष्ट करून दाखविण्याचा हेतु इतकाच आहे कीं, आपल्यांतील प्रापंचिकांचें लक्ष त्या गोष्टींकडे जाईल तितकें चांगलें.





# भाग आठवा.

## भोजनाविषयीं.



भोजन समारंभ—या विषयासंबंधानें लिहितांना आणखीहि कांहीं इतर गोष्टींचा उल्लेख करणें जरूर वाटतें. आमच्यांत सुरू असलेल्या पद्धतीप्रमाणें जेवणाच्या वेळांत,

(१) नियमितपणाचा बराच अभाव असतो; जेवण कधीं कधीं घरांतील पुरुषाच्या मर्जीवर व कधीं स्वयंपाकिणीचे मर्जीवर, असा प्रकार पुष्कळ ठिकाणीं असून, अमुक वेळीं जेवावयाचेंच, असा वेळ मुकरर केलेला नसतो; हें ठीक नव्हे. दोन प्रहरचें, तसेंच रात्रीचें जेवण अमुक वेळीं व्हावयाचेंच, असा नियम ठेवणें फार चांगलें आहे. असें केल्यानें (अ) प्रकृती चांगली राहते, (ब) बाकीच्या व्यवहाराला नियमितपणा येतो, व (क) प्रपंचांतील शिस्त वाढते.

(२) स्त्रीपुरुषांच्या पंक्ती एकत्र होणें फार इष्ट आहे. यावर पुष्कळसे आक्षेप निघण्याजोगे आहेत, परंतु अगदीं परकीय स्त्रिया आणि परकीय पुरुष, यांच्या पंक्ति व्हाव्यात, असा या लिहिण्याचा उद्देश नाहीं. एकाच कुटुंबांतील स्त्रिया व पुरुष यांचे भोजनसमारंभ एकाच पंक्तींत बसून होणें इष्ट आहे. आपणांतील नेहमींची पद्धत म्हणजे सर्व पुरुषांनीं आधीं जेवण करावें, व मागाहून सर्व बायकांनीं जेवावें, अशी आहे.

ही पद्धत पडण्याचीं कांहीं कांहीं कारणें योग्यच आहेत, पण ज्या ठिकाणीं स्त्रीपुरुषांनीं एका पंक्तीस बसून जेवणाची पद्धत अमलांत आणण्यास कांहींच हरकत नाहीं, अशा प्रकारच्या भोजनसमारंभांत जी आनंद-प्राप्ति आहे, तिचें वर्णन करणेंहि कठिण आहे. परस्परांवर प्रेम करणारीं स्त्रीपुरुषांचीं जोडपीं, एके पंक्तीस बसून, सुखासमाधानें आनंदाच्या गोष्टी बोलत जेवीत आहेत, असा समारंभ पाहणाऱ्यालाहि आनंद होतो, मग प्रत्यक्ष त्या समारंभाचा अनुभव घेणाराला तो किती होत असेल, याची कल्पना वाचकांनींच करावी. मराठी भाषेंतील सन्माननीय विद्वान कवि **ले० क० डॉ० कीर्तिकर**, या विषयासंबंधानें लिहितांना ह्मणतात कीं, परिचित स्त्रीसमाजांत बसून जेवण्याइतकें सुख फारच दुर्मिळ आहे. या सुखाचा त्यांनीं अनुभव घेतला आहे, व त्यांचे हें वरील मत, ऐकीव माहितीवर दिलेलें नसून, स्वतःच्या अनुभवानें दिलेलें आहे. ज्या कुटुंबांत एकच पुरुष व एकच स्त्री असते, त्या ठिकाणीं असल्या सुखप्राप्तीचीं आशा देखील करणें व्यर्थ; पण जेथें अनेक स्त्रिया आहेत, त्या ठिकाणीं श्रमविभागाचें तत्व लागू केलें तर, आह्मी ह्मणतों ती सोय सहज होण्याजोगी आहे. अनेक स्त्रियांपैकीं पाळी-पाळीनें एकीकडे वाढण्याचें काम सोंपवून, बाकीच्यांनीं पुरुषांबरोबर जेवणास बसण्यापासून नुकसान व गैरसोय कांहींच होणार नाहीं, असें कांहीं लोकांच्या अनुभवावरून देखील ठरलें आहे. मनाचा मोकळेपणा, प्रेमाची उत्पत्ति आणि अकृत्रिम स्नेहाचें बीज, हीं पैदा होण्यास हे भोजनाचे प्रसंग जितके उपयोगी आहेत, तितकें उपयोगी साधन दुसरें कोणतेंहि नाहीं; व असे प्रसंग प्रत्येक कुटुंबांत जितके येतील तितके चांगले, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. अगदीं परके पाहुणे आपले घरीं आले असतां, किंवा मोठमोठ्या भोजन-समारंभाचे वेळीं, स्त्रीपुरुषांचे मिश्र भोजनसमारंभ करणें, आमच्या हिंदु कल्पनेप्रमाणें गैर आहे, व तसें करण्याचें विशेष कारणहि कांहीं

दिसत नाहीं. पण स्वतःच्या घरीं, किंवा अगदीं परिचित असे स्नेही किंवा इष्टमित्र आले असतां, त्यांच्या सहवासांत असले भोजन-समारंभ होणें, गैरवाजवी नाहीं; असा पुष्कळांचा अनुभव आहे. ज्या कुटुंबांत एकच स्त्री असून, तिच्यावरच सर्व कामाचा बोजा पडत असेल तेथें ही गोष्ट घडून येणें अशक्य आहे, व तशा ठिकाणीं आह्मीं ह्मणतों तसा फरक करावा, असें म्हणण्याचा आमचा उद्देशच नाहीं.

भोजनाची वेळ आपल्या इकडील हवामानाप्रमाणें सकाळीं १० ते १२ व संध्याकाळीं ७ ते ८ अशी असावी. भोजन झाल्या-बरोबर चालण्याचें किंवा इतर कोणतेंच काम करणें चांगलें नाहीं. भोजनोत्तर एक तास तरी निदान विश्रांति घेऊन, मग कामास लागावें. रात्रीचें भोजन आणि निद्रा घेणें यांत, कमींत कमी २ तास तरी गेलेच पाहिजेत ; अशा रीतीनें ज्याच्या त्याच्या सोई-प्रमाणें भोजनाची वेळ ठरवावी. पानावर बसून लागेल तेवढें एकवार खाणें, आरोग्यशास्त्राचे नियमाप्रमाणें हितावह आहे. सकाळीं उठल्याबरोबर चहा किंवा कॉफी, नंतर एखादा लाडू, नंतर जेवण, मग मधला फराळ, नंतर रात्रीचें जेवण व त्यानंतर थोडीशी मुखशुद्धि असें करण्याची ज्याला संवय असते, त्याच्या जठराग्नीला विश्रांति ह्मणून केव्हांच नसते, व पचनक्रियेचें काम चांगलें चालत नाहीं; यासाठीं वारंवार थोडेंथोडें खाण्याची संवय चांगली नाहीं, हें उघड आहे.

नेहमींच्या जेवणाचेवेळीं व विशेषतः कोणी परकीय गृहस्थ जेवावयास यावयाचे असतील तेव्हां, जेवणाचे ठिकाणीं घरांतील लहान मुलांचा गोंधळ न होईल, अशी व्यवस्था ठेवणें, हें प्रत्येक गृहिणीचें व गृहस्थाचें कर्तव्य आहे. घरांतील मुलांस आधीं जेवण घालून, घरांतच एकीकडे त्यांस खेळांत अगर इतर रीतीनें गुंतवून टाकिल्यानें, ही गोष्ट सहज साध्य होण्याजोगी आहे. प्रौढ मुलें

व मुली पंक्तीस बसल्या तरी, हरकत नाहीं. पण पाहुणे मंडळीच्या मनाला त्रास होईल, किंवा त्यांचें घरांतील स्त्रीपुरुषांबरोबर जें भाषण चाललें असतें, त्याला व्यत्यय येईल, असें कोणतेंहि कृत्य होऊं नये, अशी व्यवस्था मालकांनीं ठेवावी. परकीय गृहस्थ व घरचे पुरुष, यांचें कांहीं विषयांवर बोलणें चाललें असतां, मध्येंच घरांतील लहान मुलानें रडावयास सुरवात करणें, किंवा मोठ्यानें ओरडणें, हें किती वाईट आहे, याची कल्पना आपण कोणाच्या घरीं जेवावयास गेल्यावर, तसा प्रकार झाला म्हणजे आपणास कसें वाटतें, त्यावरूनच करावी.

अन्न शिजविण्याचीं भांडीं व अन्न वाढण्याचीं भांडीं कधींहि एक असूं नयेत. कारण स्वयंपाक केलेलीं भांडीं दिसण्याला वाईट असतात, व अन्नाचे ओघळ वगैरे त्यांवरून जाऊन, तीं ओंगळ झालेलीं असतात, यासाठीं तीं पंक्तींत कधींहि आणूं नयेत. वाढण्याचीं भांडीं अगदीं लखलखीत व स्वच्छ असून, त्यांतून पदार्थ घेऊन वाढणें, तो कधींहि हातांनीं वाढूं नये. प्रत्येक पदार्थ वाढण्यासाठीं चमचा, डवला, पळी अगर डावल वगैरे साधनांचा उपयोग केला तर दिसण्यांतहि फार चांगलें दिसतें, आणि बोटांच्या नखांतून जें विष किंवा मळ असतो, तो परंपरेनें पोटांत जाण्याची भीति रहात नाहीं. वाढण्याच्या भांड्यांत ऊन पदार्थ घातल्यानें तीं तापणें स्वाभाविकच आहे. यासाठीं हात भाजूं नये म्हणून, त्यांना धरण्याजोग्या मुठी लाविलेल्या असाव्या. फडक्याचा उपयोग या कामासाठीं करण्याची आपल्या लोकांत चाल आहे, ती सोईवार आहे खरी; परंतु तें फडकें असावें तितकें स्वच्छ रहात नाहीं, असा अनुभव आहे, व स्वच्छ ठेविलें तरी त्या फडक्याच्या योगानें भांडें धरतांना कधींकधीं फडक्याचा भाग अन्नांत जाऊन पडतो, व कधींकधीं फडकें आंवरून धरलें नाहीं तर तें लोंबत राहून

पानांतील पदार्थावरही त्याचें शेवट येऊन पडतें, असा अनुभव आहे. यासाठीं फडकें किंवा पानें यांचेऐवजीं मुठीचीं भांडीं, किंवा कढच्या, यांचा उपयोग करावा, हें सोईवार दिसतें.

अन्न वाढणारा पुरुष असो अगर स्त्री असो, त्यांनीं वाढतांना आपलीं शरीरें स्वच्छ करून व स्वच्छ कपडे नेसून, अगर अंगावर घेऊन पंक्तींत यावें, ही गोष्ट विशेष लक्षांत धरण्याजोगी आहे. आपल्या लोकांतील आचारी, स्वयंपाकाच्या बाया व मराठे लोकांतील सोंवळेकरी यांचे या वेळचे कपडे व ते नेसण्यासवरण्याची पद्धत पाहिली म्हणजे खरोखर किळस येते. ज्या ठिकाणीं मोठमोठ्या श्रीमंत लोकांच्या स्त्रिया, वयांत आलेल्या मुली, व कुमारिका, पंक्तीस बसलेल्या आहेत, अशा ठिकाणीं, अंगावर घामाच्या धारा चाललेल्या आहेत, शरीरावर कोठेंकोठें काळे डाग पडलेले आहेत, व पुरता गुडघ्यापर्यंतहि पोंचत नाहीं, असा फाटका व मळकट पंचा नेसलेला आहे, असा एखादा धटिंगण आचारी, भाताची मोठी थोरली परात घेऊन, पंक्तींतून मुसंडी मारून जात आहे, हा देखावा नाजूक मनाच्या स्त्रियांस खरोखर असह्य असतो, व अशा प्रसंगीं त्या केवळ मुठींत नाक धरून वेळ मारून काढतात, असा अनुभव बहुधा सर्वत्र आहे, यासाठीं ही शिस्त बदलणें अगदीं अवश्य आहे. स्वयंपाक करणाऱ्या बायांनीं पंक्तित वाढतेवेळीं स्वच्छ कपडा आंगभर नेसणें, यांत पूर्वापार रीतीचें व धर्माचें उल्लंघन केलें, असें म्हणतां येणार नाहीं, व चालू असलेल्या पद्धतींत थोडकासा फरक केल्यानें ही गोष्ट साध्य होणारी आहे.

जेवणाची जागा एकच असल्यानें, ती वारंवार सारविली जाते, व शेणाचे पोपडे धरतात, यासाठीं ती वारंवार बदलीत जावी, किंवा तशी सोय नसेल तर, ताटाखालीं मोठा पाट घालून ठेवावा हें बरें. याच्या योगानें सर्व खरकटें पाटावर सांडून, जमिनीचा

व अन्नाचा संबंध कमी येईल, व सारवण्याचे श्रम बरेच वांचतील. कांहीं श्रीमंत लोकांच्या घरीं असा परिपाठ आहे व इतरहि एक दोन ठिकाणीं ही पद्धत सुरू केलेली आम्हीं पाहिली आहे. तींत सुख सोय व शोभा, या तिन्ही गोष्टी साधून, देशस्थिति व धर्मरीति यांचें उल्लंघन मुळींच होत नाहीं. तेव्हां ती अमलांत आणण्यास कांहीं हरकत नाहीं.

आमच्या प्रांतांत होणारे भोजनसमारंभ ह्मणजे सहस्रभोजनें, मुक्तद्वार, रमणे किंवा भंडारें, यांचे देखावे खरोखरीच सुखकारक नसतात. इतका मोठा समाज एकत्र बसेल एवढी विस्तीर्ण जागा अनुकूल नसते, व असलीं पुण्यकृत्यें करण्याची हौस तर फार; यामुळें सडकांवर देखील पत्रावळी मांडून, येणाऱ्या जाणाऱ्यांच्या वर्दळींत हे भोजनसमारंभ उरकून घेतले जातात, हें चांगलें नाहीं. या धर्मकृत्यांची गोष्ट सोडून दिली, आणि केवळ हौसेसाठीं ह्मणून आपण जीं जेवणें लग्नमुंजींचे वेळीं घालतों, त्यांची स्थिति पाहिली तरीहि साधारणपणें तोच प्रकार दिसून येतो. यासाठीं आमचें ह्मणणें असें आहे कीं, बाकीच्या सर्व सोई जमविण्याचें ज्याला साधन नाहीं, त्यानें आपल्याला अनुकूल असेल, अशा संकुचित जागेंतच जितक्यांचा समावेश उत्तम रीतीनें करतां येईल, तितकींच पानें प्रत्येक वेळीं मांडावीं, व स्नेही आणि आप्त यांचा भोजनानें आदर करावा. अशा कृत्यासाठीं मुद्दाम तयार केलेल्या सार्वजनिक जागा असतील तर खरोखर हे समारंभ करणाराला व तशा जागा करणाराला चांगला फायदा होईल; पण ती सोय जोंपावेतों झालेली नाहीं, तोंपावेतों आह्मी आपले भोजनसमारंभ भर रस्त्यावर, गटारांचे कांठावर, व कधींकधीं त्याहीपेक्षां गलिच्छ ठिकाणीं उरकून घ्यावे, हें चांगलें नाहीं. व्यवस्थितपणें होत असेल तर ज्याला अनुकूल आहे,

त्यानें सहस्रभोजनें नव्हे, लक्षभोजनें देखील घालावींत, पण त्यांत व्यवस्था, टापटीप, नियमितपणा, शोभा, सुख व सोय हीं अवश्य असलींच पाहिजेत.





# भाग नववा.



## मुलांनीं काय करावें तें.

प्रौढ मुलें आणि मुली यांनीं विशेष लक्षांत ठेवण्यासारख्या गोष्टी खालीं दिल्या आहेत. अज्ञान मुलें व मुली यांचा दंगा व गोंधळ अशा प्रसंगीं न होईल तितका बरा, असें मागें सांगितलेंच आहे. आतां प्रौढ मुलांनीं अशा प्रसंगीं कसें वागावें, तें सांगतों.

(१) हात, पाय, तोंड व नाक स्वच्छ धुतल्या-शिवाय जेवावयास व फराळ करावयास देखील कधींहि बसूं नये.

(२) हात धुतांनां, विशेष खबरदारी नखांची घ्यावी, व त्यांतील मळ अगदीं साफ काढून टाकण्याची संवय ठेवावी.

(३) नेहमीं घालावयाचे कपडे जेवणाचे वेळीं अंगावर असूं नयेत. वस्त्रांतर करून भोजनास बसणें, फार हिताचें आहे. वस्त्रांतर करतेवेळीं स्वच्छतेकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. सोंवळें म्हणजे स्वच्छता, असा मूळ अर्थ आहे खरा, पण अलीकडे तो बदलत जाऊन कधींकधीं फार घाणेरड्या वस्तूंचा देखील सोंवळ्यांत समावेश होऊं लागला आहे, हें चांगलें नाहीं.

(४) आपण जर लोकांचे घरीं जेवावयास गेलों असलों तर, त्यानें केलेल्या व्यवस्थेबद्दल कोणत्याहि रीतीनें आपण नाराज झालों

आहों, असें दाखवूं नये. आपणास न आवडेल अशी एखादी गोष्ट तेथें असल्यास, ती मनांत ठेवावी. चर्येनें किंवा शब्दानें ती उघड करून दाखवूं नये.

(५) आपल्या घरीं लोक जेवावयास आले असतां, त्यांनीं भोजनास सुरवात करण्याचे आधीं, आपण करूं नये. ब्राह्मण लोकांत "आपोशान" घेतांना "आपण घ्या" "आपण बसा" असें म्हणण्याचा जो शिष्टाचार आहे तो पाळणें फार चांगलें आहे; मात्र त्या शिष्टाचाराचा अतिरेक होऊं न देण्याविषयीं खबरदारी घ्यावी.

(६) जेवतांना सर्व हात अन्नानें न भरेल अशा रीतीनें जेवावें, परंतु अन्न म्हणजे एक अगदीं वाईट पदार्थ आहे व तो हाताला न लागेल, तितका बरा, अशा रीतीनें दोन बोटांनीं किंवा तीनच बोटांनीं घांस घेणें, हेंहि चांगलें नाहीं. पहिला प्रकार ओंगळवाणा दिसतो व दुसरा प्रकार आपण अति चोखंदळ व बढाईखोर आहों, असें दाखवितो; तेव्हां हे दोन्ही प्रकार वर्ज करावे, हें बरें.

(७) जेवणें हें यःकश्चित् काम असून, ते कसें तरी उरकून घ्यावें, म्हणून जेवण जेवणें, तें भराभर जेऊन टाकावें, असें करणें चांगलें नाहीं. घांसावर घांस घेणें व न चावतां गिळणें, यांपासून पचनक्रिया चांगली होत नाहीं व तसेंच एखाद्या मंद मनुष्याप्रमाणें सावकाश रवंथ करीत बसणें, हेंहि योग्य नाहीं.

(८) जो पदार्थ उत्तम असेल, तो आधीं लोकांस वाढावा व नंतर आपण घ्यावा.

(९) जेवतांना एकवार "सावकाश जेवावें" असें अदबीनें म्हणण्या पलीकडे, आग्रह करून वाढणें, चांगलें नाहीं. आग्रह करण्याची रीत अगदीं सोडून द्यावी.

(१०) अन्नांत केंस अगर इतर कांहीं पदार्थ दिसला तर, अशा रीतीनें तो काढून बाहेर टाकावा कीं, दुसऱ्यास तें दिसूं देखील नये व किळस उत्पन्न होऊं नये.

(११) टाकावें लागेल, इतकें अन्न पानांत कधींहि घेऊं नये व नाइलाजानें टाकण्याचा प्रसंग आलाच तर, तें अन्न खाण्याची दुसऱ्याला किळस येऊं नये, अशा रीतीनें टाकावें.

(१२) पंक्तींतून मध्येंच उठूं नये व पंक्तीच्या मागें आपलें जेवण जेवीत बसूं नये. सर्वांबरोबर आपणास उठण्यास होईल, अशा बेतानें जेवावें. स्वतःचे घरीं हा नियम विशेष प्रकारें न पाळला तरी हरकत नाहीं, पण दुसऱ्याचे घरीं मात्र तो मोडतां कामां नये.

(१३) जेवण झाल्यावर सुमारें अर्ध्या तासानें पाणी पिण्याचा नियम ठेवावा. जेवणाचे मध्येंच पाणी पिऊं नये.

(१४) जेवण संपल्यावर परमेश्वराचें व अन्नदात्याचें स्मरण केल्या-खेरीज कधींहि पानावरून उठूं नये, व परक्याचे घरीं आपण जेवा-वयास गेलों तर, त्यानें केलेलें आदरातिथ्य व त्याची व्यवस्था आणि अन्नाचे प्रकार, यांनीं आपण पूर्णपणें खुष झालों आहों, असें मोठ्या अदबीनें दर्शविणें, आपलें कर्तव्य आहे.

(१५) खाकटे हात व तोंड स्वच्छ धुऊन, दांतांच्या फटींत अन्नाचा कांहीं देखील अंश रहाणार नाहीं, अशा रीतीनें ते धुऊन व पुसून स्वच्छ करावे.

---



# भाग दहावा.

## शेज आणि शेजघर.



निजण्याची जागा-ही होतां होईल तों तळमजल्यावर असूं नये. वरच्या मजल्यावर ही जागा असल्यानें, स्वच्छ हवेचा जास्त पुरवठा मिळूं शकतो व निश्र-स्तपणाहि जास्त असतो. निजण्याचे जाग्याच्या खिडक्या इतर ठिकाणच्या खिडक्यांपेक्षां कांहीं निराळ्या प्रकारच्या असल्या पाहिजेत. जास्त उजेड झोंपेचा विघातक आहे. मंद प्रकाश व साधारण अंधार, या दोन गोष्टी झोंपेला अनुकूल आहेत. तेव्हां प्रकाश बंद ठेवून, हवेचा प्रवाह उत्तम चालेल, अशी खिडक्यांची रचना असणें, अवश्य आहे.

इंग्लंडांतील हवा अती थंड आहे. त्या ठिकाणीं खिडक्यांची रचना करणें फार कठीण आहे. कारण फक्त शुद्ध हवा घरांत यावी व थंडी मात्र घरांत शिरूं नये, अशी व्यवस्था तिकडे करणें जरूर पडतें. तशी भीति आपल्या देशांत कांहींच नाहीं. तेव्हां इंग्रजांच्या देशांत प्रचारांत असलेले, जे खिडक्यांचे प्रकार आहेत, ते आपल्या इकडे लागू करण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. पुरेशी उष्णता, आपणास वाटेल, तेव्हां मिळतच असते. फक्त

स्वच्छ हवेचा प्रवाह कोणत्या युक्तीनें आणतां येईल, व त्याबरोबर शिरणाऱ्या उजेडाचा प्रतिकार कसा करितां येईल, येवढेंच आपणांस पहावयाचें आहे.

निजण्याचे खोलीला पूर्वपश्चिम खिडक्या अवश्य असल्या पाहिजेत व त्या सर्व दिवसभर उघड्या असून, त्या खोलींत हवा खेळती राहिलीच पाहिजे. दक्षिणोत्तर खिडक्या नसल्या तरी चालेल. खिडक्यांची मापें ४×२½ फूट अशीं असतलि तर उत्तमच, पण किमान पक्ष ३×१½ फुटां पेक्षां कमी तरी नसावीं. या खिडक्या असून खेरीज जमिनीच्या सपाटीबरोबर दोन दोन फुटांच्या अंतरानें १½×१ फूट या मापाच्या खिडक्या बसविलेल्या असून, त्या जाळीच्या पत्र्यानें बंद असतील, अशी व्यवस्था असावी, व खोलीच्या भिंतीच्या अगदीं वरच्या अंगास दोन दोन फुटांच्या अंतरावर खालच्या प्रमाणेंच खिडक्या असाव्या. पूर्वपश्चिम असलेल्या मोठ्या खिडक्या रात्रीं उघड्या ठेवून निजूं नये. कारण हवेचा प्रवाह अंगावर घेऊं नये, असें वैद्यशास्त्राचें तत्व आहे. या खिडक्या बंद ठेविल्या तरी जमिनीच्या सपाटीबरोबर ज्या खिडक्या असतात, त्यांतून स्वच्छ हवेचा पुरवठा एकसारखा होत असतो. ती हवा खोलीभर खेळून, तींत श्वासोच्छ्वासानें दूषित झालेली हवा मिसळून उष्ण व हलकी होते, आणि ती खोलीच्या वरच्या खिडक्यांतून बाहेर जाते. अशा रीतीनें प्रखर प्रकाश डोळ्यांना इजा देत नाहीं व स्वच्छ हवेचा सतत पुरवठा चाललेला असतो. जमिनीबरोबर ज्या खिडक्या ठेवावयाच्या, त्यांना बाहेरील अंगानें उतार असावा व कडीपाटा-बरोबर ज्या खिडक्या असतील, त्यांना आंतील अंगानें उतार दिलेला असावा.

---



# भाग अकरावा.

## निद्रा.




झोंप व तिची अवश्यकता—झोंप ही मनुष्याला इतकी अवश्य आहे कीं, झोंपेशिवाय जिवंत रहाणेंच शक्य नाहीं. जागृतावस्थेमध्यें आपल्या शरीराचा प्रत्येक अवयव व प्रत्येक इंद्रिय कोणत्या तरी प्रकारचें काम करीत असतें व त्या कामापासून शरीरांत एके प्रकारचे दूषित वायु ( Oxidised products ) उत्पन्न झालेले असतात. हे दूषित वायु शरीराच्या बाहेर घालविण्यासाठीं, शरीराचे आंतील व्यापार कांहीं वेळ बंद ठेवावे लागतात. कारण, आपण अशी कल्पना करूं कीं एखादी गिरणी घांसून पुसून स्वच्छ करावयाची असली तर, ती कांहीं वेळ बंद ठेवणें जरूर आहे. किंवा घड्याळें नीट करणाराला आपण सांगितलें कीं घड्याळ साफ करून दे, तर तोहि ह्मणेल कीं, तें कांहीं वेळ बंद ठेविल्याखेरीज साफ करतां यावयाचें नाहीं. तसाच प्रकार शरीराचाही आहे. दूषित झालेले वायू, श्वासोच्छ्वास, घाम, आणि रोमरंध्रें, यांतून बाहेर पडण्यासाठीं शरीरांतील एकंदर यंत्रांना कांहीं वेळ विश्रांति लागते व ती विश्रांति झोंप ही होय. काळीज एकसारखें काम करीत असतें, असें ह्मणण्याची चाल आहे, परंतु वास्तविक त्याची क्रिया सतत सुरू नसते.

काळजाचे जे दोन ठोके पडतात, त्यांचे दरम्यान तें कांहीं काळ विश्रांति घेतच असतें, व त्याच्या एकंदर विश्रांतीचें गणित केलें तर असें दिसून येईल कीं, चोवीस तासांपैकीं ११ तास त्याचें काम चाललेलें असतें व तेरा तास तें विश्रांति घेत असतें. यावरून विश्रांतीचें महात्म्य किती आहे, त्याची सहज कल्पना होते. हा नियम केवळ काळजालाच लागू आहे, असें नाहीं. शरीरांतील धमन्या, नाड्या, शिरा, मज्जातंतू आणि पचनव्यापाराचीं सर्व इंद्रियें, यांना देखील नेहमीं काम करण्याची संवय नसते; कांहीं वेळ काम व कांहीं वेळ विश्रांति, असा प्रकार त्यांचाहि आहे व त्याच मानानें काळजाचाहि आहे. काळजाला पूर्ण विश्रांति निद्रावस्थेंत मिळते. परंतु यावरून असें मात्र कोणी समजूं नये कीं, त्या अवस्थेंत काळीज अगदींच स्तब्ध असतें. तसें होणें तर शक्यच नाहीं. त्यावेळीं काळजाचें काम सावकाश चाललेलें असतें, एवढेंच कायतें. मध्यरात्रीच्या नंतर दोन तास काळजाचा व्यापार अगदींच मंदगतीनें चाललेला असतो व त्यावेळीं मनुष्य जाग्रण करूं लागला तर तो दीर्घायुषि कधींहि होणार नाहीं. जेवण झाल्यानंतर दोन तासांनीं झोपीं जावें, असें मागें सांगितलेंच आहे. दिवसा निजणें प्रकृतीस हितावह नाहीं, व रात्रीस जाग्रण केल्यानें आयुष्य कमी झाल्याखेरीज रहाणार नाहीं.

प्रत्येक मनुष्यानें अमुकच तास झोंप घ्यावी, हें ठरविणें कठिण आहे, तरी साधारणपणें सदृढ व ज्वान मनुष्याला ७ किंवा ८ तास झोंप मिळाली म्हणजे पुरे आहे. लहान मुलांचें बाळपण बहुधा निम्मेहून अधिक झोपेंतच जातें. दोन वर्षांपेक्षां जास्त वयाच्या मुलांना दिवसा झोंपेची गरजच लागत नाहीं. फक्त रात्रीं रगड झोंप त्यांना मिळाली म्हणजे त्यांची प्रकृति उत्तम रहाते.

वयाच्या मानानें प्रत्येक मनुष्यानें किती तास झोंप अवश्य घ्यावी, याविषयीं खालील माहिती लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ४ | वर्षे | वयाच्या | मुलाला | १२ | तास | झोंप | पाहिजे. |
| ७ | ,, | ,, | ,, | ११ | ,, | ,, | ,, |
| ९ | ,, | ,, | ,, | १०½ | ,, | ,, | ,, |
| १२ ते १४ | ,, | ,, | ,, | ९ ते १० | ,, | ,, | ,, |
| १४ ते २१ | ,, | ,, | मनुष्याला | ९ | ,, | ,, | ,, |

दिवसा वापरण्याचे कपडे व रात्रीं निजतांना घालण्याचे कपडे कधींहि एक असूं नयेत. रात्रीचे कपडे विशेष सैल, उबदार आणि फार साधे असे असावे. त्यांना कोणत्याहि प्रकारचीं बटणें किंवा गुंड्या लावलेल्या नसाव्या. त्यांच्या ऐवजीं जरूर त्या ठिकाणीं मऊ बंद लावावे. रात्रीचे कपडे रोज धुतलेच पाहिजेत.

निजण्याचे पूर्वी चहा, कॉफी किंवा दूध घेणें हितावह नाहीं. आटीव दूध निजण्याचे पूर्वी पिण्याचा प्रघात आपल्यापैकीं कांहीं लोकांत असतो, तो बंद करणें चांगलें. नवीन पद्धतीचे लोक चहा किंवा कॉफी घेतात, हेंहि चांगलें नव्हे. सारांश, निजण्यापूर्वी कांहींच घेऊं नये हें उत्तम. एका खोलींत पुष्कळ माणसांनीं निजणें अगदीं अप्रशस्त आहे. होतां होईल तों प्रत्येक मनुष्याची निजण्याची जागा निराळी असली पाहिजे. आपल्या लोकांत पूर्वापार चालत आलेला प्रघात असा आहे कीं, नवराबायकोनें एका अंथरुणावर निजलेंच पाहिजे. परंतु यापासून किती प्रकारचे तोटे आहेत, याचा विचार कोणी करीत नाहीं, हें चांगलें नव्हे. निद्रावस्थेंत सर्व प्रकारचे घाण वायु शरीराच्या निरनिराळ्या द्वारांनीं बाहेर पडत असतात व शेजारीं निजणाऱ्याच्या श्वासोच्छ्वासक्रियेबरोबर तेच घाण वायू एकमेकाचे कोठ्यांत जातात, यासाठीं कोणीहि कोणाचे अगदीं

शेजारीं निजूं नये, हें उत्तम. स्त्रीपुरुषांचीं अंथरुणें कधींहि एक असूं नयेत. एकाच खोलींत शक्य तितक्या दूर अंतरावर, तीं असावीं.

जमिनीवर अंथरूण घालून निजणें चांगलें नाहीं. प्रत्येक मनुष्याला निजण्याला पलंग, माचा, बाज किंवा निदान ओटा तरी शक्य असेल तर असावा. सारांश, उंच ठिकाणीं निजणें चांगलें. मच्छरदान् प्रत्येकाचे निरनिराळें असलें पाहिजे. अलीकडील शोधावरून डांस, चिलटें, पिसा वगैरेंच्या विषापासून नाना प्रकारचे ताप उत्पन्न होतात, असें सिद्ध झालें आहे. यासाठीं मच्छरदानीचा उपयोग सर्वांनीं करावा हें चांगलें आहे.

श्रीमंत लोकांचे निजण्याचे महाल ह्मणून जे असतात त्यांत पुष्कळ सामान ठेऊन व नाना प्रकारच्या तसबिरी, आरसे, हंड्या, झुंबरें वगैरे लावून त्यांनीं शोभा आणिलेली असते. शोभा ही प्रत्येक ठिकाणीं पाहिजेच. त्याखेरीज दृष्टीला सुख होत नाहीं, परंतु ती फार साध्या साधनांनीं आणणें अवश्य आहे. खोलींत पुष्कळ सामान असलें तर हवेला मोकळ्या रीतीनें खेळतां येत नाहीं. फार दिवे लावल्याच्या योगानें, खोलींतील प्राणवायूचा नाश होतो व दूषित वायू सर्व खोलीभर भरून जातात, यासाठीं दिवसा बसण्याचा एखादा दिवाणखाना शृंगारणें आणि रात्रीं निजण्याचा महाल शृंगारणें, यांत तारतम्य भावानें फरक ठेवणें, अवश्य आहे.

निजण्याचे पूर्वी, वादविवाद, काळजी उत्पन्न होण्याजोग्या गोष्टी, मृत्यूबद्दल चर्चा, भूतपिशाच्चाच्या गोष्टी वगैरे कधींहि काढूं नयेत. ईश्वरस्तुति, आनंदाच्या गोष्टी, उत्तम पुस्तकांचें किंवा पोथ्यांचें वाचन या गोष्टी कराव्यात, म्हणजे वेडींविद्रीं स्वप्नें पडावयाचीं नाहींत. व निद्राभंग कधींहि व्हावयाचा नाहीं.

रात्रीं निजतांना दिवा ठेवून निजावें कीं नाहीं, या गोष्टी संबंधानें सर्वांना पटेल असा नियम कांहीं देतां येत नाहीं. आरोग्यशास्त्राशीं या गोष्टीचा संबंध विशेष नाहीं. खोलींतलि हवा खेळती असेल तर उजेड असतांहि झोंप घेतां येत असेल तर, व दिवा ठेविल्यापासून कोणत्याहि प्रकारचा अपघात होण्याची भीती नसेल तर, दिवा रात्रभर ठेवण्यास कोणतीच हरकत दिसत नाहीं. अंधार हा झोंपेला अनुकूल आहे व प्रकाश हा विघातक आहे खरा, पण एकवार संवय पडल्यावर या गोष्टींचा निद्रवर कांहींच परिणाम होत नाहीं. ही संवय नवीन मात्र लावून घेऊं नये, ह्मणजे झालें.

स्वतःचें घर बांधून रहाणाराला किंवा कांहीं मुदतीनें गहाण घरें घेणारांनां, वरील गोष्टी करणें शक्य आहे, परंतु गरीबीमुळें केवळ भाडें देऊनच कसातरी निर्वाह करण्याचा प्रसंग ज्यांचेवर येतो, त्यांनां वरील गोष्टी शक्य नाहींत, हें उघड आहे; परंतु स्वच्छता, सुख आणि सोय हीं साधतील तितकीं साधण्याचा, कुटुंबांतील प्रत्येक स्त्रीनें व पुरुषानें नियमच केला पाहिजे. आरोग्यासंबंधानें ज्यांचा संबंध नेहमीं येतो, अशा घराच्या तीन चार भागांविषयीं, विस्तारपूर्वक विवेचन आतांपर्यंत केलें आहे. यावरून बाकीचे भाग ह्मणजे, देवपुजेचें ठिकाण, बसण्याउठण्याची जागा, जनावरें बांधण्याची जागा, घरासभोंवतीचा बागबगीचा, आंगण, स्नानाची जागा, मळमूत्राची जागा व गटारें आणि मोऱ्या यांविषयीं कोणत्याहि प्रकारें निष्काळजीपणा केला तरी चालेल, असें मुळींच नाहीं.

देवपूजेचें ठिकाण, बसण्याउठण्याची जागा, बागबगीचा, व आंगण यांविषयीं विशेष लिहिण्याजोगें असें कांही नाहीं. स्वच्छता, सोय आणि सुख ज्यांच्यायोगानें साधेल, तितक्या गोष्टी या ठिकाणींहि करणें अवश्यच आहे; या गोष्टींपेक्षां विशेष खबरदारी खालील गोष्टींची घेतली पाहिजे.

---



# भाग बारावा.



## गोठा आणि न्हाणी घर.



**जनावरें बांधण्याची जागा.**—ही मुख्य इमारतीपासून करवेल तितकी दूर करावी. गोठ्याची जमीन मुरूम वाळू व चुना घालून अतिशय घट्ट करावी व तिला इतका ढाळ असावा कीं, तीवर पडलेलें पाणी वगैरे सर्व वाहून कडेच्या गटारांत यावें. हें गटार घरांतील इतर गटारांशीं न मिळवितां एकदम मुख्य मोरीला नेऊन मिळवावें. थोडक्या जागेंत पुष्कळ गुरें बांधण्याची चाल आपल्या लोकांत आहे, ती फार घातक आहे.

**स्नानाची जागा :**—उघड्या जागीं स्नान कधींहि करूं नये. तसें केल्यानें दोन दोष होतात. एक तर आपणास संकोच उत्पन्न होऊन शरीराचे सर्व भाग स्वच्छ रीतीनें धुतले जात नाहींत व स्नान केल्यावर शरीरांतील रोमरंध्रें मोकळीं झाल्याकारणें, त्यांत वारा भरून थंडी होण्याचा संभव असतो. अंगावर तांब्यातांब्यानें पाणी घेऊन अंग भिजविण्यापेक्षां, सर्व शरीर पाण्यांत एकदम बुडेल अशी व्यवस्था शक्य असेल त्यांनीं अवश्य करावी. या व्यवस्थेला इंग्रजींत " टब-बाथ " असें म्हणतात; व तो घेतल्यापासून शरीर किती हलकें होतें व मनाचा उल्हास किती वाढतो, याची कल्पना सांगून येण्याजोगी

नाहीं. स्नान करतांना शरीराचा प्रत्येक अवयव फार काळजीनें धुतला पाहिजे. स्नान करणें ह्मणजे अंग ओलें करणें नव्हे; किंवा जेवणापूर्वी कांहीं तरी करावयाचें म्हणून दोन तांबे अंगावर ओतून घेणें नव्हे. स्नानाचा संबंध शरीरप्रकृतीशीं अगदीं निकट आहे. नियमानें स्नान न करणारे लोक निरोगि कधींहि रहावयाचे नाहींत. वस्त्रहीन होऊन स्नान करण्याची पद्धत फार हितावह आहे व तिच्या योगानें शरीराचा प्रत्येक अवयव स्वच्छ करण्यास फार मदत होते, यांत कांहीं शंका नाहीं. केंस, तोंड, दांत, सांधे, हातापायांचीं बेचकें, नाक, कान वगैरे अवयव स्नानाचे वेळीं सावकाशपणें स्वच्छ करणें अत्यंत अवश्य आहे. अलीकडे आपल्या लोकांत पाश्चिमात्य पद्धतींचा शिरकाव होऊन, त्यांच्या पुष्कळ गोष्टी आह्मी आमच्या प्रचारांत आणू लागलों आहों, पण या प्रयत्नांत नुसत्या अनुकरणाचे पलीकडे आपण फारसे जातों, असें दिसत नाहीं. ते साबण वापरतात ह्मणून आह्मीं साबण वापरतों; व साबण असें ज्या पदार्थास बाजारांत ह्मणतात, तो पदार्थ आह्मीं विकत आणितों व त्याचा उपयोग करितों. मालाचा स्वस्तपणा पाहून आपण हें करितों हें तर उघडच आहे पण स्वस्तपणाबरोबरच त्या मालांत असलेल्या दुर्गुणाकडेहि लक्ष देणें अवश्य आहे. रंगीबेरंगी साबण दृष्टीला सुंदर दिसतात, पण गुणानें ते फार वाईट असतात. यासाठीं ते वापरूं नयेत, हलक्या दरजाचे रंग घातल्याखेरीज कारखानदारांला तो स्वस्त देण्याला पुरवत नाहीं व स्वस्त रंगांत विषारी भाग असल्याखेरीज रहात नाहीं. यासाठीं रंगीबेरंगी साबण आपण कधींहि वापरूं नये. साबणाचा स्वाभाविक रंग ह्मटला म्हणजे अगदीं फिका, पिंवळट, किंवा पारदर्शक असल्यास, फिका लालसर काळा, यांखेरीज इतर रंग कृत्रिमें आणितां येतात; पण ते वापरणें सुरक्षित नसतें, यासाठीं वापरूं नयेत.

साबणाच्या योगानें शरीराची शुद्धि होते, व त्वचा निर्मळ रहाते खरी पण आपण वापरतों त्या साबणांत पुढील गुण आहेत कीं नाहींत, हें पाहून मगच ते वापरले पाहिजेत. नुसत्या पाण्यानें स्नान केल्यानें त्वचेवरील चिकटलेला मळ कांहीं अंशानें धुतला जातो खरा, पण शरीराच्या अनेक प्रकारच्या व्यापारांनीं त्वचेवर जो एक प्रकारचा तेलकटपणा आलेला असतो, तो नुसत्या पाण्यानें कधींहि निघावयाचा नाहीं. कारण, तेलावर पाण्याचा कांहीं परिणाम होत नाहीं, हें आपणांस ठाऊकच आहे. तो तेलकटपणा घालविण्यासाठीं तेलाशीं संयोग पावणारा असा एक पदार्थ असला पाहिजे. तो पदार्थ साबणामध्यें असतो. त्याचें नांव अलकली. साबण अंगाला लाविला म्हणजे त्यांतील अलकली अंगावरील तेलकट मळांत मिसळून, त्याचें एक मिश्रण बनतें व तें पाण्यानें धुऊन टाकिलें म्हणजे सहजच तो तेलकटपणाहि निघून जातो. साबणांत असलेल्या चर्बीमुळें किंवा तेलामुळें अंग मऊ पडतें. तेव्हां सारांश इतकाच कीं, ज्या साबणाच्या योगानें शरीरावरील मळ व तेलकटपणा जाऊन त्याला स्वच्छपणा आणि मऊपणा येतो, तोच साबण चांगला. हलक्या साबणांत हे सर्व गुण असणें शक्य नाहीं. स्नान करितांना आपण (१) पाण्याचा उपयोग करितों, तें ऊन असल्यास उत्तम, त्याच्या योगानें अंग धुतलें जातें. (२) साबणाच्या योगानें मळ व तैलयुक्त पदार्थ साफ निघून जाऊन रोमरंध्रें मोकळीं होतात, त्वचा साफ होते, व शरीरास मऊपणा येतो. (३) खादीच्या रुमालानें अगर खरखरीत टुवालानें अंग कोरडें करावें; कोठेंहि पाण्याचा अंश राहूं देऊं नये. (४) वारंवार चोळण्याच्या योगानें कोठेंहि मळ राहूं शकत नाहीं. या चार गोष्टी स्नानाच्या वेळीं अवश्य असल्या पाहिजेत. केंसाला साबण फार थोड्या वेळीं लावावा, कारण त्याच्या योगानें केंसांतील तेलकटपणा निघून जाऊन, ते राठ लागतात. साबणाचे गुण शिकेकाई, रिठे, हरभऱ्यांचें पीठ आणि काळी माती व पापडखार यांत नाहींत, म्हणून

त्यांचा उपयोग बेतावेतानें करावा. अंगाला तेल लाविल्यावर त्या द्रव्यांचा उपयोग केला असतां, हितावह आहे. हरभऱ्याचें पीठ शरीरावरील तेलकट अंश काढून घेऊन, अंग नरम पाडतें, परंतु मळ काढून घेण्याची त्याची शक्ति कमी आहे. रिठे, शिकेकाईप्रमाणेंच गुण देतात. पापडखार नुसती स्वच्छता देतो. तेलावर त्याचा परिणाम चांगला होतो, परंतु अंग अगदीं रुक्ष होतें व अंगाला खाज सुटते. चिकण मातीचे अंगीं यांपैकीं एकहि गुण नसतांना खेडे-गांवांतील गरीब लोक तिचा या कामाकडे कां उपयोग करतात, तें कळत नाहीं.

अशक्त प्रकृतीला ऊन पाण्याचें स्नान फार हितावह आहे, पण सदृढ प्रकृतीच्या मनुष्याला थंड पाणी त्याहीपेक्षां हितकर आहे. स्नानाचें पाणी किती ऊन असावें, याचें प्रमाण सर्वांनां सारखें, असें देतां येणार नाहीं, पण थंड पाणी ह्मणजे ७० अंश फारेनहाईटपेक्षां कमी जें असतें तें होय. ७० पासून ८० अंशाचें पाणी कोंबट समजावें; ८५ पासून ९७ पावेतों पाण्याची उष्णता असली ह्मणजे त्याला ऊन पाणी असें ह्मणतात, आणि याहीपेक्षां पुढें उष्णता गेली म्हणजे तें पाणी कढत आहे, असें समजण्याचा वैद्यकीय परिपाठ आहे.





# भाग तेरावा.

## मल विसर्जन विधि.



मळमूत्राची जागा—ही घरापासून होईल तितक्या अंतरावर असावी. मळमूत्र टाकण्याच्या आपल्या देशांतील जागा, पाश्चिमात्य शास्त्रीय पद्धतीनें बांधिलेल्या नसतात, ही गोष्ट खरी आहे. मोठमोठीं शहरें खेरीजकरून, अशा जागा निराळ्या बांधण्याचें कारणच पडत नाहीं, अशी जी कित्येकांची समजूत आहे, ती मात्र चुकीची आहे. खेडेगांवीं मळमूत्रासाठीं निराळी जागा करण्याची वहिवाट नसल्याकारणानें, घराच्या किंबहुना गांवाच्या बाहेर टाकलेलें मळमूत्रदेखील पाण्याच्या द्वारें, व हवेच्या द्वारें, फिरून अंशतः तरी आपल्याच कोठ्यांत जातें, यांत कांहीं शंका नाहीं. शौचकूप आणि मुतऱ्या यांच्या मोऱ्या घरांतील इतर कोणत्याहि मोरींत न मिसळतां, परभारें मुख्य मोरीला मिसळवाव्या. मैला कोरडा राहिला तर तो लवकर कुजत नाहीं, त्यावर मूत्र किंवा पाणी पडलें तर मात्र तो लवकर कुजून, त्याची दुर्गंधि सुटते व ती हवेंत मिसळून हवा दूषित होते. यासाठीं शौचकूप अशा तऱ्हेचे बांधावे कीं, त्यांत मळ, मूत्र किंवा पाणी हीं एके ठिकाणीं न पडतां, निरनिराळ्या ठिकाणीं पडतील. असें

केल्यानें मैला कोरडा राहून, त्यापासून दुर्गंधि उत्पन्न होत नाहीं, असल्या नमुन्याचे शौचकूप कित्येक ठिकाणीं बांधलेले, आम्ही पाहिले आहेत, व त्यांचा उपयोग काळजीनें केला तर खरोखर ते फार फायदेशीर आहेत, असें म्हटल्याबांचून राहवत नाहीं. शौचकूपांत पाण्याचा उपयोग न करितां, कागदांचा उपयोग करणें चांगलें, किंवा वाईट याविषयीं कांहीं वर्षांपूर्वी मोठा वादविवाद होऊन, ती सुधारणा अमलांत आणावीच असें प्रतिपादन करणारांनीं देखील, तिच्या उपयोगीपणाबद्दल बराच संशय दाखविलेला आम्हांस माहित आहे; व शरीरशुद्धीचें तत्व, धर्माचे तत्वावर रचलेलें आहे, अशी ज्या लोकांची समजूत, त्यांना पाण्याचे ऐवजीं कागदाचा उपयोग कधींहि पसंत पडावयाचा नाहीं, व या नापसंतीला कांहीं कारणेंहि आहेत. तीं हीं:—

( १ ) इंग्लंडासारख्या थंड देशांत पाण्याचा वारंवार उपयोग केल्यानें कदाचित थंडी होण्याचा संभव असेल, म्हणून त्यांनीं या कृत्यासाठीं पाणी वर्ज मानिलें असावें, तो प्रकार आपल्या उष्ण देशांत मुळींच संभवत नाहीं.

( २ ) कोरड्या कागदानें मळाचा सर्व अंश निःशेष पुसला जाईल असें संभवत नाहीं, व तो कितीहि सूक्ष्म प्रमाणानें राहिला तरी ती गोष्ट धर्मविरुद्ध आहे, अशी आमच्या लोकांची समजूत आहे.

( ३ ) आमच्या देशांत पाणी इतकें मुबलक आहे कीं, तें कितीहि खर्च केलें तरी, त्याचा आम्हांस विधिनिषेध बिलकुल वाटत नाहीं व कागदाचा उपयोग करूं लागल्यास खर्चाचें प्रमाण बरेंच वाढणारें आहे.

या एकंदर गोष्टींचा विचार केल्यावर आपल्या लोकांनीं पाण्याचा उपयोग करूं नये व साहेबलोकांप्रमाणें कागदांचा उपयोग करावा असें कोणासहि वाटणार नाहीं मात्र एवढें पक्कें लक्षांत ठेवावें कीं, पाणी आणि मळ यांचा मिलाफ कधींहि होऊं देऊं नये, ही गोष्ट

साध्य होण्यासाठीं शौचकूपांत जी सुधारणा करावयाची ती एवढीच कीं, मैला पडण्याचें ठिकाण आणि पाणी घेण्याचें ठिकाण यांत निदान दीड फुटाचें तरी अंतर असावें. असल्या नमुन्याच्या शौचकूप कसा बांधावा हें चांगलें लक्षांत येण्यासाठीं पुस्तकाचे शेवटीं एक नकाशा दिला आहे, तो पहावा. मैल्यावर कोरडी राख किंवा माती टाकण्याची पद्धत चांगली आहे. राख किंवा माती यांच्या योगानें मैल्याचें पृथःकरण होऊं शकत नाहीं व दुर्गंधि सुटत नाहीं. मैला अगदीं उघडा ठेवणें चांगलें नाहीं. त्यावर राख अगर मातीचें आच्छादन असणें चांगलें आहे.

अनुकूल असल्यास पाण्याच्या जोरानें मळमूत्र धुऊन टाकून शौचकूप स्वच्छ करण्याची पद्धत शक्य असेल तर सुरू ठेवावी, परंतु हें काम बरेंच खर्चाचें व वारंवार दुरुस्ती लागणारें, असें आहे. अशा प्रकारचे संडास अलीकडे मुंबई शहरांत फार प्रचारांत येऊं लागले आहेत व त्यांच्यापासून शौचकूपांत घाणीचा लेशहि राहण्याची भीति नाहीं. शौचकूप बांधणें तो घराच्या भिंतीपासून निदान सहा फुटांच्या अंतरावर तरी असावा व त्याचें जोतें घराच्या जोत्यापेक्षां दोन फूट जास्त उंच असावें. मुख्य मोरीचा व शौचकूपाच्या मोरीचा संबंध परभारें असला पाहिजे.

पेटीचे शौचकूप, शक्य असेल त्यांनीं प्रचारांत आणावे, पण तें काम फारच खर्चाचें असून त्यासाठीं प्रत्येक घराला एक स्वतंत्र भंगी ठेवावा लागेल. सारांश, तें काम फार श्रीमंतीचें आहे ह्मणून त्याविषयीं या पुस्तकांत जास्त विचार करण्याचें कारण नाहीं.





# भाग चवदावा.

## घाणपाणी व राबाचें पाणी यांची व्यवस्था.



गटारें आणि मोऱ्या—घरांतील घाणपाणी, केरकचरा आणि पावसाचें पाणी यांचा निकाल लावण्याची आपण विशेष काळजी घेत नाहीं. आपल्या घरांतील घाणपाणी कसें तरी आपल्या भिंतीच्या बाहेर गेले ह्मणजे आपलें काम झालें, अशी पुष्कळांची समजूत आहे, व आपल्या घरांतील भिंतीला कोठें तरी व कसेंतरी एखादें भोंक पाडून, राबाचें पाणी व पावसाचें पाणी बाहेर घालवावयाचें, अशी पद्धत बहुतेक ठिकाणीं दृष्टीस पडते. आपल्या हद्दीतील कचरा दुसऱ्याचे हद्दीत नेऊन टाकल्यानें आपलें घर व त्या सभोंवतालची हवा स्वच्छ राहते, असें मानणारेहि कमी आहेत असें नाहीं; पण या कृतीचा परिणाम व्यक्तिशः विचार केला तरी हितकर नाहीं व सार्वजनिक रीतीनें तर मुळींच हितकर नाहीं. खरकट्यांतील अन्न, गलिच्छ पाणी भाजीचे देंठ, पानपत्रावळी व घरांतील सर्व प्रकारचा कोरडा व ओला केर, आपल्या भिंतीच्या बाहेर पडला काय, आणि आंत असला काय, त्यापासून होणारा अनिष्ट परिणाम सारखाच होतो. या पाण्याची व केराची कायमची चांगली व्यवस्था लावीपावेतों त्यापासून होणाऱ्या

वाईट परिणामांची जबाबदारी घरच्या मालकावर किंवा मालकिणी-वरच आहे, हें प्रत्येकानें लक्षांत ठेवावें. हे पदार्थ नुसते घराच्या बाहेर फेंकून दिल्यानें, त्यांच्या आंगचे; कुजून वाईट हवा उत्पन्न करणारे दोष, नाहींतसे होतात, असें नाहीं. दुसरें असें कीं, आपल्या घरांतील घाण अगर केर आपण दुसऱ्याचे हद्दींत टाकून, त्याची गैरसोय कां करावी, हेंहि समजत नाहीं. तेव्हां या सर्व गोष्टींचा विचार करून, या गोष्टींकडे आपल्या लोकांनीं सध्यांच्यापेक्षां जास्त लक्ष पुरवावें, हें हितावह आहे. घरांतील घाण चार प्रकारांनीं उत्पन्न होते.

(१) श्वासोच्छ्वासापासून व रोमरंध्रांतून उत्पन्न होणारा क्यारबॉनिक आसिड वायू

( २ ) तोंडांतील थुंकी, लाळ, व बडके, नाकांतील शेंबूड आणि अंगांतून निघणारा घाम व मळ्या, केरकचरा, अन्नाचा अंश असलेले पदार्थ, आणि भाजीपाल्याचे देंठ व राख वगैरे.

( ३ ) मळमूत्र वगैरे.

( ४ ) पावसाचें पाणी.

यांपैकीं तिसऱ्या प्रकाराचें, म्हणजे मलमूत्र वगैरेचें सविस्तर विवरण मागील भागांत केलेंच आहे व त्यांची विल्हेवाट कशी लावावी तेंहि सांगितलें आहे. आतां बाकी राहिलेल्या तीन प्रकारांविषयीं लिहावयाचें राहिलें आहे. श्वासोच्छ्वासापासून व रोमरंध्रांतून उत्पन्न होणाऱ्या घाणीचा नाश, अन्नपचनक्रिया सुव्यवस्थितपणें ठेविल्याने व मळमूत्रादि व्यवहार नियमितपणें केल्यानें होतो.

दुसऱ्या प्रकारांत ज्या घाण पदार्थांचा समावेश होतो, त्यांत पाण्याच्या अंशानें मिश्र असा कचरा व अगदीं कोरडा कचरा, असे सांठविण्यां-साठीं, अंगण अगर परसांत एकीकडच्या अंगास लोखंडाच्या पेट्या

ठेवाव्या, व त्यांत तो कचरा टाकीत जावा. ओला कचरा आणि वाळलेला कचरा एके ठिकाणीं कधींहि टाकूं नये. कारण ओलेपणा-मुळें पृथक्करणाची क्रिया जलद सुरू होते व त्यापासून उत्पन्न होणारे घाण वायू सर्व घरभर पसरतात.

केर सांठविण्याच्या या लोखंडी पेट्यांविषयीं खालील नियम अवश्य लक्षांत ठेवावे.

( १ ) घराच्या भिंतीपासून त्या निदान सहा फुटांच्या अंतरावर तरी असाव्या.

( २ ) त्या एका माणसाला उचलतील इतक्याच मोठ्या असाव्या.

( ३ ) त्यांच्यावर पावसाचें अगर इतर कोणतेंहि पाणी पडणार नाहीं, अशा ठिकाणीं त्या ठेवाव्या.

( ४ ) त्या कल्हई केलेल्या लोखंडी पत्र्याच्या बनविलेल्या असाव्या व त्यांत घाण कोणत्याहि प्रकारें छपून रहाणार नाहीं असा त्यांचा साधा आकार असावा. पेटीच्या आकारापेक्षां घमेल्या-सारखा गोल आकार जास्त सोईवार आहे.

( ५ ) या पेट्यांच्या बाहेर केर कधींहि पडूं देऊं नये.

( ६ ) भाजीपाल्याचे देंठ, पानपत्रावळ व इतर कांहीं ओलसर पदार्थ हे केरांत कधींहि मिसळूं नयेत. ते सर्व उन्हांत वाळवावे व नंतर उघड्या हवेवर जाळून टाकावे.

गावाचें पाणी, स्वयंपाक घरांतील गढूळ पाणी आणि स्नानाचें वगैरे पाणी, घरांतून साफ वाहून जाण्यासाठीं नळ, गटारें आणि मोऱ्या, यांची योजना आपण करितों, ती अगदीं निरुपयोगी असून ती करून न केल्यासारखीच होते. गटारें, मोऱ्या वगैरे बांधून, पाण्याचा

निकाल होण्याचीं साधनें ज्या शहरांत नाहींत, तेथील हवा बिघडलेली असते व त्या ठिकाणीं मृत्युचें प्रमाणहि जास्त असतें. लंडनसारखें गलिच्छ शहर पूर्वी नव्हतें. त्यावेळीं तेथें मृत्युचें जें प्रमाण असे त्यापेक्षां आतां निम्याहून कमी आहे. याचें कारण सर्व प्रकारच्या घाणीचा योग्य निकाल करण्याची त्यांची पद्धत होय. हिंदुस्थानांतील म्युनिसीपालिव्यांची स्थिति, इतर सर्व सार्वजनीक गोष्टींप्रमाणेंच समाधानकारक नसते. कित्येक गरीब अवस्थेंत असतात, ह्मणून त्यांना या कामीं पैसा खर्च करवत नाहीं, कित्येकांना ऐपत असून इच्छाच नसते व कित्येकांना ऐपत व इच्छा या दोन्ही असून त्यांची समजूत पाश्चिमात्य शहरांचें अनुकरण करणें चुकीचें आहे अशी असते. सारांश, कोणत्या ना कोणत्यातरी कारणानें सार्वजनिक गटारांची स्थिति समाधानकारक असलेलीं शहरें फारच कमी, किंवा किंबहुना नाहींतच असें म्हटलें तरी चालेल, परंतु या प्रश्नाशीं या पुस्तकाचा विशेषसा संबंध नाहीं. गृहस्थाश्रमि प्रत्येक मनुष्यानें आपण रहातों त्या ठिकाणच्या पाण्याचा निकाल कसा करावा, येवढ्याच गोष्टीचा विचार आपणास तूर्त कर्तव्य आहे. घरांतील राबाचें व इतर पाणी घरांत न मुरतां तें सर्व पाणी बाहेर निघून जावें, यासाठीं घरांतील सांडपाणी एके ठिकाणीं जमेल अशी व्यवस्था लोखंडी अगर मातीच्या नळांनीं करावी, हें योग्य आहे. दगडांची अगर विटांचीं गटारें बांधणें चांगलें नाहीं. तीं अखंड कधींहि बांधलीं जात नाहींत. म्हणून प्रत्येक सांध्यांत पाणी मुरण्याचा संभव असतो. लोखंडी अगर मातीच्या नळयांचा उपयोग केला असतां, पाणी मुरण्याची भीति मुळींच रहाणार नाहीं. प्रत्येक घरांत पाणी सांडण्याच्या, भांडीं घांसण्याच्या, स्नान करण्याच्या, हातपाय धुण्याच्या वगैरे जागा नियमित असाव्या. वाटेल त्या ठिकाणीं हीं कृत्यें करण्याची संवय पुष्काळांस असते, ती मोडणें अत्यावश्य आहे. स्वतःच्या घरांत वाटेल त्या ठिकाणीं लघ्वीस बसणें, वाटेल तेथें थुंकणें, वाटेल तेथें स्नान

करणें, किंवा वाटेल तेथें खरखटे हात व तोंड धुणें, यामुळें कायदेशीर गुन्हा कोणताहि होत नाहीं, पण आरोग्यशास्त्रांतील कायदे मोडण्याचा अपराध फार मोठा होतो, हें विसरतां कामा नये. हे व्यवहार कोठें तरी करणें, ह्मणजे तें घाण पाणी मुद्दाम आपण होऊन जमिनींत जिरविणें होय व त्यायोगानें, जें रोगाचें बीज पेरलें जातें, त्याची जबाबदारी आपणावरच येणार, हें उघड आहे म्हणून प्रत्येक घरांत असलें पाणी सांडण्यासाठीं स्वतंत्र व्यवस्था केलेली असावी व या सांडपाण्याचा नळ गांवांतील मुख्य मोरींत नेऊन सोडलेला असावा.

आपल्या घरांतील मोरीचे नळ, आणि मुख्य मोरी यांची रचना कशी असावी, तें खालीं लिहिलें आहे.

( १ ) मुख्य मोरीपेक्षां आपल्या घरांतील नळाची सपाटी उंचीवर असली पाहिजे, ह्मणजे घरांतील घाणपाणी एकदम वाहून मुख्य मोरींत जातें.

( २ ) घरांतील मोरी आणि सार्वजनिक मोरी यांचा प्रत्यक्ष संबंध कधींहि असूं नये, कारण तसें असल्यास मुख्य मोरींतील घाण त्याच मोरीवाटे घरांत शिरण्याचा संभव असतो, यासाठीं मुख्य मोरीशीं घरांतील मोरी मिळवितांना U अशा आकाराचा नळीचा जोड द्यावा.

( ३ ) ज्या ठिकाणीं असा जोड दिलेला असेल, त्या ठिकाणीं आपल्या हद्दींतच घरांतील मोरींत मोकळी हवा मुबलक शिरेल, अशी व्यवस्था नळी लावून करावी.

( ४ ) मोरींतील घाण हवा घराच्या छपराच्या देखील वर निघून जावी, अशासाठीं मोरीच्या आडव्या नळांना काटकोनांत बसतील असे उभे नळ निदान १०-१० फुटांचे अंतरावर लावून, ते अगदीं

घराच्या वर नेऊन सोडावे व त्यांचीं तोंडें सदोदित उघडीं असावीं. फार तर त्या तोंडावर तारेची मोठ्या भोंकांची जाळी अगर तारेचे पिंजरे बसवावे. या नळीचा आंतील परीघ निदान चार इंच तरी असला पाहिजे.

(५) मोरीच्या कामीं लागणाऱ्या सर्व नळ्या किंवा नळ यांचे सांध्यांतून पाणी बाहेर येणार नाहीं, अशा मजबूत रीतीनें ते बसविलेले असावे.

राबाच्या पाण्याची व एकंदर घाणपाण्याची व्यवस्था शास्त्रीय पद्धतीनें कशी लावावी हें स्पष्ट समजण्यासाठीं खालीं दोन आकृति दिल्या आहेत त्यांतील नंबर एकच्या आकृतींत या रचनेंतील सर्व दोष दाखविले आहेत व नंबर दोनच्या आकृतींत मोऱ्या, नळ, स्नानाच्या जागयांची व्यवस्था कशी असावी तें दाखविलें आहे.




आकृति १.

राबाच्या पाण्याचा वाईट रीतीनें निकाल केला आहे ती स्थिति.

अ हा पाण्याचा खजिना आहे त्यांतील पाणी, शौचकूप, न्हाणी, घर, मोरी, आणि भांडीं वगैरे घांसण्याच्या जागीं नेलें आहे. ब ही

दुसरी एक नळी त्याच खजिन्याला लाविलेली आहे व तींतून खजि-न्यांतील फाजील जाहलेलें पाणी जमीनींतील मोरींत पडतें. क ही नळी जमिनींतील नळीसच जोडिली आहे पण तिला उश्वास मुळींच नाहीं. ड घरांतील खोलींतच शौचकूप असून त्या खोलींत उश्वास नाहीं व पाण्यानें मळ वाहून जाण्याचीहि सोय नाहीं. ई भांडीं वगैरे धुण्याची उघडी मोरी. फ हें गटार जमीनींत आहे पण त्याला U या आकाराचा सांधा नाहीं व त्यांतील घाण हवा वर जाण्याला उश्वासाची नळी नाहीं; ग न्हाणीच्या नळ जमीनीखालच्या गटारास मिळविला आहे पण त्याला आपोआप उघडणारें व बंद होणारें झांकण नाहीं. च पावसाचें पाणी या नळीच्या वाटेनें एका खळग्यांत पडत आहे पण त्याचा निकाल नाहीं. न ही एक घाण पाणी वाहणारी नळी ड नळीशी जोडून घरांतील घाण घरांतच खेळती ठेविली आहे.




**आकृति २.**

घाणाच्या पाण्याचा चांगल्या प्रकारें निकाल केला आहे ती स्थिति.

अ जमीनींतील गटाराची घाण हवा वर वाहून नेणारी नळी. ब न्हाणी घर, लघ्वीची मोरी, शौचकूपांतील मैला वाहून नेणाऱ्या पाण्याच्या टांकीतील फाजील पाणी वाहून नेणारी नळी, या सर्व ब नळाच्या वाटेनें मुख्य गटारांत येऊन मिळत आहेत. क शौच कूपांतील घाण पाणी वाहून नेणारी नळी अगदीं स्वतंत्र असून ती या आकृतींत दाखवितां येत नाहीं. ड, ग, फ, न आणि च यांहि नळयांची रचना स्पष्टच दिसत आहे.





# भाग पंधरावा.

## प्रपंच सुख.



प्रपंचांतील सुखाचीं जरीं साधनें-त्यांपैकीं घर हें एक आहे. तें कसें असावें, त्यांत कोणत्या ठिकाणीं कोणत्या सोई असाव्या व प्रत्येक भागाचा उपयोग कशा प्रकारें करावा, याचा विचार मागील प्रकरणांत केला आहे व घरांतील निरनिराळ्या भागांचा उपयोग करतांना मुलांनीं मुलींनीं व थोर मनुष्यांनींहि कसें वागावें, हें प्रसंगानुसार सांगितलें आहे. आपल्या मनाजोगें सर्व सोयींचें घर, मिळण्याजोगें नशीब, प्रत्येकाचें असतें असें नाहीं. हा लाभ थोडक्याच नशीबवानांच्या वांटणीस येतो. परंतु असेल त्या साधनांत सुख, सोय, शोभा आणि प्रकृतिसंरक्षण या गोष्टींकडे लक्ष देणें, किती अवश्यक आहे, व तें प्रत्येक स्थितींतील मनुष्यास कसें करून घेतां येईल, याचेंहि विवेचन केलें आहे. आतां प्रपंचास लागणारें सामान-सुमान, नोकरचाकर, धान्य, कपडालत्ता, वगैरे गोष्टींविषयीं माहिती या भागांत देण्याचा विचार आहे, व प्रत्येक विषयासंबंधानें लिहितांना आपल्या प्रपंचांत त्या गोष्टींसंबंधानें जे दोष आहेत, ते घालविण्याचे उपायहि सुचविले आहेत.

**शाळाधिकाऱ्यांचें व शिक्षकांचें कर्तव्य**—प्रपंचशास्त्र हा विषय शाळांतून मुलांमुलींना शिकविण्याची जबाबदारी शाळाधिकाऱ्यांवर केवढी मोठी आहे, या गोष्टीचा विचार अद्यापहि चांगलासा झालेला नाहीं. आपल्या देशांत ज्या भावी बायका, आया, बहिणी, सास्वा, सुना, जावा, नणंदा होणार आहेत व ज्यांच्या चांगलेपणावर किंवा वाईटपणावर, आमच्या राष्ट्राचें प्रापंचिक सौख्य किंवा दुःख सर्वथैव अवलंबून रहाणारें आहे, त्या सध्यां शाळेंत असणाऱ्या मुलींना, शिक्षण कोणत्या प्रकारचें द्यावें व तें कसें द्यावें, याचें ज्ञान मुलींच्या व मुलांच्या शाळांतील बहुतेक शिक्षकांना नाहीं, ह्मटलें तरी चालेल, व हा दोष त्यांचा नव्हेही. हा दोष विद्याज्ञानपद्धतीचा आहे, व ती पद्धत सुधारून तींत या अत्यावश्यक विषयाचा समावेश करणें, अगदीं जरूर आहे. शाळेंत गेलेली मुलगी ह्मणजे संसाराच्या कामीं अगदीं निरुपयोगी, असा शेरा, सुशिक्षित मंडळी देखील मारिते, व नवीन तऱ्हेनें शिकलेला मुलगा म्हणजे कोणत्याहि कामाला नालायक असा मनुष्य; असा किताब, जुनी मंडळी नवीन होतकरू व सुशिक्षित पिढीला देतच असते. सहावी इयत्ता पास झालेली एखादी मुलगी, न शिकलेल्या किंवा अर्धवट शिकलेल्या स्त्रीसमाजांत गेली, कीं तिच्या अंगांत प्रपंचज्ञान व प्रपंचदक्षता नाहीं, ह्मणून तिच्यावर टीका सुरू होते आणि तिच्यांत व्यवहारज्ञान नाहीं, ह्मणून सभोंवतालच्या बायका तिची थट्टा करूं लागतात. तिनें कधींच केलेला नाहीं असा एखादा जिन्नस तिला करतां आला नाहीं ह्मणजे "पुरे आतां, पडला उजेड, हें कांहीं लेखणीनें लिहावयाचें काम नाहीं" असा शेरा सासुबाईचा येतोच व स्त्रीशिक्षणाची टवाळी घरोंघरीं सुरू होते. पुरुषांची स्थिति पाहिली तरी तीच. बी. ए. झालेला एखादा होतकरू तरुण गृहस्थ मामलेदार कचेरींत कारकून झाला कीं, नुसत्या लिहिण्याचे कसबांत पटाईत, असे तेथील कारकून, त्याची थट्टा करूं लागतात;

या नवीन मनुष्याला माहीत नसलेली एखादी गोष्ट त्यानें जुन्या मनुष्याला विचारली ह्मणजे, ह्मणतात, " वः इतकें शिकूनहि तुह्माला ही यःकश्चित् गोष्ट समजत नाहीं कां ? " सारांश हे सर्व परिणाम एकदेशीय शिक्षणाचे आहेत. अशिक्षित मनुष्य आणि सुशिक्षित मनुष्य या दोघांनाहि एखादें कठीण व अगदीं नवें काम बरोबरच करावयास सांगीतलें, तर सुशिक्षिताचा नंबर खास वर येईल, ही गोष्ट पुरुषवर्गाला व स्त्रीवर्गालाहि लागू आहेच. या प्रश्नाचा विचार व्यक्तिशः करावयाचा नाहीं, एकंदर समाजाचा करावयाचा आहे, हेंहि विसरतां कामा नये; व कोणताहि नियम बांधतांना एकाच वर्गांतील व समान स्थितींतील पुष्कळसे लोक घेऊन त्यांची तुलना दुसऱ्या विवक्षित वर्गाबरोबर केली पाहिजे. "गोमाजीपंत बी. ए. आहेत, त्यांना मामलत मिळाली आहे पण ते अगदीं गचाळ" असा शेरा देणें व्यक्तिशः कदाचित् बरोबर असूं शकेल, परंतु बी. ए. झालेले व मामलत दिलेले सर्वच सुशिक्षित लोक वाईट, असा नियम काढणें, अगदीं चुकीचें होणार आहे. सगुणाबाई शिकली सवरली असून, तिला नवऱ्याला नुसता भातहि करून घालतां येत नाहीं, असें व्यक्तिशः म्हणणें कदाचित् खरें असूं शकेल; पण सुशिक्षित स्त्रियांना व्यवहाराचें व संसाराचें ज्ञान बिलकुल नसतें, असें विधान करणें अगदींच चुकीचें होणार आहे. विद्येचा संस्कार ज्या पुरुषाच्या किंवा ज्या स्त्रीच्या मनावर झालेला आहे, त्याचें किंवा तिचें मन, नांगरून ठेविलेल्या व उत्तम खत घातलेल्या उत्कृष्ट शेत जमिनीप्रमाणें असतें, त्यांत जें पेरावें तें पीक फार जोरानें व अनायासानें येतें. त्या पिकाला विशेष श्रम पडत नाहींत. मेहनत मशागत केलेल्या अशा जमिनींत पाहिजे तें पेरा, पीक उत्तम व्हावयाचेंच, असा सार्वत्रिक नियम आहे. आतां अशा जमिनींतहि एखादें बीं अगदीं धोंड्यावरच पडलें, तर तें मुळींच उगवावयाचें देखील नाहीं, हें उघडच

आहे. पण ही गोष्ट क्वचित् व्हावयाची. परंतु विद्येचा संस्कार ज्यांच्या मनावर झालेला नाहीं, अशी मंडळी म्हणजे खडकाळ रान, त्यावर बहुतेक बीं फुकटच जावयाचें व एखाद्या ठिकाणीं मातीचा अंश असला तर, तेवढ्या पुरतेंच पीक उभें रहावयाचें, असा सर्व साधारण नियम आहे. या जमिनीवर पीक येणार, तें सदासर्वदा एकचजातीचें. त्याचा हंगाम गेला कीं आटपला बाजार. अशी स्थिति विद्वान व अविद्वानांची आहे व विद्येला मान याचसाठीं आहे. विद्वान स्त्रीपुरुषांवर व्यवहारशून्यतेचे, संसारशास्त्राज्ञानाचे व जगांतील इतर कांहीं किरकोळ बाबींत जे दोष लादले जातात, ते सर्वथैव खोटे असतात, असें म्हणणेंहि अगदी बरोबर नाहीं. शिक्षणक्रमांत व्यवहारशास्त्राचा समावेशच जर नाहीं, तर त्यांना तें यावें कसें? सारांश इतकाच कीं, आपल्या हाताखालीं शिकणारीं मुलें आणि मुली या पुढें जगांत सर्व प्रकारांनीं उत्तमोत्तम निपजतील, अशा रीतीनें सर्व दिशांनीं त्यांचें मन सुशिक्षित करणें, हें विद्याधिकाऱ्यांचें व प्रत्येक शिक्षकाचें आद्यकर्तव्य आहे.





# भाग सोळावा.

## नोकर चाकर.



घरकामाचे नोकर—आपल्या समाजांत, चांगले सुतार, चांगले लोहार, चांगले गवंडी, चांगले न्हावी, चांगले परीट, चांगले शिंपी, व चांगले चांभार आणि भंगी देखील मिळूं शकतात. पण घरकाम करणारे चांगले नोकर ह्मणजे आचारी, पाणके, खटपटे, शागीर्द, स्वयंपाक करणाऱ्या बाया व घरीं काम करणारे हरकामे, मिळण्याची कोण मारामार पडते याची कल्पना, ज्याला नोकर ठेवण्याचा प्रसंग येतो, अशा प्रत्येक गृहस्थाला व गृहिणीला आहेच. अशी स्थिति कां असते, याचा बारीक रीतिनें विचार करावयास लागलें तर, असें दिसून येतें कीं, या घरकामकऱ्यांना कोणत्याच प्रकारचें शिक्षण म्हणून नसतें. इतर धंद्यांची गोष्ट अशी असते कीं, ते आपल्या देशांत पिढिजादा चालत आलेले असतात. गंवड्याचा मुलगा लहानपणापासूनच बापाच्या हाताखालीं राहून, काम करितो. व त्याला आपलें कसब बापाच्याप्रमाणें तरी निदान करतां येऊं लागतें. सुताराचा मुलगा प्रथम घरीं बसूनच बापाच्या हाताखाली सुतारकाम शिकतो व पुढें स्वतः एकटाच काम करूं लागतो. याचप्रमाणें सोनार, शिंपी, चांभार, लोहार, कुंभार व न्हावी वगैरे कसबी लोकांना त्यांच्या धंद्या-

पुरतें शिक्षण आपापल्या घरींच मिळत असतें. तसा प्रकार घरकामी नोकरांचा मुळींच नाहीं. कोणत्याहि धंद्यांत ज्यांना यश येण्याची आशा नाहीं व कोठेंहि ज्यांचा उपयोग नाहीं, अशा वर्गांतील लोक घरकाम्यांची नोकरी पत्करण्याला कबूल असतात व कितीहि जड बुद्धीचा व गचाळ इसम असला तरी तो घरकाम्या चांगला होईल, अशी सर्वांची समजूत झालेली असते. यामुळें अगदीं अडाणी, मूर्ख व निरुपयोगी लोक आपणाला नोकर ठेवावे लागतात व मग त्यांच्याशीं रोज उरस्फोड घालावी लागते. हरिदास लोक, अडाणी नोकरांच्या ज्या चमत्कारिक व हास्यास्पद गोष्टी सांगतात, त्यांतील कित्येक बऱ्याच गोष्टी असल्या नोकरांच्या असतात. घरकाम म्हणजे कांहींच नाहीं, तें वाटेल त्याला व वाटेल त्या वेळेंत उत्तम रीतीनें करतां येतें, अशीच मालकाची व नोकराचीहि समजूत असते, म्हणून हा इतका त्रास भोगावा लागत आहे, यांत कांहीं शंका नाहीं. उपजत शहाणा कोणीहि नसतो. जगांतील सर्व व्यवहार प्रत्येक मनुष्याला योग्य वेळीं शिकावे लागतातच. कित्येक व्यवहार शाळेंत जाऊन शिकावे लागतात व कित्येक अनुभवानें शिकावे लागतात. शाळेंत शिकलेल्या व्यवहारज्ञानांत अनुभवाची जर भर पडली, तर तो मनुष्य त्या कामांत निष्णात झाला, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. विद्यालयें हीं नुसतें लिहिणेंवाचणें शिकण्याचीं स्थळें असून, त्यांत व्यवहारिशिक्षण दिलें नाहीं तरी चालेल, अशी कल्पना दिवसानुदिवस नाहींशी होत चालली आहे, व ती नाहींशी होत जाणें, हेंच इष्ट आहे. सुधारलेल्या देशांत प्रत्येक धंद्याच्या शाळा आहेत. प्रत्येक धंद्याचीं शास्त्रें आहेत व तीं शास्त्रें त्या त्या शाळांत जाऊन शिकल्याखेरीज विवक्षित धंद्यांत मनुष्य तरबेज होत नाहीं, अशी तिकडील लोकांची सर्वसाधारण समजूत आहे. चांभाराचें शास्त्र, कुंभाराचें शास्त्र, भंग्याचें शास्त्र वगैरे शब्द आमच्या कानास गोड

लागत नाहींत. याचें कारण शास्त्र हा शब्द उंच दर्जातील असून त्याची सागड अति नीच जो भंगी वगैरेंचा धंदा, त्याच्याशीं केलेली आहे. पण ही कल्पना पुढेंपुढें नाहींशी होत जाणार, यांत कांहीं शंका नाहीं. हें लिहिण्याचा सारांश इतकाच कीं, घरकामी नोकरांना त्यांना कराव्या लागणाऱ्या धंद्यांचें शिक्षण जर शाळांतूनच मिळालें, तर ते नोकर जास्त उपयोगी, जास्त प्रमाणिक व जास्त फायद्याचे होतील, यांत कांहीं शंका नाहीं. परीट, सोनार, चांभार वगैरेंचा वर्ग असा आहे कीं, त्यांचे धंदे पिढीन्‌पिढी चाललेच आहेत. बापाचें काम मुलानें पुढें चालवावयाचें, अशी रीतच पडून गेली आहे, त्यामुळें मुलानें काय करावयाचें, हें पूर्वी बहुधा ठरलेलेंच असतें व त्या तऱ्हेचें शिक्षण त्याला बाळपणापासूनच घरीं मिळत असतें. आतां यावरून कोणी असें मात्र समजूं नये कीं, हें असलें घरीं मिळालेलें, शिक्षण सशास्त्र असतें, असें आह्मीं म्हणतों. आमच्या लिहिण्याचा मतलब इतकाच कीं घरकामी नोकरांना सध्यां कोणत्याच प्रकारचे जें शिक्षण मिळत नाहीं, त्यापेक्षां या लोकांना कांहीं तरी गृहशिक्षण मिळतें, ह्मणून घरकामी नोकरीचा धंदा करणाऱ्यां पेक्षां इतर धंदेवाले बरे; येवढेंच आमचें म्हणणें आहे.

आपण पुढें घरकामकरी किंवा घरकामकरणी होणार आहों, या ठरींव उद्देशानें कोणतीही मुलें शाळेंत जात नाहींत, ही गोष्ट खरी आहे. जे मुलगे शाळेंत जातात त्या सर्वांची हौस मामलेदार, मुनसफ, जज्ज, वकील, मास्तर किंवा गेला बाजार कारकून तरी व्हावयाची असतेच; व ज्या मुली शाळेंत जातात, त्या आपण सुशिक्षित व्हावें म्हणून जात नाहींत, तर सध्यांच्या काळीं साधारण लिहितां वाचतां आलेंच पाहिजे, त्या शिवाय नवऱ्याला बायको आवडत नाहीं, अशी कल्पना बहुतेक झालेली आहे, म्हणून मुली शाळेंत जातात. अमुक

एक धंदा शिकविण्यासाठीं ह्मणून ज्या शाळा अलीकडे झालेल्या आहेत त्यांची गोष्ट निराळी. पण लिहिणें वाचणें शिकविण्याच्या ज्या शाळा आहेत त्यांची स्थिती ही सांगितली. आतां प्रत्येक धंद्याच्या निरनिराळ्या शाळा झाल्या पाहिजेत ही गोष्ट इष्ट आहे खरी परंतु अनेक कारणांमुळें ती गोष्ट सध्यां शक्य नाहीं, ह्मणून आहेत याच शाळांतून जे मुलगे व ज्या मुली शिकत आहेत त्यांनाच अत्यावश्य गोष्टींचें शिक्षण देणें योग्य आहे. आतां जीं मुलें व ज्या मुली शाळांतून शिकत आहेत त्यांतील सर्वच मुलें मामलेदार होत नाहींत हें ठरलेलेंच आहे व सर्वच बायका मोठ्या मोठ्या पगार मिळविणाऱ्या मास्तरणी किंवा डाक्टरणी होत नाहींत हेंही उघडच आहे. त्यांतील कांहीं मामलेदार, मुनसफ, कांहीं वकील, कांहीं मास्तर, कांहीं कारकून, कांहीं पत्रकर्ते, कांहीं नाटकवाले, कांहीं खानावळवाले, कांहीं दुकानदार, कांहीं मजूर, कांहीं घरकामे असे होण्याचा प्रसंग येणारच. ज्या मुली सध्यां शिकत आहेत त्यांचाही प्रकार असाच आहे. कित्येक मेण्यांत बसून फिरतील, कित्येक पायांनेंच हिंडतील, कित्येक स्वातंत्र्यांत पतिसौख्यांत दिवस काढतील, व कित्येकांस दुसऱ्याची मर्जी संपादन करून भाकरी मिळवावी लागेल. सारांश, जशी वेळ येईल तशी पाठ देणें मनुष्यास भाग पडतें. यासाठीं सर्व प्रकारें व्यवहारीशिक्षण मुलांच्या आणि विशेषतः मुलींच्या शाळांतून देणें अगदीं अवश्यच आहे, व तें देण्यांत शिक्षकांनीं मुळींच हयगय करूं नये. चांगला यजमानपणा कसा मिळेल हेंही शिक्षकानें शिकविलें पाहिजे, व चांगला नोकरपणा कसा मिळवावा हेंही शिक्षकानेंच शिकविलें पाहिजे. मग ज्याच्या त्याच्या नशिबाप्रमाणें कोणी यजमान होऊन नोकरावर हुकूम करीत राहतील व कोणी नोकर होऊन नेहमी यजमानांची मर्जी संपादन करीत राहतील. आतां नोकर कसे असावे याविषयीं विचार पुढच्या भागांत करूं.

---



## भाग सतरावा.



## घरकामी नोकर.



**चांगल्या नोकराची परीक्षा.** चांगल्या नोकराच्या अंगीं खालील गुण असतातः—

(१) अमुक एक काम अमुकच प्रकारानें कां करावें व अमुक प्रकारानें कां करूं नये हें त्याला समजत असतें.

(२) तो स्वतः स्वच्छ असतो व जें काम करितो तेंही स्वच्छ रीतीनें करितो.

(३) त्याच्या कामांत नीटनेटकेपणा असून त्याचा स्वतःचा पोषाख व स्वतःची रहाणी यांतही नीटनेटकेपणा असतो.

(४) स्वभाव मनमिळाऊ असतो.

(५) हुकूम होतांच काम बजावावें अशी त्याला उत्सुकता असते.

(६) कामांत शिस्त, जलदी, आणि नियमितपणा हे तिन्ही गुण असतात.

(७) त्याच्या हातून काम होण्या जोगें असल्यास तो होय म्हणतो

नसल्यास नाहीं ह्मणून सांगतो. ह्मणजे एक सांगणें व एक करणें असें त्याच्याकडून कधींच होत नाहीं.

(८) धन्याचे हिताविषयीं नेहमी दक्ष असतो.

**हरकाम्या**—चांगला हरकामी असा एकच नोकर एकेक कामें करणाऱ्या पुष्कळ नोकरांपेक्षां हजार पटीनें बरा. अशा नोकराला खर्च कमी येतो व अनेक नोकरांवर दक्षता ठेवण्याचे कामीं जो वेळ मालक आणि मालकीण, यांचा जातो तो हरकामीं नोकर असल्यानें वांचतो. हिंदु सामाजिक पद्धतीप्रमाणें एकच हरकाम्या सर्व कामांना उपयोगीं पडेलच असा नियम नाहीं. ब्राह्मण कुटुंबांत स्वयंपाक, पाणी, सोवळें ओंवळें वगैरे स्वयंपाक घरांतील व देवघरांतील कामें खेरीज करून बाकीचीं सर्व कामें शूद्र हरकाम्याचे हातून होऊं शकतील. अशा कुटुंबांत एक ब्राह्मण व एक शूद्र असे दोन नोकर ठेवणें अवश्य आहे. तोच मराठ्यांच्या घरचा विचार केला, तर नुसता एकच शूद्र हरकाम्या असला ह्मणजे त्यांचीं सर्व कामें बिन बोभाट होण्याची सोय असते. आपल्या देशांतील अनेक जाती व अनेक पंथ यामुळें विवक्षित जातींतील हरकामे सर्वच जातींच्या कुटुंबांत उपयोगी पडावयाचे नाहींत हें खरें आहे. ही नड दूर होण्याला सर्वच जातीचे हरकामे तयार झाले पाहिजेत हें एक, किंवा लोकांनी तरी जातिनिर्बंधांचीं बंधनें जरा सैल केलीं पाहिजेत. या दोन्ही गोष्टी तूर्त तरी शक्य दिसत नाहींत. त्या अर्थीं सर्व प्रकारच्या नोकरांचीं कर्तव्यें कोणतीं आहेत, याचें थोडेसें वर्णन करणें अगदीं अवश्य आहे.

---



# भाग अठरावा.

## हरकाम्याची रोजनिशी.



हरकाम्याची रोजनिशी (ज्यांत सोंवळें आणि ओंवळें या गोष्टींचा संबंध नसतो, अशीं सर्व कामें हरकाम्याकडून होणें शक्य आहे.) व ज्यांना निरनिराळीं कामें करण्यासाठीं निरनिराळीं माणसें ठेवण्याची ऐपत नसते, त्या कुटुंबांत असला नोकर फारच उपयोगी आहे. अशा हरकाम्याला जीं कामें करावीं लागतात, तीं कशीं करावीं, हें खालील माहितीवरून कळेल.

(१) हरकाम्यानें रोज सकाळीं घरांतील सर्व माणसांच्या आधीं उठून, घरांत जर कांहीं जनावरें असतील तर, त्यांची नोकरी करावी. गोठा झाडून सारवून अगदीं स्वच्छ करावा. गाई म्हशींच्या धारा काढून, त्यांनां नेण्याला गुराखी आल्या बरोबर, त्यांनां सोडून बाहेर घालवितां येईल अशी सर्व व्यवस्था करून ठेवावी. आपल्या लोकांत आणि विशेषत: खेडेगांवांत जनावरें बांधण्याची जागा घरांतच कोठें तरी केलेली असते हें फारच अनिष्ट आहे. कित्येक अनुभवी आरोग्यशास्त्रवेत्त्यांचें असें मत आहे कीं गांवांतील सर्व लोकांचीं जनावरें बांधण्यासाठीं गांवाच्या बाहेर एक सार्वजनिक जागा असावी व त्या

ठिकाणीं सर्वांनीं आपआपलीं जनावरें नेऊन बांधावीं. खरोखर हि कल्पना फारच चांगली आहे व श्रमविभागाच्या तत्वानें असल्या संस्थांची व्यवस्था ठेविल्यास आतांच्या पेक्षां खर्चही कमी लागेल. प्रत्येक घरांतील गोठा बांधण्याचा खर्च, जनावरें राखणें, जनावरांच्या खाण्यापिण्याच्या वस्तूंचा निरनिराळा संग्रह केल्यामुळें होणारें नुकसान, आणि गांवांतील गलिच्छपणा, या सर्व नडी दूर होऊन, शहरांचें व खेड्यांचें आरोग्य वाढेल, यांत कांहीं शंका नाहीं. ही गोष्ट गांवांतील सर्व लोकांच्या जुटीवर व मतैक्यावर अवलंबून आहे, हें खरें, व ती जोंपर्यंत शक्य नाहीं, तों पावेतों निदान जनावरें घराच्या आंत तरी बांधूं नयेत. जनावरांची जागा घरापासून दूर असावी. ती स्वच्छ व कोरडी असली पाहिजे. गोठ्याच्या जमिनी गुळगुळीत असून सभोंवारच्या जमिनीपेक्षां त्या उंचीवर असाव्या म्हणजे ओलीची भीति राहणार नाहीं; जनावरांच्या गोठ्यांतील भिंती कशाहि असल्या तरी चालतात, अशी जी आपल्या लोकांची समजूत आहे, ती चुकीची आहे. मनुष्यांनां जसें दृष्टीचें सुखदुःख आहे, तसेंच जनावरांनां देखील आहे. वाईट भिंती पाहून त्यांना दुःख होतें; चांगल्या भिंती पाहून त्यांनां आनंद होतो. अशा गोष्टी अनुभवी लोकांनां माहीत आहेत. यासाठीं गोठ्यांच्या भिंतींनां, घरांतील भिंतींनां जसा रंग लावतात तसा रंग देणें चांगलें आहे. गोठ्यांतील भिंतींनां नुसता पांढरा रंग म्हणजे चुना कधींहि देऊं नये. चुन्याच्या पांढरेपणाकडे वारंवार दृष्टी गेल्यामुळें डोळे बिघडतात, यासाठीं चुन्यांत थोडीशी नीळ मिसळून, किंवा निदान कोळशाची पूड मिसळून तो रंग या भिंतींनां द्यावा. गोठ्यांत उजेड मुबलक असावा, पण डोळे दिपतील असा मात्र असतां उपयोगी नाहीं. प्रत्येक जनावराला निरनिराळी जागा असून तींत दुसरें जनावर येऊं नये, अशी व्यवस्था असावी. आपल्या लोकांत गाई म्हशी वगैरे जनावरांनां दाव्यानें बांधून घालण्याची जी चाल

आहे ती फार वाईट आहे. तिच्या मुळें जनावरांचें स्वातंत्र्य नाहींसें होतें. व केव्हां केव्हां त्यांनां इकडे तिकडे मनाप्रमाणें हालण्या सवरण्यास देखील अडचण होते. एकेका जनावराची निराळी जागा करून, दार जर आडव्या वांबूंनीं बंद करून टाकिलें, तर सुरक्षितपणा कमी न होतां, जनावराची सोय मात्र विशेष होईल. यासाठीं ही रीत अमलांत आणावी. गोठ्याची पुढील बाजू दिवसा अगदीं उघडी असूं नये. सूर्याचा प्रखर प्रकाश आंत न शिरेल, अशा बेतानें तट्टयाची तिरपी छपरी गोठ्याच्या पुढील भागाला लाविलेली असावी व रात्रीं तीच छपरी खालीं पाडून, दार बंद करावें, म्हणजे उन्हाचा त्रास कमी होईल, व पावसाचें पाणी आंत शिरणार नाहीं व रात्रीं जनावरांनां निवारा होऊन सुखानें झोंप लागेल. अंधार पडेल अशी गोठ्यांची रचना नसावी. मनुष्या प्रमाणेंच जनावरांनां देखील अंधार चांगला वाटत नाहीं व त्यांच्या प्रकृतीला तो मानवतहि नाहीं. गोठा रोज झाडून स्वच्छ केला पाहिजे व त्याच्या भिंती आणि लांकडें वगैरे आठवड्यांतून निदान एक वेळ तरी झाडून पुसून स्वच्छ केलीं पाहिजेत. जनावरांच्या मलमूत्रानें भिजलेलें गवत सर्व उचलून घरापासून लांब अंतरावर नेऊन टाकावें. कारण अशा गवतापासून अमोनिया नांवाचा वायू उत्पन्न होतो व तो जर जनावराच्या डोळ्यांत शिरला, तर त्यांचे डोळे बिघडतात.





# भाग एकोणिसावा.

## जनावरें.



गाई ज्यांच्या घरांत असतील, त्यांनीं त्या रोज धुतल्याच पाहिजेत. मनुष्या प्रमाणेंच त्यांना स्नानाची अवश्यकता असते. गाईची धार रोज दोन वेळां काढावी लागते. एकदां सकाळीं व एकदां संध्याकाळीं. गाईंनां उत्तम खाणें ह्मणजे गवत, कडबा, चूण, फोल, कोंडा व पेंड. यांपैकीं ज्याला जसें अनुकूल असेल तसें त्यानें घालावें. परंतु आपल्या देशांतील गाई, खाण्याच्या कमताई मुळें व इतर हाल अपेष्टे मुळें इतक्या रोड झालेल्या असतात कीं केव्हां केव्हां त्यांच्याकडे पाहवत देखील नाहीं. अस्थिचर्माचे सांगाडे झालेलीं जनावरें, आपण नेहमीं पाहतों याचें कारण दारिद्र्य. हें खरें आहे पण ज्याला अनुकूल नसेल त्यानें गाई अशी बाळगूंच नयेत हें उत्तम नव्हे काय ? गाई म्हशी रोड असण्याचें दुसरें असें एक कारण आहे कीं, वांसरें लहान असतांनां आपण त्यांनां आईच्या अंगावर पोटभर पिऊं देत नाहीं व केवळ स्वार्थबुद्धीनें आपल्या पोटासाठीं त्यांनां अर्धपोटीं ठेवितों; हें एक प्रकारचें पापच आहे, पण त्याचा विचार आपल्या लोकांच्या मनांत येत नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे.

आपल्या इकडील जनावरें रोडकीं, तीं दूध कमी देतात, व तीं अशक्त असतात, याचें कारण आपल्या इकडील गवतांत किंवा सरकींत कस नाहीं हें नसून, आपण त्यांनां अर्धपोटीं ठेवितों हेंच मुख्य आहे. आपल्या इकडील पद्धत ह्मटली ह्मणजे, आपणांला पुरून उरेल तेवढें दूध वासराला द्यावयाचें व केव्हां केव्हां सर्वच आपण काढावयाचें व त्यांनां उपाशीं ठेवावयाचें. विलायत, अमेरिका वगैरे देशांतील पद्धत अशी आहे कीं वासरांचें पोट भरपूर झाल्यावर, मग आपण दूध काढावयाचें. या दोन भिन्न रीतींचा परिणाम असा होतो कीं त्यांचे कडील गाईची वाढ खुंटत नाहीं; त्या दुबळ्या होत नाहींत व त्यांची वाढ पूर्णपणें होते; आणि त्या दूधहि आपल्या इकडील गाईच्या चौपटीनें देतात. असा अनुभव आहे. गाई ह्मशींची निगा कशी ठेवावी हें शास्त्र घरच्या मालकास माहीत असलें पाहिजे व त्यांची सुश्रुषा करणारा जो गडी त्यालाहि या गोष्टींचें ज्ञान असलेंच पाहिजे, त्या खेरीज हे अनिष्ट परिणाम टळावयाचे नाहींत.

**ह्मशी**—गाई पाळण्यापेक्षां म्हशी पाळण्यास खर्च फार येतो खरा पण त्यांपासून जें दूध निघतें तेंहि जास्तच असतें. एकंदरींत गाई-पेक्षां ह्मशी बाळगणें जास्त फायद्याचें आहे. गाई लवकर आटतात, ह्मशी लवकर आटत नाहींत.





# भाग विसावा.

---

## केर काढणें व बैठक घालणें.



मागील भागांत सांगितलेलें काम उजाडण्याचे पूर्वी संपलेच पाहिजे, ह्मणजे पुढील काम सोईवार होतें. हरकाम्याचें इकडील काम संपत आहे, तोंपावेतों घरचीं माणसे कांही उठलेलीं असतील व कांहीं उठत असतील इतक्या अवकाशांत हरकाम्यानें घरापुढील अंगण झाडून स्वच्छ करावें; अंगणाचा स्वच्छपणा हा घरांतील शोभे पैकीं एक अति महत्वाचा भाग आहे. एखाद्याचें घरीं आपण गेलों व त्या घरापुढील अंगण स्वच्छ व नीटनेटकें असलेलें पाहिलें ह्मणजे, आपणास किती आनंद होतो, याची कल्पना प्रत्येक अनुभवी मनुष्यास आहेच. अंगण स्वच्छ करितांनां कोंपरे, आडबाजू व त्यांत एकादा खळगा वगैरे असेल तो देखील झाडल्या खेरीज ठेवूं नये; व सर्व केर अंगणांतच कोठे तरी एकीकडे सांठवून न ठेवितां, तो गोळा करून दूर केरासाठीं ह्मणून जी जागा केली असेल, तेथें व्यवस्थेनें नेऊन टाकावा. अंगण ह्मणजे वाटेल तो घाण पदार्थ टाकण्याची जागा, अशी जी आपल्यांतील बहुतेक लोकांची समजूत आहे, ती होण्याचें कारण आपलीं अंगणें

असावीं तितकीं स्वच्छ नसतात, हें होय. तींच जर स्वच्छ राखिलीं तर त्या ठिकाणीं कोणीहि घाण टाकणार नाहीं. कारण स्वच्छ जागेवर घाण टाकण्याची दुसऱ्याला देखील लाज वाटते. स्वच्छ अंगण ज्या घराला असतें त्या घरांतील लोक निर्मळ, निरलस व व्यवस्थित आहेत अशी सर्वत्रांची समजूत होते. अंगण झाडून साफ करण्याचें काम संपेपर्यंत घरांतील मुलेंबाळें देखील निजून उठलेलीं असतील. या वेळांत हरकाम्याचें मुख्य काम म्हटलें ह्मणजे यजमान ज्या खोलींत किंवा ज्या जागेंत बसतात, ती जागा आधीं झाडून स्वच्छ करावयाची, हें होय. असें केल्यानें घरच्या मालकाला उद्योगधंदा करण्यासाठीं केव्हांहि खोळंबून बसावें लागत नाहीं. या जागेची स्वच्छता करितांनां त्यांतील सर्व खिडक्या उघडून, त्या वाऱ्यानें न झांकतील अशी व्यवस्था ठेविणें व त्या खोलींतील कागदपत्र, पुस्तकें व इतर जिन्नस ज्या ठिकाणीं पूर्वीं होते, त्याच ठिकाणीं पुसून ठेविणें, हें होय. अडाणी नोकरांच्या अव्यवस्थित स्वभावामुळें कागद व पुस्तकें भलतीकडे ठेविलीं जातात व मग यजमानांचें यःकश्चित गोष्टींसाठीं किती नडतें, याचा अनुभव पुष्कळांस आहे. तेव्हां चांगल्या नोकरानें ही गोष्ट विशेष लक्षांत ठेविली पाहिजे. खुर्च्या, टेबलें, कपाटें वगैरे लांकडी सामान रोजच्यारोज पुसलेंच पाहिजे. यजमान बसण्याची जी जागा ती घरांतील बहुधा मुख्य जागाच होय. त्या ठिकाणीं, पुस्तकें, कागदपत्र, लांकडीसामान, आरसे, तसबिरी, हंड्या, सतरंजा, गालिचे, लोड, तक्के वगैरे सामान असावयाचें ; तेव्हां त्या सामानावरील मळ कसा काढावा, या विषयीं माहिती नोकरास असणें, अगदीं अवश्य आहे. अशा रीतीनें सामानसुमान साफ करण्यास वेळ लागतो, ही गोष्ट खरी व तशी सवड सकाळीं नच मिळाल्यास तेंच काम प्रत्यहीं दोन प्रहरीं सर्व पुरुष माणसें जेवून खाऊन बाहेर कचेरीला अगर इतर उद्योगाला गेलीं ह्मणजे करावें. निरनिराळें सामान स्वच्छ कसें

करावें तें पुढें सांगितलें आहे. ज्या खोलींत सतरंजा अगर जाजमें कायमचीं इंतरून ठेवून, त्यावर लांकडी सामानसुमान व्यवस्थेनें मांडून ठेविलेलें असतें, त्या खोल्या झाडून साफ करणें फार कठीण व त्रासदायक असतें. हें काम मोठ्या दक्षतेनें केलेंच पाहिजे व याकामीं घाई अगदीं उपयोगी नाहीं. अशी जागा साफ करण्याला आपल्या इकडील केरसुण्यापेक्षां इंदुराकडे ज्या बारीक गवताच्या केरसुण्या मिळतात त्या फार उत्तम. आपल्या इकडील केरसुण्यांनीं केर साफ निघत नाहीं. त्या केरसुणीनें झाडल्यावर केर कोठेंहि राहणें शक्यच नाहीं. तशी एक केरसुणी, एक जाड सडांचा ब्रश, आणि चौकोनी आकाराचें लोखंडाचें, केर सांठण्यापुरतें, एखादें भांडें इतकी सामुग्री घ्यावी. प्रथमतः त्या खोलींतील जेवढें सामानसुमान उचलून ठेवण्याजोगें असेल, तेवढें खोलीच्या दारांत आणून ठेवावें, किंवा तेथें ठेवण्याची सवड नसल्यास खोलीच्या मध्यभागीं. सर्व सामान आणून रचावें. न उचलतां येण्याजोगें सर्व सामान कपड्यांनीं झांकून ठेवावें. असें केल्यानें खोलीच्या कोंपऱ्यांतील केर चांगल्या रीतीनें काढतां येईल. केर काढतांना बहुधा धुरळा उडत असतो व तो बंद करण्याची कांहीं सोय न केली तर विनाकारण इकडील धुरळा तिकडे आणि तिकडील इकडे, असा प्रकार होऊन, खोलींतील धुरळा नाहींसा मुळींच होत नाहीं. ज्या खोलींत जाजम, सतरंजी वगैरे इंतरलेली नसेल, तेथें थोडेसें पाणी शिंपडलें, तर धूळ उडत नाहीं, हें खरें, पण तसें करणें जाजम अगर सतरंजी इंतरलेल्या खोलींत शक्य नाहीं; यासाठीं अशा जागा झाडण्याच्या पूर्वीं, त्यांवर चहा करून घेतल्यावर जीं पानें शिल्लक राहतात, तीं थंड पाण्यांत धुवून ओलीं असतांनाच, जमिनीवर इकडे तिकडे पसरतील, अशी फेंकावी. किंवा रद्दी कागदाचे बारीक बारीक तुकडे करून ते पाण्यांत भिजवावे व ते चोंहीकडे टाकावे, हेंहि शक्य नसेल तर, ओलें गवत घेऊन तें,

पाण्यांत भिजवावें व थोड्या वेळानें त्याचे बारीक बारीक तुकडे करून ते जमिनीवर इकडे तिकडे टाकावे, किंवा ओलें गवत मिळत नसल्यास, वाळलेलें गवत घेऊन, तें थोडें जास्त भिजवावें व तें वरील प्रमाणेंच पसरावें. असें करण्याचा मूळ उद्देश इतकाच कीं, हे पदार्थ ओलसर असल्या कारणानें धुरळा उडाला तरी, तो या पदार्थांना चिकटून बसतो व तो हवेंत उडत नाहीं. व हे पदार्थ जमिनीवर ज्या ठिकाणीं शिल्लक राहतील, त्या ठिकाणीं केरसुणी फिरली नाहीं असें सहज समजून येणारें आहे. या दोन गोष्टींसाठीं हा उपाय योजावयाचा आहे. परंतु हे उपाय योजितेवेळीं चहाच्या पानांचा उपयोग करितांनां विशेष खबरदारी घेतली पाहिजे; कारण त्यांतील अर्काचा कांहीं अंश जर यांत राहिला असेल तर, त्याचे डाग जाजमावर किंवा सतरंजीवर पडतील. तीं पानें निथाल्यावर थंड पाण्यांत भिजवावीं व मग तीं जमिनीवर टाकावीं. एरवीं टाकूं नयेत. कारण त्यांचे अंगीं चहाचें कांहीं सत्व राहिलें असेल, तर त्याचे डाग जाजमावर किंवा सतरंजीवर पडण्याची भीति असते. आपल्या इकडे पाणी शिंपडण्याची जी रीत आहे, तीहि चांगलीच आहे. पण ती रीत नुसती जमीन जेथें असेल तेथेंच उपयोगी पडणारी आहे. एरवीं तिचा उपयोग होणें शक्य नाहीं. चहाचीं पानें शिंपडण्याची चाल विलायतेंतील आहे. कागदाचा चुरा भिजवून तो पसरण्याची चाल अमेरिकेंतील आहे. आणि गवताचा बारीक चुरा करून तो चोहोंकडे टाकण्याची चाल आस्ट्रेलियामधील आहे. असें करण्यांत "स्वार्थ व परमार्थ" या दोन्ही गोष्टी एकदम साधतात. चहाचीं पानें, कागदाचे कपटे किंवा गवताच्या काड्या या खोलींतून साफ निघाल्या ह्मणजे सर्व केर निघाला अशी खात्री होते व हे पदार्थ ओलसर असल्यामुळें धुरळा त्यांना चिकटून बसतो व त्यांच्या बरोबरच बाहेर निघून जातो. अशा रीतीनें केर काढण्याचें काम झालें म्हणजे तो सर्व

केर वर लिहिलेल्या पांटींत ब्रशनें भरावा, ह्मणजे जमिनीवर, शिलक कांहीं देखील राहणार नाहीं. सतरंजी किंवा जाजम फारच घाण झालें असल्यास, तें सबंध काढून धुतलेंच पाहिजे, पण तें जर एकादे दुसरें ठिकाणीं मळलें असेल तर ओल्या फडक्यानें घांसावें. फडकें ज्या पाण्यानें ओलें करावयाचें त्या पाण्यांत थोडासा टांकण खार घातला तर, सतरंजीचा रंग अगदीं नव्या रंगाप्रमाणें दिसेल.





# भाग एकविसावा.

## मेणबत्ती.



मेणबत्तीचे डाग जाजमावर किंवा सतरंजीवर पडलेले काढणें, मोठें बिकट काम आहे. पेटविलेली उघडी मेणबत्ती इकडून तिकडे नेतांना, कढलेल्या मेणाचे ओघळ वाहूं लागतात. त्याचे थेंब सतरंजीवर पडून ते तेथेंच थिजतात. व त्यांवरून मनुष्यें जाऊन येऊन ते बैठकीशीं अगदीं एकजीव होऊन बसतात. असले डाग काढण्याची उत्तम युक्ती ही आहे कीं, ते डाग प्रथमतः एकाद्या उलथन्यानें, किंवा चमच्यानें खरडून काढावे. याकामीं चाकू किंवा सुरी या हत्यारांचा उपयोग मात्र करूं नये. कारण त्यांच्या धारेनें बैठक फाटण्याचा संभव असतो. अशा रीतीनें खरडून काढल्यावर जाड टीप कागदाचा एक लहानसा तुकडा घ्यावा व त्याची दुहेरी घडी घालून, तो त्या डाग पडलेल्या ठिकाणीं ठेवावा आणि लोखंडाचा खिळा डोक्याकडून तापवून, तें डोकें त्या घडीवर ठेवावें, आणि हळू हळू तें दाबावें. असें एकदां केलें कीं, कागदाची दुसरी घडी घालावी व फिरून तसेंच करावें; असें दोन तीन वेळा केलें ह्मणजे, बहुधा तेलकट डाग नाहींसा होईल व नच झाला तर आणखी एक वेळा तसेंच करावें, ह्मणजे झालें.

बैठकीवर जर दुसऱ्या कोणत्याही तेलाचा किंवा तुपाचा डाग पडला असला तर "फूलर्स अर्थ"* Fuller's earth पाण्यांत भिजवून त्याचा लेप त्या डागावर करावा व एक दिवस तो तसाच ठेवावा. व दुसरे दिवशीं खरडून काढावा ह्मणजे तेलाचा डाग अगदीं नाहींसा होईल. दुसरा उपाय असा आहे कीं खडूची पूड घेऊन ती तेलाच्या डागावर दाट पसरावी व ती तशीच एक दोन दिवस राहूं द्यावी. ह्मणजे सर्व तेलकट, अंश ती पूड शोषून घेईल व बैठक स्वच्छ राहील. हिंगणमिटें नांवाचीं फळें सह्याद्रीच्या लगतीला मिळतात, त्यांचा फेंस अशा डागावर कुंचलीनें घांसला तरी देखील हे डाग निघतात. तसेंच तुरीच्या डाळीचें वरण किंवा हरभऱ्याचें पीठ पाण्यांत कालवून त्याचा लेप डागावर करून ठेवावा व दोन तीन तासांनीं तो धुऊन काढावा ह्मणजेहि हे डाग नाहींतसे होतात. पण हे शेवटले दोन उपाय प्रचारांत आणण्यास नड पडेल. सोंवळें ओंवळें व खरकटें यांची अडचण या उपायांच्या योजनेंत येईल; तेव्हां आपापल्या सोईप्रमाणें व समजुतीप्रमाणें ज्याला जो योग्य दिसेल, तो उपाय त्यानें करावा. ह्मणून विलायती व देशी असे दोन्ही उपाय वर लिहिले आहेत.

**शाईचे डाग**--बैठकीवर पडले तर, ती शाई ब्लॉटिंग पेपरनें प्रथम टिपून घ्यावी व मग त्या डागावर गाईचें किंवा ह्मशीचें निरसें दूध घालावें; व एकाद्या खादीच्या रुमालानें चोळावें म्हणजे कसल्याही शाईचा डाग असला तरी साफ निघून जातो. व बैठक साफ होते. टेबलावर घालण्याचे कपडे (टेबल क्लॉथ) असतात. यावर शाईचे डाग नेहमीं पडतात. तेहि याच रीतीनें घालवावे.

---

* टीप Fuller's earth (फूलर्स अर्थ) या नांवाची एक प्रकारची पांढरी पूड इंग्रजी औषधें विकणाऱ्यांच्या दुकानीं विकत मिळते. ती एक प्रकारची माती आहे. पण तिच्या सारखा पदार्थ आपल्या देशांत आहे असा शोध अद्याप लागलेला आह्मांस आमच्या डॉक्टर मित्रांपैकीं कोणीहि सांगितला नाहीं. व या पदार्थाला मराठी नांवहि अद्याप प्रचारांत आलेलें आढळत नाहीं.

लांकडी सामान, पुसण्याचें काम देखील सोपें नाहीं. हें करितांना, एक खादीचा कोरडा रुमाल, एक ओलसर रुमाल, एक ब्रश, एक शामीलेदरचा तुकडा, एक गुळगुळीत काडी व एक रेशमी रुमाल इतकी तयारी लागते. मोठें सामान असतें तें रुमालानें झटकून साफ निघतें. तसें खुराच्या, टेबलाचे पाय, कपाटें व नक्षी केलेलें लांकडी सामान निघत नाहीं; लहान सामान हळू हळू पुसावें लागतें; कांचेचें सामान साध्या रुमालानें पुसण्यापेक्षां रेशमी रुमालानें पुसलेलें चांगलें. नक्षी किंवा बारीक भोंकें असतील तीं काडीला कापड गुंडाळून त्यानें पुसल्याच्या योगानें धुरळा कोठेंहि रहात नाहीं दिवे, अरसे, तसबिरी, चित्रें वगैरे नाजूक जिन्नस पराच्या कुंच्यानें झाडावे. व रेशमी रुमालानें पुसावे, ह्मणजे त्यावर चरे पडणार नाहींत. पितळी, लोखंडी, जस्ती किंवा तांब्याच्या ज्या जिनसा असतील त्या मागें सांगितलेल्या पदार्थांनीं घांसून नेहमीं लखलखीत ठेवणें हें चांगल्या नोकरांचें काम आहे. दारांच्या बिजागऱ्या, कड्याकोंयडे देखील विस्मरणानें पुसण्याचे राहतां उपयोगी नाहींत. बिजागऱ्या घांसून पुसून स्वच्छ ठेवून त्यांच्या सांध्यांत वारंवार तेल सोडीत गेल्यास त्या फार दिवस टिकतात व नोकराचें लक्ष इतक्या बारीक सारीक गोष्टीपर्यंत देखील आहे, असें कोणाहि पाहणाराला वाटून त्या नोकराची तारीफ जो तो करीत रहातो.

छत, भिंती, कपाटें, टेबलें, खुरच्या, कोनाडे वगैरे कोणताहि भाग हात फिरल्याखेरीज रहाता उपयोगी नाहीं. मद्रासेंतील शाळेंत एकदां अशी गोष्ट झाली कीं, एका बाकाच्या खालच्या फळीला आंतील बाजूस एका गांधील माशीनें आपलें घर केलें होतें व तेथें तिनें अंडींहि घातलीं होतीं. एके दिवशीं एक मुलगी त्या बाकावर बसायला आणि त्या माशीची बाहेर पडण्याची वेळ येण्याला, एकच गांठ

पडली व माशीच्या वाटेंत मुलीची मांडी आल्याकारणानें तिनें मुलीच्या मांडीला नांगी मारिली व ती मुलगी वेदना होऊन रडूं लागली. हा सर्व परिणाम शाळा झाडणाऱ्याच्या निष्काळजीपणाचा होय, हें उघड आहे. मी स्वतः विद्यार्थीदशेंत असतांना माझ्या समोरच्या रांगेंतील मुलें ज्या बाकावर बसलीं होतीं, तें बाक उचलण्याचा एक-दार प्रसंग आला असतां, त्याच्या खालच्या बाजूस मोठ्या थोरल्या विंचवानें घर केलेलें मी पाहिलें. व मजबरोबर आणखी किती तरी मुलांनीं पाहिलें आहे; हाहि शाळा झाडणाऱ्याच्या निष्काळजी-पणाचा परिणाम होय. खोली किंवा कोणतीहि जागा झाडून सवरून-स्वच्छ करावयाची म्हणजे ती सर्व स्वच्छ झालीच पाहिजे. लांकडी सामानाच्या सांदी, फटी, आंतील भाग वगैरे नीट स्वच्छ रोजच्या रोज केलेच पाहिजेत, नाहींतर त्या ठिकाणीं मळ बसून, निरनिराळ्या किड्यांना तेथें घरें करण्यास फावतें व केव्हां केव्हां वरील प्रकारचे अपघातहि घडून येतात. या गोष्टी करण्यास वेळ फार लागेल, अशी कित्येकांची कल्पना झाली असेल, पण हा मजकूर लिहिण्याला जित-का वेळ लागतो व नंतर वाचनाला जितका लागतो, त्या मानानेंच तीं कामें करण्याला लागत नाहीं, हें मात्र खरें. नियमानें रोजच्या रोज हीं कामें करीत गेल्यानें खरोखर तीं तेव्हांच होतात; व श्रमहि विशेष पडत नाहींत. आपल्यांत एक म्हण आहे कीं "आळशाला काम दुणें" ती अक्षरशः खरी आहे. यासाठीं हीं कामें करणाऱ्या हरकाम्यानें आपल्या अंगावर आळसाची झुळूक देखील येणार नाहीं अशी नेहमीं तजवीज ठेवावी. अशीच एक म्हण दुसरी आहे कीं "कृपणाला बहु खर्च" तिचाहि अर्थ असाच आहे. म्हणजे काम कर-ण्याचे कामीं जो वेळेवर चिकूपणा करतो, त्याला तेंच काम पुढें सव्याज म्हणजे जास्त करावें लागतें.

---



# भाग बाविसावा.

## नोकरांचीं कामें.



हें काम संपेपर्यंत सकाळचे सात वाजलेले असतील. त्यावेळीं घरांतील सर्व माणसांचीं हंतरुणें काढावीं व त्यांवरील सर्व कपडे मागीलदारीं दोऱ्या बांधून, अगर दांड्यांवरून वाळत घालावे. हे कपडे वाळत घालणें, याचा अर्थ ते ओले झाले असतील, तरच वाळत घालावयाचे, असा नाहीं. हंतरुणावर मनुष्यें निजलीं ह्मणजे, त्यांच्या श्वासोश्वासांतून, घामांतून, तोंडांतून व इतर रीतीनें हि बरेच घाणवायू व पदार्थ शरीराच्या बाहेर पडत असतात व ते सर्व हंतरुणांतील पांघरुणांत मुरून बसतात. तसेंच घाणेरडे कपडे फिरून हंतरुणावर घातले तर, जुन्या घाणींत ही नवी घाण मिसळणार व घाणीची एकावर एक पुटें बसणार, हें उघड आहे. हीं पुटें बरींच वाळलीं म्हणजे ती मळाच्या रूपानें आपणांस दिसूं लागतात. पण रोज तीं सूक्ष्म प्रमाणानें मळतच असतात, हें उघड आहे. हा मळ व ही अदृश्य घाण रोजचे रोज सूर्याचे उष्णतेनें वाळवून, घालविणें हा मुख्य हेतु, अंथरुणावरील कपडे वाळत टाकण्यांत आहे. ऊन जरी नसलें तरी, नुसत्या मोकळ्या हवेंत टाकल्यानें देखील हेंच काम कांहीं अंशानें होतें, [illegible]वसाळ्यांतहि असें करण्यास विसरूं नये. या वेळीं बहुधा सर्व म[illegible] [illegible]त्या उद्यो-

गाला लागलेलीं असतात. मुलें व मुली शाळेंत गेलेलीं असतात; घरच्या बायका स्वयंपाक घरांत अगर माजघरांत चहापाणी अगर फराळ-फणी तयार करण्याच्या कामांत गुंतलेल्या असतात, व पुरुष आपापल्या खोल्यांतून आपले उद्योग करीत असतात. अशा वेळीं हरकाम्यानें सर्व घरचा केर स्वच्छ रीतीनें काढावा. केर काढण्याची आपली सध्याची जी पद्धत आहे, तिच्या योगानें बरेंच वांकून केर काढावा लागतो व त्यामुळें मनुष्य दमून त्याच्या कंबरेला कळ लागते. अगदीं बसूनच जर केर काढावा, तर काम लवकर उठत नाहीं व त्यांतहि श्रम पुष्कळ होतात. यासाठीं बारीक गवताच्या केरसुण्या लांब काठ्यांना बांधलेल्या, अशा दोन तीन तरी, प्रत्येक घरवाल्यानें संग्रहीं ठेवाव्या, हें बरें. कोणतेंहि काम उभ्यानें करण्यांत आळस नाहींसा होतो व तें काम चांगलें होतें. यासाठीं अशा केरसुण्यांचा उपयोग करणें जास्त सोईवार आहे. या केरसुण्यांपैकीं एक केरसुणी व खादीचा एक रुमाल असें साहित्य घेऊन, सर्व घराचा केर नोकरानें काढावा व केराच्या भांड्यांत नेऊन टाकावा. कोंपऱ्यांत केर ठेवण्याची चाल सर्वथैव अहिताची आहे. या रीतीनें घरांतील केर काढतांना सांदी, फटी, कोनाडे, खिडक्या, कपाटें, खुर्च्या, टेबलें वगैरे जिनसांची व्यवस्था, वर सांगितल्याप्रमाणें केलीच पाहिजे. पण ती गोष्ट वेळे-वर अवलंबून आहे. तें काम सकाळीं न करतां दोनप्रहरीं फुरसतीनें पण नियमानें केलें तरी चालण्यासारखें आहे. हरकाम्यावर पडणारें सर्व काम जें असेल, त्याची त्यानें आपल्या सोईप्रमाणें वाटणी करून, तेवढें काम दररोज नियमानें करीत जावें. म्हणजे त्याला कांहीं देखील जड जाणार नाहीं. ती वाटणी कशी करावयाची, त्याचा नमुना पुढें दाखविला आहे. त्याच नमुन्याप्रमाणें सर्वांनीं केलें पाहिजे; असा नियम नाहीं; पण ती पद्धत मात्र स्वीकारिली पाहिजे. त्या खेरीज नियमित वेळीं काम होणार नाहीं व फार श्रम झालेसे वाटणार नाहींत, हें खास.



# भाग तेविसावा.

---

## न्यारी.



न्यारी:-इतकें काम होई पावेतों हरकाम्याची सकाळच्या न्यारीची वेळ झालेली असते. त्यावेळीं त्याला मालकिणीकडून न्यारी मिळाली पाहिजे. या न्यारीच्या प्रकारासंबंधानें घरच्या मालकांनीं विशेष गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी ही आहे कीं, घरच्या गड्याला घरांतील उरलें सवरलेलें कांहीं असो, तें खावयास द्यावयाचें. गरीबीमुळें, व पोटाची आग विझविण्यासाठीं, ते लोक तसलें देखील अन्न खातात. पण त्यांत दोन मोठे तोटे होत असतात. एक तर मालकीण आपणास चांगलें अन्न खाण्यास देत नाहीं, ह्मणून नोकराची तिच्यावरची पूज्यबुद्धि कमी होते, व दुसरें असल्या अन्नानें रोगाचें बिऱ्हाड घरांत लवकरच शिरण्यास सवड होते. एकमेकाच्या मनाचा ओढा एकमेकाकडे लागावा, असा जर कांहीं मार्ग शोधून काढावयाचा असेल तर तो "अन्नदान" हाच आहे. जो तुमचें अन्न खातो, तो तुमच्यावर सहसा उलटून पडणार नाहीं. असें मत फार जुनें आहे व तें अद्यापहि खरेंच आहे, असें आपण अनुभवानें पाहत आलों आहों. पण याचा अर्थ असा मात्र नाहीं कीं, कोणीहि यावें, त्याला वाटेल तसलें,

अन्न खावयास द्यावें. आपण जें अन्न दुसऱ्यास देतों, तें आपण कधीं तरी खाल्लें असतें कीं नाहीं, हें पाहून मग द्यावें. नोकराला आंबलें अन्न खाण्याला दिल्यानें त्याचें मन फार खुष राहतें व आपली काळजी, घरची मालकीण, पोटच्या मुलाप्रमाणें घेते, असें त्याला वाटून, तो घरचें काम फार उत्साहानें व काळजीपूर्वक करूं लागतो. शिळेंपाकें आंबलेलें, मुंग्या आलेलें अन्न, नोकर लोकांना देणाऱ्या बायका कमी आहेत असें नाहीं. यावरून असें मात्र कोणी मानावयाचें नाहीं कीं, सर्वच शिळें अन्न टाकून दिलें पाहिजे. तसें करण्याचें कारण नाहीं. गरीबीमुळें शिळें अन्न खावें लागणारीं कुटुंबें आहेत खरीं, पण तें शिळें अन्न व्यवस्थितपणें ठेविलेलें असलें म्हणजे, मग कांहीं हरकत नाहीं.

शिजविलेले कोरडे पदार्थ म्हणजे भात, उसळी, मोकळी भाजी, भाकरी, वड्या, लाडू वगैरे पदार्थ सहसा नासत नाहींत. ते एका दिवसाचे, किंवा कांहीं जास्त दिवसांचे शिळे असले, तरी चालेल. पण ओले जिन्नस, म्हणजे पातळ भाज्या, बेसन, आमटी, कढी, वरण वगैरे जिन्नस कधींहि शिळे ठेवूं नयेत. व निरूपायानें ते राहिलेच तर म्हशीच्या आंबोणांत घालावे, भिकाऱ्यांना देखील ते पदार्थ घालूं नयेत. न्यारी झाल्यावर लगेच कोणतेंहि काम करणें प्रकृतीस वाईट; यासाठीं न्यारी नंतर एक तास विश्रांति घेऊन, हरकामी मनुष्यानें ताजेतवानें व्हावें व फिरून कामास लागावें. ही वेळ होईपर्यंत घरांतील लोकांची स्नानें वगैरे होऊन पुरुषांचीं धोतरें धुण्याची वेळ झालेली असेल, त्या कामाला यानें लागलें पाहिजे. धोतरें धुण्याचें काम म्हणजे कांहीं तरी आहे, व तें कोणासहि करितां येईल, अशी जी समजूत आहे, तीहि कांहीं इतर समजुतींप्रमाणेंच चुकीची आहे. धोत्रें धुणें ही देखील एक अल्पशी कलाच आहे व ती देखील समजून घेतली पाहिजे. आपणांतील कांहीं लोकांची धोत्रें अगदीं

गुलाबाच्या कळीसारखीं असतात व कांहींवर बायकांच्या चंद्रक-केची झांक मारीत असते, याचें कारण शोधूं गेलें असतां, कांहीं दोष धुणारांचे व कांहीं वापरणारांचे, असें नजरेस येतें. पण धोत्रें कशीं धुवावीं हाच विषय प्रस्तुत भागाचा असल्यामुळें धोत्रें वापरणारांचें गुणदोष आतां काढतां यावयाचे नाहींत.





# भाग चोविसावा.

## कपडे धुणें.



पडे धुणें.—कपडे धुण्याचा धंदा जरी परटाचा आहे, तरी तो घरच्या गड्यानें केला असतां, किंवा प्रसंग-विशेषी घरच्या कोणत्याहि माणसानें केला असतां, विशेष बाध येईल, असें वाटत नाहीं. परंतु तो कर-ण्यास काल्पनिक व कांहीं सामाजीक आणि धार्मिक अडचणी असल्या तरी, कपडे धुण्याच्या शास्त्रांतील मूलतत्वें प्रत्येक नोकरास प्रत्येक गृहस्थांस व प्रत्येक गृहिणीस समजणें अत्यावश्य आहे. या विषयाची सविस्तर माहिती पुढें याच पुस्तकांत योग्य स्थळीं दिलेली आहे ह्मणून ती येथें सविस्तर देण्याचे कारण नाहीं. धुण्याच्या संबंधानें तीनच मुख्य गोष्टी घरच्या गड्याने लक्षांत ठेविल्या, तरी देखील पुष्कळ फायदा होण्याजोगा आहे. त्यांपैकीं पहिली गोष्ट ह्मणजे आपण ज्या पाण्यांत धोतरें धुणार आहों, तें मृदु आहे किंवा तीव्र आहे, ही माहिती गड्याला असली पाहिजे. अमुक तळ्यांतील किंवा नदींतील पाणी कोणत्या प्रकारचें आहे, हें समजणें फारसें कठीण नाहीं.

पाण्यामध्ये मुख्य प्रकार तीन आहेत:—

( १ ) शुद्ध पाणी.

( २ ) मृदु पाणी.

( ३ ) तीव्र किंवा कठीण पाणी.

**शुद्ध पाणी** जें असतें, त्याच्या आंगीं खालील गुण अवश्य असतात.

( १ ) तें थोडेसें घेऊन पाहिलें तर, तें रंगहीन आहे असें दिसून येतें. पण तें पुष्कळ ज्या ठिकाणीं आहे, अशा ठिकाणीं पाहिलें तर, त्याचा रंग अगदीं गहिरा निळा आहे, असें दिसतें.

( २ ) जरी तें कांहीं वेळ तसेंच ठेविलें तरी त्याला वास कोणत्याही प्रकारचा येत नाहीं.

( ३ ) त्याचा एक घोंट पोटांत गेल्याबरोबर परमावधीचा संतोष होतो व तें नेहमीं चकाकत असतें. पाण्याच्या आंगीं कडवटपणा किंवा खारटपणा असणें चांगलें नाहीं.

( ४ ) अशा पाण्यानें हात धुतले तर, तें हातांना अगदीं मृदु लागतें व धुतलेल्या हातांना रुक्षपणा येत नाहीं.

( ५ ) स्वच्छ ग्लासांत घेऊन, उन्हापुढें तें धरलें तर, तें अगदीं स्वच्छ दिसतें व केराचे कण किंवा दुसरे कोणतेहि बारीक कण त्यांत तरंगतांना दिसत नाहींत. हें पाणी पिण्याला अति उत्तम.

( २ ) **मृदुपाणी**. पाणी जमीनींतून वहात असतां त्यांत बहुधा पुष्कळ प्रकारचे क्षार व खडूचा अंश मिसळला जातो. असे क्षार किंवा खडूचा अंश ज्या जमिनींत नसतो; तींतूनच जर पाणी वाहत वाहत आलेलें आपण उपयोगांत आणिलें, तर त्यांत कपडे वगैरे चांगले धुतले जातात व ते लवकर स्वच्छहि निघतात. पाणी मृदु म्हणजे धुण्याच्या कामाला योग्य आहे कीं नाहीं, हें पाहण्याची

कृती अशी आहे की, आपण साबण घेऊन तो पाण्यांत धरून हातांवर घांसावा, म्हणजे खूप फेंस पडला तर, तें पाणी मृदु किंवा कपडे धुण्याला योग्य आहे, असें समजावें. असें होत नसेल तर, त्या पाण्यांत क्षार आणि खडूचा बराच अंश मिसळला आहे, असें समजावें. अशा पाण्यास

( ३ ) **कठोर पाणी** असें म्हणतात. कठोर पाण्यांत साबणाचा फेंस निघत नाहीं, कारण साबणांत जीं द्रव्यें असतात त्यांचा आणि कठोर पाण्यांतील खडू आणि इतर क्षारांचा रसायनिक संयोग लवकर होतो व खडूमुळें साबणांतील फेंस उत्पन्न करणारे पदार्थ समूळ नाहींसे होतात. पाण्यांत जर एक गुंजभर खडूचा अंश असला, तर तो नाहींसा करून पाणी मृदु स्थितींत येण्यासाठीं १० गुंजा तरी साबण त्यांत झिजवावा लागतो, यामुळें साबणाचा खर्च दसपटीनें वाढणार हें उघडच आहे. फेंस उत्पन्न झाल्याखेरीज कपडा स्वच्छ निघूं शकत नाहीं व फेंस उत्पन्न करण्याला इतका साबण व्यर्थ खर्च करावा लागतो; यावरून कठोर पाणी हें धुण्याच्या कामाला उपयोगी नाहीं हें उघड दिसून येईल. असें पाणी चांगल्या म्हणजे मृदु स्थितींत आणितां येतें पण तसें करण्याला खर्च बराच येतो. हें पाणी घेऊन खूप उकळावें, म्हणजे पाण्यांतील कारबानीक असिड वायू आणि खडूचा अंश यांचें जें पूर्वी रसायनिक मिश्रण झालेलें असतें व ते दोन्ही अगदीं एकरूप झालेले असतात; त्यांचे उष्णतेच्या योगानें पृथःकरण होऊन कारबानिक असिड ग्यास हवेंत उडून जातो व चॉक पाण्याच्या तळाशीं जाऊन बसतो. अशा प्रकारें चॉक व इतर क्षार खालीं बसून बसून, पाणी तापविण्याच्या भांड्यांच्या बुडाशीं पापडी बसलेली, आपणांस पुष्कळ वेळां दिसते. पाणी उकळणें, व पाण्याची वाफ करून फिरून तिचें पाणी करणें, या

दोन्ही गोष्टी मोठ्या खर्चाच्या आहेत; पण ज्या ठिकाणीं मृदु पाणी मिळूं शकतच नाहीं, तेथें अनुकूळ असणाऱ्यानें या कृति कराव्या व तें पाणी धुण्याच्या कामीं वापरावें. आपल्या देशांत असें करण्याचा प्रसंग बहुधा येणार नाहीं, कारण जिकडे तिकडे स्वच्छ व मृदु पाण्याचीं तळीं, विहिरी व नद्या पुष्कळ असतात; तेव्हां या संबंधानें नड येण्यासारखी नाहीं.

धुणीं धुतांना, आपल्या लोकांत कापड धोंड्यावर खूप जोरानें आपटण्याची जी चाल आहे, तिच्यामुळें कपडे खराब होऊन, लवकर फाटतात. अशा रीतीनें आपटून धुण्यापेक्षां जें कापड धुवावयाचें असेल, तें भिजवून त्याला साबणाचा फेंस लावावा व तें हळू हळू चुबकावें, अशा रीतीनें कपड्याला साबण तीन चार वेळां लावून मग तो स्वच्छ पाण्यांत चांगला खळबळून काढावा. सारांश; कपड्याच्या धाग्यांना इजा न होतां मळ निघेल, अशी तजवीज केली पाहिजे. आपटण्यानें कपडा झिजतो. चुबकण्यानें तो झिजत नाहीं व धुण्याचा मूळ उद्देश कपडा झिजविण्याचा नसून मळ काढण्याचा आहे. तो साबणाच्या रसायनीक क्रियेनें व हळू हळू चुबकण्याचे योगानें सहज साध्य होतो. कित्येक नोकरांना ही गोष्ट माहित नसल्यामुळें ते धोतरें वगैरे कपडे धोंड्यावर खूप जोरानें आपटतात. व वाटेल त्या रीतीनें पिळून, घरीं आणून वाळत घालतात; हें चांगलें नाहीं. धोतरावरचे डाग घालविण्याची कृति तर पुष्कळांस मुळींच माहित नसते. डाग पडला कीं साबण लावावा, येवढी गोष्ट सर्व साधारण त्यांना माहित असते, पण सर्वच प्रकारचे डाग साबणानें निघतात, असें नाहीं. फळांचा किंवा पानांचा रस वगैरे पडून, जे डाग धोतरावर पडतात, ते ओले असतानांच, किंवा निदान ते पडून फार वेळ झाला नाहीं इतक्यांतच, काढिले पाहिजेत, नाहीं तर ते

निघावयाचे नाहींत, फळें वगैरे वनस्पतिजन्य डाग काढणें असल्यास, त्या डागांवर लिंबाचा रस लावावा. व कांहीं वेळानें ते धुवावे, ह्मणजे निघून जातील, शाईच्या डागानें खराब झालेला कपडा कधींहि साबणाच्या पाण्यांत किंवा उन्ह पाण्यांत घालूं नये. कारण असें केल्यानें तेच डाग पक्के होतात. असे डाग काढण्याला लिंबाच्या रसाचाच उपयोग करावा. मग ते थंड पाण्यांत घालून धुवावें. उन्ह पाण्याचा उपयोग या कामीं केव्हांहि करूं नये. धोतरें, उपरणीं, लुगडीं, साड्या, चिरड्या, पातळें वगैरे कपडे धुतल्यानंतर त्यांतील पाणी काढून टाकण्यासाठीं ते पिळतात. पिळण्यापासून कापडांतील कित्येक सुतांवर ताण जास्त बसतो व तीं हळू हळू तुटतात. यासाठीं, ओला कपडा दोन फळ्यांच्यामध्यें घालून, त्यावर उभें राहावें, ह्मणजे सर्व पाणी बहुधा निचरून जातें. अशी सवड नसल्यास व पिळण्याखेरीज भागतच नाहीं असें असल्यास वर सांगितलेले कपडे पाण्यांत उभे धरून खळखळावे व ते उभे पिळावे. आडवे पिळूं नयेत. आडवे पिळल्याच्या योगानें, कांठांत पाणी मुरून, कांठ लवकर कुजतात व फाटतात. अगदीं तलम मलमलीचीं धोतरें वगैरे नाजूक कपडे, पिळतांना किंवा दाबतांना ते एका दुसऱ्या कपड्यांत घालून पिळावे, किंवा दाबावे, ह्मणजे त्यांचे धागे दुखावणार नाहींत.

**धोत्रें वाळविणें.**—धोत्रें व लुगडीं धुऊन झाल्यावर तीं वाळण्यासाठीं दोरीवर किंवा दांडीवर घालणें तीं देखील त्यांचे कांठ खालीं करून वाळत घालूं नयेत. असें केल्यानें कांठांत पाणी उतरतें व कांठ लवकर कुजतात आणि फाटतात. कांठ नेहमीं बाजूला करावे.

---



# भाग पंचविसावा.

## बागबगीच्या.



बागबगीच्या.—धोत्रें धुऊन वाळत घालण्याचें काम संपेपर्यंत इकडे घरांतील सर्व मनुष्यांचीं जेवणें होऊन गड्याची जेवणाखाणाची व सुटीची वेळ होतेच. या दोन तासांत त्यानें जेवावें व विश्रांती घ्यावी. पुढें दोन पासून तो जर कामाला लागला तर, व त्यानें नियमितपणें व हुषारीनें सर्व कामें बजाविलीं तर, मालकाची सर्व कामें होऊन, त्याला बराच वेळ सांपडेल, यांत कांहीं शंका नाहीं. घराभोंवती लहानशी बाग असते, या ठिकाणीं यावेळीं हरकाम्यानें काम करण्यास सुरवात केली पाहिजे. घरासभोंवतालची बाग म्हणजे केवळ शोभेसाठीं कांहीं झाडें, लाविलेलीं असतात, पण शोभेपेक्षां ज्यांचा उपयोग निर्वाहाकडे ज्यास्त होईल अशी झाडें, वेल, कंद वगैरे घराभोंवतीं लाविले तर शोभा व सोय या दोन्ही गोष्टी साधण्याजोग्या आहेत; व असल्या कामाची पूर्ण माहिती असणाऱ्या गड्याला एखादा रुपया ज्यास्त पगार पडला तरी, असाच गडी ठेवणें ज्यास्त फायदेशीर होणार आहे. हें उघडच आहे. घराभोंवतालच्या बागेंत फुलझाडें व भाजीपाला तयार करून त्यांचा उपयोग ज्या कुटुंबांना करून घेतां येतो, ती कुटुंबें खरोखर फार

सुखी आहेत. घराभोंवतालच्या फुलांनीं घराला शोभा येते, हवा निरोगी होते, दृष्टीला व घ्राणेंद्रियाला सुख होतें, इतकेंच नव्हे, तर त्यांच्या योगानें स्वार्थ व परमार्थ हे दोन्ही साधतात. घराभोंवतालच्या आम्यांत उत्पन्न झालेली भाजी, बाजारांतील भाजीपाल्यापेक्षां ताजी खाण्यास मिळते, व तिची रुचीहि जास्त लागते. असो. घराभोंवतालच्या बागेंतील नेहमींचें काम म्हणजे भांगलणें, खुरपणें, झाडें छाटणी करणें पानांवरील व फुलांवरील कीड काढणें, पाणी घालणें, झाडांच्या मुळांजवळची जमीन पोकळ करणें, खत घालणें, निरुपयोगी झाडें उपटून टाकणें व नवीन लावणें, यासंबंधाची माहिती पुढें दिली आहे, ती पाहावी.

गड्याचें रोजचें विशेष काम म्हणजे झाडांना पाणी घालणें, हें होय. पाणी घालावयाचें तें ऐन उन्हाचे वेळीं कधींहि घालूं नये. कारण अशा रीतीनें घातलेलें पाणी उन्हानें कडक तापलेल्या मातीवर पडतें व त्यांतील उष्णतेच्या योगानें पाण्याची वाफ बनते; व ती झाडांच्या मुळांत व पानांत शिरून, झाडाला थंडाव्याचे ऐवजीं उष्णताच जास्त पोंचते व झाड जायबंदी होतें; यासाठीं पाणी घालणें तें सकाळीं अगर संध्याकाळीं सूर्याची उष्णता कमी झाल्यावर घालावें; म्हणजे ४ वाजण्याचे पुढें ही वेळ असली पाहिजे. पाणी घालणें तें झाडांच्या मुळांशीं लहान मोठीं आळीं करून त्यांत भरपूर घालून ठेवावें व बारीक भोंकाच्या हजाऱ्यानें झाडांवरही शिंपावें, म्हणजे त्यांवरील धुरळा धुतला जातो व झाडाला जास्त टवटवी येते.



# भाग सविसावा.

## नोकरांचीं कामें.



हें काम झाल्यावर संध्याकाळची वेळ होते. या वेळींही फिरून सर्व घर झाडून काढलें पाहिजे. कारण माणसांचा व मुलांबाळांचा वापर सर्व घरांत दिवसभर झाला असल्यामुळें कागदाचे कपटे, चिंध्या, दोऱ्याचे तुकडे, भाजीपाल्याचे देंठ वगैरे कांहीं कांहीं ठिकाणीं पडलेले असतात, ते काढून घर स्वच्छ झालेंच पाहिजे; यासाठीं तें फिरून झाडावें. यावेळीं सकाळीं जितका वेळ लागला तितका लागणार नाहीं, हें उघडच आहे. केर काढून झाल्यावर दिवा बत्तीची वेळ होत येते. त्या वेळीं घरांतील सर्व दिवे एके ठिकाणीं जमवून ते स्वच्छ केले पाहिजेत. इंग्रजी अमलाबरोबर इंग्रजांच्या पुष्कळ गोष्टी आपण वापरूं लागलों आहों. त्यांचे दिवे, त्यांचीं भांडीं, त्यांचे कपडे, त्यांचीं हत्यारें व इतरही पुष्कळ गोष्टी आमच्या घरांत इंग्रजी तऱ्हेच्या शिरल्या आहेत. असा प्रकार होणें, बरें का वाईट याचा विचार करणें, अगदीं स्वतंत्र विषय आहे, पण प्रत्येक देशांतील जानपद या नात्यानें विचार केला तर स्वत्व सोडून परकीयांच्या देशांतील वस्तूंना आदर करणें हेंच अवनतीचें लक्षण आहे, असें पुष्कळ इतिहासकारांचें खरें खरें मत

10

आहे. आपले जिन्नस वाईट असतील तर ते सुधारा, नवीन करा व ते घ्या. जुनें निरूपयोगी असेल तें नवीन करा, पण तुमचें तुम्हीं करा, दुसऱ्याचें उसनें घेऊं नका, येवढें बीज तरी मुलांच्या व मुलींच्या मनावर ठसलेंच पाहिजे असें आह्मास वाटतें. असो; आपण तूर्त ज्या वस्तूंचा शिरकाव आपल्या प्रपंचांत झालेला आहे, त्यांतील प्रस्तुत विषयाशीं ज्यांचा संबंध आहे, त्या विषयीं विचार करूं. अशा वस्तु म्हटल्या ह्मणजे

**इंग्रजी दिवे** हे होत. चिमण्या, स्टँड, ऑर्गेन, वगैरे इंग्रजी सामान घेण्यांत आपल्या लोकांची जी चूक होते, ती ही कीं आपण तें सामान चांगल्या प्रतीचें बहुधा घेत नाहीं. याचें कारण दारिद्य, हें जरी बऱ्याच अंशीं खरें आहे, तरी अनुकूल असणारे गृहस्थहि चांगलें सामान विकत न घेतां, अगदीं लेचेपेचे व लवकर बिघडणारे असेच जिन्नस खरेदी करतात. याचें प्रत्यक्ष उदाहरण पहावयाचें असल्यास मुंबई, मद्रास, कलकत्ता, वगैरे मोठमोठीं जीं व्यापाराचीं ठिकाणें आहेत; तेथें एकच नांवाचा माल इंग्रजी दुकानांतून, आणि आपल्या दुकानांतून, विक्रीसाठीं मांडलेला असतो, त्यांतील फरक पाहवा. मालाची पुरती परीक्षा आपणास नसल्यामुळें किंवा व्यापारांतील फसवाफसव एकीकडे ठेविली तरी, इंग्रजी दुकानांतील माल थोडा जास्त किंमतीनें पडतो खरा, पण तो योग्य दक्षतेनें घेतला तर, परिणामीं स्वस्तच पडतो, यांत कांहीं शंका नाहीं. आम्हीं वापरतों ते इंग्रजी कपडे, इंग्रजी सामान, इंग्रजी घड्याळें, इंग्रजी दिवे व आणखी शेंकडों इंग्रजी गोष्टी, आणि त्याच जिनसा त्यांच्या घरांतून ज्या आपणांस दिसतात, त्यांत फरक नाहीं, असें कोण म्हणेल? खपाच्या मानानें माल तयार होणारच; व या मुळें 'नेटिवासाठीं' हलक्या प्रतीचा व साहेब लोकांसाठीं जास्त सुबक व टिकाऊ माल

विलायती कारखान्यांतून तयार होतो, हें उघडच आहे. वास्तविक विचार केला तर असें दिसून येईल कीं, ज्यांचें विलायती दिव्यांखेरीज अडत नाहीं, त्यांनीं ते घेण्याच्या भानगडींत पडूंच नये; व जर या भानगडींत पडावयाचेंच आहे, तर त्या दिव्यांची नीट व्यवस्था ठेविलीच पाहिजे. आपल्या देशांतील गड्यांना तर या दिव्यांची रचना व त्यांतील सोई वगैरे कळत नाहींतच, पण कुटुंबांतील चांगल्या शिकलेल्या सवरलेल्या माणसांपैकीं फारच थोड्यांना या विलायती दिव्यांच्या सोई व त्यांची रचना कळत असते. बाजारांतून एखादा नवीन नमुन्याचा दिवा आणिला तर, त्यांतील यंत्रांची साधारणपणें माहिती घरांतील माणसांना करून देण्याइतकें ज्ञान घरच्या मालकाला व मालकिणीला अवश्य असलें पाहिजे; व प्रकाशाच्या उपयोगी जीं निरनिराळी तेलें किंवा द्रव्यें पडतात, त्यांची ही चांगली माहिती मालक आणि मालकीण यांनीं करून घेतली पाहिजे.

सध्यां विशेष प्रचारांत असणारीं तेलें म्हटलीं ह्मणजे तिळेल, करडेल, भुईमुगाचें तेल, करंजेल, उंडेल, एरंडेल, खोबऱ्याचें तेल, आणि क्वचित कवठेल हीं होत. यांपैकीं खोबरेल सर्वांत उत्तम, त्याचा प्रकाश स्वच्छ पांढरा असून, थंड असतो व त्याची घाण समईला वगैरे बसत नाहीं. त्याच्या खालोखाल तेल ह्मटलें ह्मणजे करडईचें. तीळ किंवा भुईमूग यांचा प्रकाश करडईचे तेलापेक्षां कमी पडतो व घाणहि थोडी जास्त असते. करंजीचें तेल अगदीं मंदप्रकाशी असतें खरें, पण त्याचा डाग बिलकूल पडत नाहीं. त्याला घाण फार असते आणि त्याचप्रमाणें उंडलीच्या तेलाचाहि प्रकार आहे; परंतु त्याची घाण समईवर व भांड्यांवर बसलेली लवकर निघत नाहीं. या उद्भिज्य तेलांचा उपयोग देशपरत्वें होत असतो महाराष्ट्र, कर्नाटक, तेलंगण आणि बालेघाट वगैरे घाटी प्रांतांत.

भुईमूग, करडई व तीळ यांच्या तेलाचा प्रघात फार आहे. खोबरेल उंडेल व क्वचित् कवठेल यांचा उपयोग कोंकणांत फार होतो. नागपूर वगैरे प्रांताकडे एरंडेलाचा प्रघात फार व या सर्व प्रांतीं करंजेलाचा उपयोग कोठें कोठें करण्यांत येतो. या सर्व तेलांना मागें सारणारें ' रॉकेल ' अलीकडे सर्वत्र प्रचारांत आलेलें आहे; व मुंबई, कलकत्ता व मद्रास या मोठ्या शहरीं कोलग्यास ( धुराचे दिवे ) व वीज यांचाहि प्रकाशाचे कामीं उपयोग करूं लागले आहेत. तेव्हां या नवीन प्रकारच्या प्रकाशसाधनांची माहिती नोकर व घरचे यजमान आणि यजमानीण यांस अवश्य असली पाहिजे.





# भाग सत्ताविसावा.

## रॉकेल.



केल.—हा इंग्रजी शब्द रॉक-खडक आणि ऑईल म्हणजे तेल, या दोन शब्दांचा मिळून अपभ्रंश झालेला आहे. हें तेल खडकांत सांपडतें व तें पाण्याप्रमाणें जमिनीच्या पोटांतून वहात असतें, यावरून मूळ ठिकाणीं तें किती स्वस्त असेल, याची कल्पना करावी. त्याला जी आपल्या इकडे किंमत पडते, ती तें ज्यांत भरलेलें असतें तो जस्ती डबा, व असे डबे ठेविण्यासाठीं जी देवदारी पेटी केलेली असते, ती पेटी; तें समुद्रावरून आणि जमिनीवरून इतक्या दूर वाहून आणण्याची मजूरी व तें मूळ अशुद्ध स्थितींतून, जाळण्याजोग्या शुद्ध स्थितींत आणण्यासाठीं, ज्या रासायनिक क्रिया कराव्या लागतात, त्यांचा खर्च आणि या सर्वांवर व्यापाऱ्याचा नफा या सर्व गोष्टी एके ठिकाणीं झाल्यामुळें पडत असते. हें तेल पृथ्वीवरील पुष्कळ ठिकाणीं मिळतें, पण त्यांतल्या त्यांत रशिया देशांत याचा सांठा जमीनींत अत्यंतच आहे, असें दिसतें. अमेरिका; सुमात्रा व ब्रह्मदेशांत देखील, याच्या कांहीं खाणी आहेत, पण रशिया सारखी प्रसिद्धी इतर ठिकाणच्या तेलाची नाहीं. या तेलांत चांगल्या किंवा वाईट अशा, ज्या जाती ठरवावयाच्या, त्या एक तर

तें ज्या देशांत तयार झालें असेल, त्यावरून व तें कितपत शुद्ध केलें आहे, अशी त्यावर जी खुण लिहिलेली असते, तीवरून. रशियांतील तेल चांगलें, हें वर सांगितलेंच. आतां त्यांतहि १२५° व १५०° असे जे दोन प्रकार असतात, त्यांचा अर्थ असा कीं, पहिलें तेल १२५ डिग्री उष्णतेनें पेट घेतें व दुसरें १५० डिग्री उष्णतेनें पेट घेतें. पहिल्या प्रकारच्या तेलानें अपघात फार होतात, तितके दुसऱ्या प्रकारच्या तेलानें होत नाहींत. अमुक तेल चांगलें किंवा वाईट, हें समजण्यासाठीं असें करावें कीं, अर्धा शेर पाणी घेऊन, तें खूप तापवावें व अगदीं सळसळून आधण आलें म्हणजे, त्यांत अर्धा शेरच थंड पाणी मिसळावें; नंतर ज्या तेलाची आपणांस परीक्षा पाहावयाची असेल, त्या तेलापैकीं एक लहानसा चमचा भर किंवा संध्येच्या दोन पळ्या तेल घेऊन, त्यांत ओतावें व त्याला बत्ती लावावी अशा पेटविण्यानें जर त्या तेलानें पेट घेतला, तर तें तेल वाईट आहे, असें समजावें व त्याचा उपयोग दिव्याचे कामीं कधींहि करूं नये. १५०° चे तेल चांगलें असतें. त्याहि पेक्षां "व्हाईट रोज" म्हणून जें अमेरिकन तेल असतें, ते फारच चांगलें.

रॉकेलचे दिवे रोजच्या रोज पुसून स्वच्छ केलेच पाहिजेत. आपल्या लोकांत निष्काळजीपणानें वापरण्याच्या योगानें चिमण्या फार फुटतात. त्या फुटण्याचें मुख्य कारण त्यांना एकदम उष्णता पोंहचते, किंवा एकदम थंडी पोंहचते, हें होय. अशा प्रकारें चिमण्या न फुटण्याला असा एक उपाय आहे कीं, चिमण्या वापरावयाला लागण्याचे पूर्वीं त्या एका पातेल्यांत, बुडाशीं व सभोंवतीं गवत घालून, त्यावर ठेवाव्या, व पातेल्यांत त्या चिमण्या बुडे पर्यंत थंड पाणी घालावें; तें पातेलें चुलीवर ठेवून त्याच्या खालीं मंद जाळ लावावा आणि पाणी सावकाश उकळूं द्यावें. नंतर पातेल्याखालचा जाळ हळू हळू कमी

करीत करीत, तेंच पाणी थंड होऊं द्यावें; असा प्रयोग कांचेच्या चिमण्यांवर केल्याच्या योगानें त्यांचा ठिसूळपणा कांहीं अंशीं कमी होतो व त्या एकदम तडकत नाहींत. चिमण्याचे वर जे ग्लोब घालतात, त्यांची देखील व्यवस्था वरील प्रमाणेंच करावी.





# भाग अठ्ठाविसावा.

## हरकामे आणि दिवे.



हरकाम्यानें दिव्यांची व्यवस्था खालील नियमाप्रमाणें केली पाहिजे.

(१) समया, पणत्या, कंदील वगैरे देशी दिव्यांतील तेल रोजचे रोज काढून, तीं रोज नियमानें साफ केलींच पाहिजेत. तेलकट समयांतून ताजें शेण भरून ठेवावें व दोन तास त्या तशाच ठेऊन, त्यांतील शेण काढून टाकावें; व विटकरीच्या कोरड्या चुन्यानें त्या घांसाव्या, व फिरून त्यांत तेलवात घालून, त्या तयार करून ठेवाव्या.

( २ ) राकेलच्या चिमण्या रोज पुसल्याच पाहिजेत. त्या कशा पुसाव्या हें देखील कित्येक हरकाम्यांना माहीत नसतें. एका काठीला एक चिंधी गुंडाळून, ती वेडी वांकडी चिमणींत ढवळल्यानें चिमणी साफ कधींहि निघत नाहीं. कोणी कोणी तर काठीचें काम बोटानेंच उरकून घेतात. पण त्या मुळें जेथपर्यंत बोट पुरतें तेथपर्यंतचा मळ निघून त्यावरची जागा मळीण असते, ती तशीच राहते. या साठीं चिमण्या स्वच्छ करावयाच्या असतील तर एका पातेल्यांत अगर बालदींत ऊन पाणी घालून त्यांत थोडा स्टारसोप मिसळावा व त्या

फेंसाळलेल्या पाण्यांत चिमण्या १५ मिनीटें बुडवून ठेवाव्या. ह्मणजे साबणाच्या योगानें त्यांतील सर्व मळ उमलून निघेल व मग काठीला फडकें गुंडाळून, अगर चिमण्या पुसण्याच्या ब्रशनें, त्या पुसाव्या. तितक्यांतूनहि कांहीं घाण राहिली तर बारीक रांगोळी अगर कागजावर घालण्याची वाळू चिमणींत घालून तिचीं दोन्हीं तोंडें हातांनीं दाबून धरावी व खूप हलवावी म्हणजे सर्व मळ निघून जाईल. हें केल्यावर, ती कोरड्या फडक्यानें नीट पुसून घ्यावी. तीवर जर पाण्याचा अंश राहिला तर ती एकदम तडकण्याची भीति असते.

( ३ ) दिव्यांची वात, वातींच्या घरांत अगदीं बरोबर बसती होईल अशीच असली पाहिजे. ती जर थोडी घट्ट असेल तर वर खालीं चढणार उतरणार नाहीं व जर त्या घरापेक्षां लहान असेल तर तिच्या आजुबाजूला फटी राहून, त्यांतून हवेचा प्रवाह सुरू राहील व ज्योत वारंवार फडफडूं लागेल. यासाठीं वात त्या नळीच्या अगदीं बेताचीच असली पाहिजे.

( ४ ) कांहीं वेळ दिवा जळला ह्मणजे वातीच्या तोंडाशीं कापडाच्या राखेसारखा थर उत्पन्न होत असतो. तो एका फडक्यानें साफ काढून टाकला पाहिजे, किंवा वाती कातरण्याच्या कातरीनें छाटून टाकिला पाहिजे.

( ५ ) वातीच्या तोंडाकडच्या दोन्ही कडा एक सारख्या कातरल्या पाहिजेत, नाहींतर वातीपासून धूर उत्पन्न होतो.

( ६ ) दिवे धुऊन पुसून स्वच्छ करण्याचें काम, दिवस आहे तेव्हांच करावें, संध्याकाळीं करूं नये.

( ७ ) दिव्याच्या बैठकीवर तेल सांडलें असेल तर तें फडक्यानें पुसून घेतलें पाहिजे. नाहींतर तें तसेंच राहून, उष्णतेच्या योगानें

तें उडून जातें व त्याची घाण दिवा ज्या खोलींत ठेविला असतो, त्या ठिकाणीं सुटत असते, हें एक व कधीं कधीं त्या तेलाला पेट-लेली काडी लागून त्या तेलाचा एकदम भडका उडतो व त्यामुळें केव्हां केव्हां मोठे अपघात होतात. यासाठीं तसें पडलेलें तेल फडक्यानें स्वच्छ पुसून घ्यावें ह्मणजे यांपैकीं कोणतीच भीती राह-वयाची नाहीं.

( ८ ) दिव्यांत तेल रोजच्या रोज घातलें पाहिजे. तेल न भरतां जर दिव्याचा भाग कांहीं रिकामा राहिला तर तेवढ्या भागांत हवा भरते व तिच्या प्रवाहामुळें दिव्याची ज्योत संथपणें जळत नाहीं या साठीं दिव्यांत तेल नेहमीं भरलेलें असावें.

( ९ ) दिव्याची वात पेटविल्याबरोबर ती वातीच्या घराच्या तोंडा बरोबर आंत सरकवावी व मग दिव्यावर चिमणी किंवा ग्लोब बसवावा. चिमणी बसविल्यावर वात हळू हळू वर सरकवावी, एकदम सरकावूं नये. कारण चिमणी थंड असते. ती एकदम तापतां उपयोगी नाहीं. एकदम तापली तर, ती उष्णतेनें तडकून, फुटून जाते.

( १० ) आठवड्यांतून एकवार तरी दिव्यांतून सर्व तेल काढून दिवे मोकळे केलेच पाहिजेत. दिव्यांतील काढलेलें तेल हिरवट रंगाचें असतें व त्याला घाणही एरवींच्या तेलापेक्षां जास्त येते. अशा रीतीनें तेल काढून घेतल्यावर, दिव्यांत ऊन पाणी घालावें आणि थोडी पापडखाराची पूड त्यांत टाकून, दिवा खूप हलवावा, ह्मणजे तो स्वच्छ निघतो. मग फिरून त्यांत तेल भरावें.

घरच्या मालकानें ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, राकेलचे दिवे जे घ्यावयाचे, त्यांचा खालचा भाग होतां होईल तों कांचेचा असूं नये; कारण कांचेची बैठक हलकी असते; व दिव्याला जरी थोडासा धक्का लागला तरी दिवा खालीं पडण्याची भीति असते.

बैठक पत्र्याची किंवा मातीची वगैरे जड असल्यानें ही भीति राहत नाहीं. "सेफ्टी ल्यॅंप" ह्मणून एक प्रकारचे दिवे असतात, त्यांत राकेलच जाळतात पण त्यांच्या रचनेंत अशी कांहीं खुबी योजिलेली असते कीं तो दिवा उपडा झाल्याबरोबर किंवा खालीं लवंडल्याबरोबर आंतील ज्योत आपोआप विझते. यामुळें अपघात होण्याचें मुळींच भय नसतें. या दिव्यांना आतां किंमतहि इतर दिव्यांइतकीच पडते. तेव्हां तसले दिवे ध्यावे हें उत्तम आहे.



इतकीही खबरदारी घेऊन जर एखादे वेळीं राकेलचा दिवा भडकला व फुटून तेल चोंहोंकडे पसरलें व आगीचा लोळ सुरू झाला तर त्यावर पाणी कधींहि घालूं नये. पाणी जरी घातलें तरी तेल पाण्यावर तरंगूं लागतें व पेटण्याचें बंद होत नाहीं. या खेरीज पाण्यांतील प्राणवायू देखील उष्णतेनें पृथक्करण पावून त्या ज्वाळांनां भडकण्याला मदतच करतो. या साठीं अशा प्रकारची आग लागली तर तीवर तावडतोब एखादें कांबळें, पासोडी, दुलई, वैगरे जाडसा कपडा टाकावा, ह्मणजे बाहेरची हवा आगीला पोंचण्याची बंद होऊन

ती आग आपोआप विझते. रॉकेलमध्यें दाहक असा जो मुख्य पदार्थ आहे तो प्रवाही असून, इतका हलका आहे कीं, तो इतर तेलावर देखील तरंगतो. बुडाशीं कधीं जात नाहीं, म्हणून त्यानें पेट घेतल्यावर आग विझविण्याला हवेचा प्रवाह बंद करण्यापलीकडे दुसरें साधनच नाहीं. माती, वाळु किंवा चुन्याची भुकटी ही जरी वर टाकिली तरी आग विझून जाईल. अशा रीतीनें रॉकेलनें पेट घेतल्याबरोबर आधीं खिडक्या आणि दरवाजे बंद करून हवेचा प्रवाह बंद केला पाहिजे. नाहीं तर त्यांतून येणाऱ्या हवेची मदत आगीला होते.

कित्येक लोकांची अशी समजूत असते कीं, राकेलच्या दिव्यामुळें डोळ्यांस फार त्रास होतो. पण ही समजूत चुकीची असून तिला कांहीं आधार दिसत नाहीं. मंद प्रकाशानें डोळ्यांना त्रास होण्याचा संभव आहे. तसाच फार प्रखर प्रकाशानेंहि त्रास होतो हें खरें आहे. पण तितका प्रखर प्रकाश करूं नये व त्यांतहि हिरव्या अगर निळ्या कागदाच्या किंवा काचेच्या शेड्स दिव्यावर घातल्यानें डोळ्यांस त्रास होण्याची मुळींच भीति रहात नाहीं.





# भाग एकोणतिसावा.

## मेणबत्तीचा दिवा.



मेणबत्तीचा दिवा. हरकाम्यानें हे दिवे रोज घांसले पाहिजेत. घांसण्याच्या पूर्वी दिव्याच्या स्टँडवर जे मेणाचे डाग पडले असतील ते खरडून काढून तेवढाच भाग प्रथम बारीक राखेनें किंवा खुजाच्या मातीनें चोळावा; नंतर त्याच मातीनें सबंद चोळावा व अखेर एखाद्या मऊ फडक्यानें तो घांसावा; ह्मणजे खूप जिल्हई चढते; अशा प्रकारच्या दिव्यांत जेवढें ह्मणून पितळी अगर धातूचें सामान असेल, त्या विषयीं हाच नियम लक्षांत ठेविला पाहिजे. या दिव्यांना "स्प्रिंज" असतात. त्या रोजच्या रोज बाहेर काढून त्यांत चिकटलेलें मेण काढून टाकून, त्या देखील ब्रशनें साफ केल्या पाहिजेत. चांगल्या मेणबत्त्या वापरल्या तर, तासाला अर्धा आणा प्रमाणें प्रत्येक दिव्याला खर्च येतो. बाजारांत ज्या मेणबत्त्या मिळतात त्यांपैकीं ज्या पुड्यावर नारळाच्या झाडाचा छाप असतो, त्या मेणबत्त्या सध्याच्या मानानें उत्तम ठरलेल्या आहेत.

**धुराचे दिवे.** दिव्यांसाठीं जो धूर किंवा ग्यास तयार करितात तो मुख्यत्वें दगडीकोळशांपासून करितात. रॉकेल, मेणबत्त्या, किंवा

11

इतर तेलांच्या दिव्यांपेक्षां, धुराच्या दिव्यांचा प्रकाश जास्त असतो, खर्चहि तितकाच येतो खरा, पण धुराच्या दिव्यापासून इतर बरेच तोटे आहेत, या साठीं तो घरांत वापरण्याची सोय नाहीं. त्यांपैकीं कांहीं तोटे खालीं लिहिले आहेत:–

(१) धुराच्या दिव्यापासून जो पुष्कळ प्रकाश उत्पन्न होतो, तितक्या प्रकाशाची रहात्या घरांत गरज नसते.

(२) धुराच्या दिव्यापासून इतर दिव्यांप्रमाणें कारबानिक असिड आणि वाफ हीं उत्पन्न होतातच; पण त्यां खेरीज आणखी 'सल्फरस असीड' नांवाचा एक पदार्थहि सर्व ठिकाणीं पसरला जातो; तो शरीर प्रकृतीला चांगला नाहीं.

(३) त्यामुळें खोलींतील तसबीरी, पुस्तकें आणि झाडांच्या कुंड्या वगैरे असतील, त्यांना इजा पोंचते व तीं फार खराब होऊन जातात.

(४) इतर दिव्यांप्रमाणें रात्रीं निजण्याच्या वेळीं तो दिवा बारीक करून निजण्याची मुळींच सोय नाहीं, कारण नळींतून जेवढा सगळा ग्यास बाहेर पडतो, तो बारीक ज्योतीच्या योगानें जळला जात नाहीं व तो तसाच कच्चा बाहेर पडून, सर्व खोलीभर पसरतो. व निजणाऱ्या मनुष्यांच्या कोठ्यांत श्वासोश्वासाच्या मार्गानें जातो.

(५) कधीं कधीं असें होतें कीं, वाऱ्याच्या प्रवाहानें, तो मिण-मिण जळत असलेला दिवा विझून जातो व नळीचें तोंड मोकळेंच राहिल्यामुळें, कच्चा धूर मात्र बाहेर पडत रहातो. या योगानें निजलेल्या मनुष्यांच्या पोटांत, हा विषारी वायु त्यांना न कळत जाऊन बसतो व त्यांच्या प्रकृतीवर त्याचा वाईट परिणाम अचुक रीतीनें होतो. इतके तोटे धुराचे दिवे घरांत वापरल्यामुळें होतात. हे दिवे नाटकगृहें, व्याख्यानगृहें, रात्रीच्या शाळा व इतर सार्वजनिक

ठिकाणीं लावणें, जास्त सोईवार व कमी खर्चाचें आहे व त्या ठिकाणीं पाहिजे असल्यास, त्यांचा उपयोग करावा. पण अशा ठिकाणीं देखील या दिव्यांपासून जे दूषित वायु उत्पन्न होतात, ते घराच्या बाहेर घालविण्यासाठीं या दिव्यांसाठीं स्वतंत्र धुरांडीं तयार केलेलीं असलीं पाहिजेत. एरवीं तो वायु तेथील लोकांच्या प्रकृतीस विघातक होईल. इतकेंहि असून, कोणी धुराचे दिवे रहात्या घरांत घेतलेच असल्यास, हरकाम्यानें त्यांची व्यवस्था खालीं लिहिल्याप्रमाणें ठेवावी. प्रत्येक रात्रीं निजावयास जाण्याचे पूर्वी ग्यासचा दिव्याजवळचा कॉक, घट्ट बंद करावा व नंतर मग "ग्यास मिटर" बंद करावा. ग्यासची नळी घरांतून गेलेली असेल, ती रोज दिवसाउजेडीं तपासून, तिला कोठें चीर वगैरे पडली आहे कीं काय, तें पहावें व ती लगेच गिलथानें बंद करून टाकावी.

**विजेचे दिवे.** अद्याप आपल्या देशांत, राहत्या घरांत विजेचे दिवे वापरण्याचा प्रघात पडला नाहीं व त्या दिव्यांचा उपयोग घरामध्यें करतां येण्याजोग्या सुधारणा त्यांत होण्यास आणखी बराच अवधी आहे. निदान ती गोष्ट या पिढीला तरी शक्य दिसत नाहीं; या साठीं त्या दिव्यांविषयीं विचार करण्याचें कारणच नाहीं.





# भाग तिसावा.



## रोषनाई व बिछाने.



रोषनाई व बिछाने घालणें-सूर्यास्त होऊन, घरांत अंधार पडण्याला लागण्याचे पूर्वींच, दिवे लावण्याचें काम केलें पाहिजे. उघडे दिवे घरांत ठेवण्यापासून पुष्कळ वेळां अनर्थ झालेले, आपण पाहतों. आपल्या समया, पणत्या, दिवल्या वगैरेंतील दिवे, वाऱ्याच्या लहानशा झुळकी बरोबर विझून जातात; पतंग अगर दुसरी पांखरें, त्यांवर झडप घालून, दिवे विझवितात; व कधीं कधीं त्यां पैकीं पुष्कळ मरून, तेलांत पडतात व पुष्कळ तेल खराब होतें. जळती वात उंदीर केव्हां केव्हां भलत्याच ठिकाणीं नेऊन टाकितो, व त्यामुळें घरांना आग लागून नुकसान होतें. अशीं उदाहरणें पुष्कळ वेळ घडून आलेलीं आहेत. सारांश, दिवे उघडे ठेवणें चांगलें नाहीं. कांचेचे कंदील करून, त्यांच्या आंत समया ठेवणें, चांगलें आहे. रॉकआईलचे उघडे दिवे फारच वाईट. एक तर त्यांच्या पासून जो धूर उत्पन्न होतो, तो नाका तोंडांतून कोठ्यांत उतरतो, व त्यामुळें कोठ्यांच्या आंत देखील कीट सांठतें. त्या दिव्यांच्या प्रकाशांत बसल्याच्या योगानें " काळा कफ, " उत्पन्न होतो, असेंहि पुष्कळांच्या अनुभवास आलें आहे. असे दिवे ज्या ठिकाणीं लावि-

तात, त्या ठिकाणचीं छपरें, कडीपाट, व भिंती किती काळ्या झालेल्या असतात, हें आपण पाहतोंच. या दिव्यांत सोय म्हटली म्हणजे थोडें तेल लागतें व त्या मुळें खर्च कमी येतो, ही होय. पण या सोयीपेक्षां नुकसान किती आहे, याचा विचार केला तर नुकसानाचें पारडें बरेंच खालीं बसेल, असें म्हणावें लागतें. या साठीं होतां होईल तों असे दिवे लावूं नयेत, हें उत्तम.

चिमणीचे दिवे लावितांना प्रथम वरची चिमणी काढून वात वर करावी व ती पेटविल्यावर एकदम वातीच्या घराचें जें तोंड असतें त्या बरोबर ती खालीं नेऊन, जोत अगदीं मंद ठेवावी व मग चिमणी बसवावी. नंतर वात हळू हळू वर करून, बेताचा उजेड पडे पर्यंत चढवावी व तशीच कायम ठेवावी. वात हळू हळू मोठी करण्याचें कारण असें कीं, एकदम चिमणीला उष्णता लागून चिमणी तडकूं नये. प्रत्येक ठिकाणीं दिव्यासाठीं म्हणून स्वतंत्र जागा असली पाहिजे. व हातांत घेऊन फिरविण्याचे दिवे निराळे असले पाहिजेत. भिंतीला बसविण्याचे दिवे, टांगण्याचे दिवे व जमिनीवर अगर टेबलावर ठेवण्याचे दिवे, हातांत घेऊन, इकडे तिकडे हिंडणें, फार गैरसोईचें आहे. दिवे मालविल्यावर ते नियमित ठिकाणीं नेऊन ठेविलेच पाहिजेत.

बिछाने घालणें म्हणजे मोठेंसें कसबाचें काम आहे, असें पुष्कळांस वाटत नाहीं व कित्येक गडी इतके अडाणी असतात कीं, गादीच्या खालीं सतरंजी घालावयाची कीं वर घालावयाची, हें देखील त्यांस कळत नाहीं!! उत्तम बिछाना घालणें ही गोष्ट इतर पुष्कळ गोष्टीं प्रमाणेंच फार महत्वाची आहे व तींतहि कसब आहेच.

बिछाना घालणाऱ्या नोकराचे कपडे व अंग स्वच्छ असलें पाहिजे. बिछाना घालण्याचे पूर्वी त्यांतील कपडे निदान एक तासभर तरी

उघड्या हवेवर वाळत टाकिले पाहिजेत, हें सांगितलेंच आहे. जमिनीवरच जर आंथरूण घालावयाचें असेल, तर जमीन झाडून तीवर जाजम वगैरे आधीं हंतरावें; मग त्यावर सतरंजी हंतरून, वर गादी घालावी. नुसत्या सतरंजीचें हंतरूण जमिनीवर केव्हांहि घालूं नये. हंतरूण चांगलें घातलें आहे कीं नाहीं, हें समजण्याची मुख्य खूण म्हणजे त्याला सुरकुत्या पडलेल्या नसल्या पाहिजेत. पलंगपोस निदान एक दिवसआड तरी बदललाच पाहिजे. सुरकुत्या न पडण्याला तजवीज अशी केली पाहिजे कीं, पलंगपोस पायथ्या कडच्या अंगानें गादीच्या खालीं सारखा दुमडून, तो तसाच उशाचे बाजूला ताणावा व उभी सुरकुती पडणार नाहीं अशा बेतानें उशाच्या खालीं दुमडून टाकावा. मग तशाच रीतीनें बाजूहि प्रथम एक व मग दुसरी अशी दुमडावी. उशा गादीवर ठेवणें चांगलें. गादीच्या खालीं उशा घालणें चांगलें नाहीं. कारण रात्रीं झोपेंत जसजशी मान वळेल तसतशी उशी किंवा गिरदी वळत राहणें, हें जास्त सुखकर असतें. उशी गादीच्या खालीं घातल्यामुळें डोक्याचा मळ पलंगपोसाला लागून, तो एकेच ठिकाणीं फार मळकट होतो. तसा प्रकार उशी गादीच्या वर ठेविल्यानें होणार नाहीं. उशा, गिरद्या वगैरे साधनें झोपेंत ज्या ठिकाणीं शरीराचा भाग अवघडेल, त्या ठिकाणीं घेण्यासाटीं असतात. तेव्हां त्या हंतरुणाच्या खालीं न घालतां वरच मोकळ्या असाव्या हें इष्ट आहे. पांघरूण टेवणें तें अशा बेतानें ठेवावें कीं, त्याच्या कडा बिछान्याच्या चारी बाजूस सारख्या मोकळ्या राहतील व पांघरूण जर नकशीचें वगैरे केलें असलें तर, त्यावरील फुलें, रेघा, किंवा इतर नक्षी, पाहणाऱ्याला प्रमाणांत दिसेल, अशा बेतानें तें घालून ठेवलें पाहिजे. पांघरुणाच्या निऱ्या करून तें पायथ्याशीं गोळा करून ठेवणें चांगलें नाहीं; तें हंतरुणावर पसरून ठेवावें हें बरें; कारण हंतरुणावर केरकचरा पडला तरी, तो पांघरुणामुळें

वरचेवर राहून इंतरुण घाण होत नाहीं. ब्लँकेट्, रजई, दुलई वगैरे पांघरुणांवर मध्य भागीं कांहीं तरी फल अगर मोठीशी नक्षी काढलेली असते. तीहि इंतरुणाच्या मध्य भागींच येईल, अशा बेतानें तें इंतरुणावर घालून ठेवावें. ब्लँकेटाला जोड अगर पासोडी जोडणें असेल तर, पासोडीचा कांठ ब्लँकेटच्या कांठापेक्षां जास्त वर घेऊन जोडावा. म्हणजे ब्लँकेटाचा खरखरीत भाग निजणाऱ्याच्या आंगाला लागत नाहीं. माचा, पलंग, किंवा चौपाई यावरील इंतरुण घालणें, तें देखिल वरील नियमानींच घातलें पाहिजे. पण पलंग किंवा माचा, आठवड्यांतून निदान एक वेळ तरी अगदीं मोकळा करून, स्वच्छ झाडलाच पाहिजे. छप्पर पलंगाला पडदे नसणें, हें आरोग्य शास्त्राच्या नियमांप्रमाणें उत्तम आहे. पण डांस चिलटें, मुरकुटें, वगैरेंचा उपद्रव होऊं नये, म्हणून, मच्छरदान घातल्याखेरीज चालत नसेलच तर, बिछाना घालतांना मच्छरदानाचे पडदे दोन्ही बाजूस गोळा करून घेऊन, उशीकडच्या बाजूला व पायथ्याकडच्या बाजूला खोंचून ठेवून, पलंगाचें तोंड सुरेख दिसेल, अशा रीतीनें व्यवस्था ठेवणें, हे देखील चांगल्या घरकाम्याचें कर्तव्यच आहे.





# भाग एकतीसावा.

## स्वयंपाक घरांतील नोकर.



आचारी, शागीर्द आणि स्वयंपाकाच्या बाया- घरांत नोकर असणें किंवा नसणें हें ज्याच्या त्याच्या अनुकूलतेवर अवलंबून असतें, ज्याला अनुकूल आहे, तो प्रत्येक प्रकारच्या कामाला निरनिराळे नोकर ठेवितो मध्यम स्थितींतला मनुष्य एकाच नोकरावर सर्व कामें भागवितो; व ज्यांची स्थिति अगदींच गरीबीची असते, ते नोकर मुळींच ठेवीत नाहींत. अशीं माणसें आपलीं कामें आपणच करीत असतात. या तिन्ही प्रकारच्या लोकांनीं मागील भागांतील व या भागांतील सूचना लक्षांत ठेवणें, अवश्यक आहे.

**आचारी**-आपल्या लोकांत आचाऱ्यांचा धंदा करणाऱ्या लोकांचा निराळा वर्ग नाहीं. जातीचा ब्राम्हण असून, इतर कोणताहि धंदा ज्याला साधत नाहीं, त्यानें स्वयंपाक्याचें काम करावयाचें असा प्रघात सर्वत्र नजरेस पडतो. पिढीजादा सुतार मिळतो, पिढीजादा वैद्य मिळतो, पिढीजादा न्हावी मिळतो; पण पिढीजादा आचारी मात्र मिळत नाहीं. आचाऱ्याचा धंदा करणारे, जर पिढीजादा लोक असतील, तर ऐपतवान् लोकांच्या प्रापंचिक सुखांत किती तरी

भर पडेल! पण सध्याची आपली स्थिति या संबंधानें किती तरी वाईट आहे? गांवांतले टोळभैरव, निरुपयोगी व आळसाचे पुतळे आणि सर्व व्यसनांचें माहेरघर बनलेले, कोणी तरी पुरुष सभ्य लोकांच्या घरांत स्वयंपाकाच्या कामगिरीवर नेमण्याचा प्रसंग येतो. व त्यामुळें घरांत सुखाच्या ऐवजीं दुःखाचा त्रास जास्त होतो. चोरीचें भय, आचारी केव्हां काय बोलेल, याची घरच्या मालकिणीस काळजी आणि पैसा खर्चून सवरून, पोटांत दोन सुग्रास पडण्याची सुद्धां मारामार, अशी स्थिति आपणांतील कांहीं लोक अनुभवीत आहेत; या सर्व गैरसोईचें कारण आचाऱ्यांच्या धंद्याला मान्यता देण्याची आपल्या लोकांत वहिवाट नाहीं, हें एक व दुसरें असें कीं, त्या लोकांना कोणत्याहि प्रकारचें शिक्षण नसतें. स्वैपाक करण्याची माहिती फारच थोडक्या आचाऱ्यांस असते; व सभ्यपणा, मनमिळाऊपणा, आणि कर्तव्यदक्षता यांचा अभाव तर त्यांचे ठिकाणीं पावलोंपावलीं नजरेस पडतो. चांगल्या स्वैपाक्याच्या आंगीं पाकनिष्पत्तींत कौशल्य, नम्रता, स्वच्छता आणि आज्ञाधारकपणा हे गुण मुख्यत्वें असलेच पाहिजेत. सूपशास्त्रांतील मुख्य तत्वें माहीत नसतांनाहि आचारी बनणारे स्वैपाकी सध्या जसे नजरेस पडतात, तसे नजरेस पडण्यास नको असतील तर, याहि लोकांस एका प्रकारचें शिक्षण देण्याची व्यवस्था सरकारानें अगर खासगी संस्थांनीं करणें जरूर आहे. सध्या अशी स्थिति होते कीं स्वैपाकाची कांहीं देखील माहिती नसतांना एखाद्याचे घरीं आचारीपणाची नोकरी पतकरून मग त्याच्या घरच्या सामानाची नासधूस करून आचारीपणा शिकणारेच स्वैपाकी बहुधा नजरेस पडतात. ही अव्यवस्था नाहींशी करण्याचा उपाय ह्मणजे चांगले आचारी आणि वाईट आचारी यांना ओळखून त्या त्या प्रमाणें सरटिफिकीट देणारी एखादी संस्था असेल तर, हें कार्य भागणारें आहे. उत्तम रुचकर अन्न हें प्रकृति चांगली राख-

ण्याचें एक मुख्य साधन आहे, व तें तयार करणारीं माणसें ह्मणजे आचारी व स्वैंपाकाच्या बाया हीं होत. हे नोकर तरबेज करण्याच्या शाळा, इतर देशांतल्या प्रमाणें आपल्या देशांत कां असूं नयेत, हें कळत नाहीं. सूपशास्त्र उत्तम शिकल्यावर तें शिकणाऱ्यानें स्वैंपाकी बनलेंच पाहिजे, असा कांहीं नियम नाहीं. पण निरुपायामुळें तसें करण्याचा प्रसंग आला तर, तो धंदा त्यांनीं उत्तम प्रकारें बजावणें, हें चांगलें आहे, यांत कांहीं शंका नाहीं. आपल्या स्वैंपाकांत मुख्य दोष ह्मणजे आचारी व स्वैंपाकाच्या बाया या केवळ उतावळेपणामुळें पदार्थ शिजवितांना, मला मोठा जाळ लावून, प्रत्येक पदार्थ लवकर शिजावा, असा प्रयत्न करतात, तो होय. अशा घाई घाईनें शिजविलेले पदार्थ अर्थातच बेचव असावयाचे, त्यांस चव आणण्यासाठीं मसाले वगैरे पुष्कळ घालून, ते रुचकर लागतील, असें करण्याची त्यांस संवयच लागून गेलेली असते. या योगानें दोन मोठे दोष घडतात. एक तर पदार्थांतील स्वाभाविक रस पक्क न होतां, ते अपक्क स्थितींत राहून, त्यांची स्वाभाविक रुची नाहींशी होते व मसाले वगैरे पुष्कळ घातल्याच्या योगानें, पचनक्रियेस बराच अडथळा येतो. या साठीं मंदाग्नीवर प्रत्येक पदार्थ सावकाश शिजूं देणें, हेंच स्वैंपाकाचें पूर्ण रहस्य आहे, असें ह्मणावें लागतें. हा एक नियम पाळल्यानें स्वैंपाकाचें निम्मे काम होतें. वाढण्याचा धंदाहि कुशलतेनें करण्याजोगा आहे. खाण्याच्या पदार्थांत हात न घालतां चमचे, पळ्या, डवले, वगैरेंचा उपयोग वाढणाऱ्यांनीं अवश्य करावा. पदार्थांचे थेंब जमीनीवर अगर ताटांत किंवा पानांत न पडतां पदार्थ एकच ठिकाणीं वाढला जावा, अशी खबरदारी प्रत्येक वाढप्यानें घेतलीच पाहिजे. नम्रता, सभ्यपणा आणि टापटीप हे गुण त्यांच्या आंगीं अवश्य असले पाहिजेत. एखादा पदार्थ वाढावयास नेला तर पदार्थाचें नांव घेऊन मोठ्यानें ओरडण्यापेक्षां, तो पदार्थ जेवणाराचे

नजरेस पडेल, अशा रीतीनें त्याच्या पुढें करून, त्याच्या म्हणण्याप्रमाणें करणें हें चांगलें. वाढण्याचीं भांडीं अति स्वच्छ असावीं व त्यावरून ओघळ आलेले नसावे. आचारी व वाढपे यांच्या पोषाखाविषयीं विचार केला तर वाढप्याचा पोषाख अगदीं स्वच्छ व नीट नेटका असणें जरूर आहे. आपले आचारी व वाढपे अंगांत कपडे घालून वाढीत नाहींत हें खरें, पण नुसता पंचा कां असेना, तो गुडघ्याच्या खाल पर्यंत पुरेल असा व स्वच्छ असावा. खांद्यावरील फडकेंहि स्वच्छ असावें. ज्याच्या अंगाला थोड्याशा श्रमानें घाम येतो, त्यानें तो वारंवार पुसून शरीर स्वच्छ ठेविलें पाहिजे. या गोष्टी शिकण्याला शाळांची गरज आहेच असें नाहीं. सुव्यवस्थित घरांतून या गोष्टी आपल्या नेहमींच दृष्टीस पडतात व मुलांना आणि मुलींना जें गृहशिक्षण मिळतें, त्यावर या गोष्टी पुष्कळ अवलंबून असतात.





# भाग बत्तीसावा.

## विशेष प्रसंग.



सण, मेजवान्या, पाहुणचार आणि धर्म कृत्यें— आपल्या लोकांस आपल्या सणांचें महात्म्य कमी कमी वाटूं लागलें आहे, हें चांगलें लक्षण नव्हे. घरांतील सुशिक्षित पुरुष दसऱ्याच्या दिवशीं घराच्या बाहेर न जातां, घरांतच एकलकोंडा बसलेला दृष्टीस पडतो व त्या सणाविषयीं तिरस्कार बुद्धि दर्शवितो, यांत त्याचा हेतु काय असतो, तें कळत नाहीं. प्रत्येक राष्ट्रांतील सण सर्वच उत्तम तत्वांवर सुरू झालेले असतात, असा नियम नाहीं. कित्येक अती उत्तम उद्देशानें सुरू केलेले असतात; पण कालांतरानें त्यांतील उत्तम तत्वें नाहींशीं होऊन, फक्त आचार व प्रचार यांचें मात्र प्राबल्य शिल्लक राहिलेलें असतें. अमुक रूढी कां पडली, याचें कारण शोधून काढून त्या प्रमाणें वागणें निराळें, व ज्यांत आपलें कांहीं नफा नुकसान नाहीं, अशा रीतीनें सर्व राष्ट्रानें मानलेल्या सणांच्या दिवशीं वर्तन ठेवणें निराळें. आपले सण, आपले उत्साह व आपल्या इतर संस्था यां विषयीं जे नियम असतील त्यांप्रमाणें वर्तन ठेवणें हें स्वदेशाभिमानाचें एक खरें लक्षण आहे. विलायत, अमेरिका वगैरे देश, ज्यांतील लोकांचें आपण मोठ्या आनंदानें अनुकरण करितों, त्यांचें वर्तन त्यांच्या सणांविषयीं कसें असतें व आपलें कसें असतें, याचा

विचार केला तर, आपण आपल्या सणांविषयीं अगदीं उदासीन असतों, असें दिसून आल्याखेरीज राहणार नाहीं. असलें औदासीन्य स्वदेशाभिमानशून्यतेचें एक लक्षण आहे. हा दोष ज्या व्यक्तींमध्यें असेल, त्यांनीं तो टाकून दिला पाहिजे. बीभत्स सणांपासून दूर राहणें, हें प्रत्येक व्यक्तीचें कर्तव्य आहे. तसेंच बीभत्स नाहींत, अशा सणांच्या दिवशीं अवश्यक विधि आनंदानें करून, दिवस साजरा करणें हेंहि प्रत्येकाचें कर्तव्यच आहे. आपलें राष्ट्रत्व कायम राखण्यासाठीं इतर देशांतील लोक किती जपतात, तें पाहून आपल्या लोकांनीं सावध व्हावें. दसरा, दिवाळी, संक्रांत, नागपंचमी, नारळीपौर्णिमा वगैरे सणांचे दिवस पाळणें व कुटुंबांतील सर्व मंडळींनीं आनंदांत दिवस घालविणें, यांत कोणतेंहि नुकसान नाहीं, असें असतांहि आमचे सुशिक्षीत लोक त्या सणांची अवहेलना करितात व आमच्या स्त्री वर्गांतील " देवभोळेपणा "चा जर समूळ नाश झाला असता तर हे सण खरोखर आज मितीला नामशेष झाले असते ! ! सारांश ही उदासीन वृत्ति टाकावी, येवढीच पुरुषवर्गास आमची सूचना आहे.

**मेजवान्या** करण्याचे प्रसंग ज्या कुटुंबांत वारंवार येतात, त्यांनीं त्या प्रसंगास साजेल, अशी व्यवस्था व टापटीप राहील, अशी तर्तूद करून ठेविली पाहिजे. स्वच्छता, नीटनेटकेपणा, शांतता आणि उल्हास ह्या मुख्य गोष्टी जिच्या योगानें साधतील, ती व्यवस्था करावी व ज्यांना मेजवानी करावयाची आहे, त्यांचें मन सुप्रसन्न राहील, अशी तजवीज शक्य असेल ती करीत जावी. परका मनुष्य जेवावयास आला असतां, त्याला पुष्कळ आग्रह करून वाढावयाचें व भिडेनें खावयास लावायाचें, ही रीत वाईट आहे.

**पाहुणचार**—पाहुणचार करण्याचे प्रसंग वारंवार यावेत, असें बऱ्या गृहिणीस मनापासून वाटत असतें. पाहुण्यांची व्यवस्था

उत्तम रहावी म्हणून ती मनापासून झटत असते. पाहुणे यावयाचे असतील तेव्हां घर व त्यांतील सामान अति स्वच्छ व नीटनेटकें दिसेल अशी व्यवस्था ठेवावी. जरूर लागणाऱ्या कोणत्याहि गोष्टीची वाण घरांत पडूं नये, या साठीं कोणता जिन्नस सरला आहे, तें पाहून तो आगाऊ आणवून ठेवावा. आपणांस अनुकूल असेल त्या बेतानें पैसा खर्च करून पाहुण्यांना संतोषित ठेवणें, हें प्रत्येक गृहिणीचें व गृहस्थाचें कर्तव्य आहे. "बाप पाहुणा आला, तरी रेड्याचें दूध काढतां येत नाहीं" ही जुनी ह्मणहि ध्यानांत ठेविलीच पाहिजे. नाहींतर आया पेक्षां खर्च जास्त होऊन, पाहुणचारापासून सुखापेक्षां दुःखच जास्त होईल.

धर्मकृत्यें—मनुष्यानें धर्मकृत्यें कोणतीं करावीं व कोणतीं न करावीं या विषयीं नियम घालणें चुकीचें होणार आहे. परंतु धर्मकृत्यांत जो खर्च करावयाचा तो आयापेक्षां जास्त करूं नये, हा नियम मात्र सर्वत्रांनीं अवश्य पाळलाच पाहिजे. आपल्या लोकांत पुत्रजन्म, मुंजी, लग्नें, अंत्यविधि या कृत्यांत खर्च ऐपतीपेक्षां जास्त होतो, असें पुष्कळ लोकांचें मत आहे. तें कांहीं कांहीं उदाहरणांत खरें आहे. दरमहा ७ रुपये पगार मिळविणारा कारकून किंवा शिक्षक मुलीच्या लग्नाला २०० पासून १५०० रुपये पर्यंत खर्च करितो, ही गोष्ट खरोखरच मोठ्या आश्चर्याची आहे. मृता संबंधानेंहि याच दर्जाचे लोक बराच जास्त खर्च करितात, हेंहि बरें नव्हे. धर्म करण्याचें प्रमाण आपल्या अनुकूलतेवर अवलंबून ठेवावें. आपणांस इतरलोक हांसतील ह्मणून किंवा गरीब म्हणतील म्हणून आपण आयापेक्षां जास्त खर्च करूं नये. आपणांपेक्षां गरीबांवर दया करावी, त्यांना मदत करावी, वगैरे तत्वें उदात्त आहेत खरीं, पण त्यांचें अवलंबन अविचारानें मात्र कधींहि करूं नये. साधारणपणें

अनुभवी लोकांस विचारतां ते असें सांगतात कीं, प्रपंच्यांतील आपल्या गरजा चांगल्या प्रकारें भागून, १०० रुपये दरमहा ज्याची प्राप्ती आहे, त्यानें महिना दीड रुपया दान धर्माकडे खर्च केला असतां कांहीं हरकत नाहीं. आदा व खर्च यांचें प्रमाण कसें असावें, याचा विचार पुढें केलेला आहेच. त्यांतील एखादी खर्चाची बाब कमी करून, तो खर्च धर्मकृत्याकडे करणें किंवा न करणें, हें प्रत्येक व्यक्तीच्या मर्जीवर अवलंबून आहे; पण साधारणपणें इतर प्रसंगीं वरील प्रमाण मोडूं नये, हें उत्तम.

अतीथि, अभ्यागत, भिक्षुक, गोंधळी, जोशी वगैरे पिढीजाद भिक्षेकऱ्यांना दान धर्म करण्यांत, जो पैसा आपल्या देशांत खर्च होतो, त्या संबधानें दोन शब्द लिहिणें जरूर दिसतें. धर्माचें तत्व असें आहे कीं, अशक्त, पंगु, लुले, रोगग्रस्त, आंधळे वगैरे लोकांना काम करून पोटाला कमाविण्याची शक्ति नसते, म्हणून त्यांच्या वर निरूपायानें भिक्षा मागण्याचा प्रसंग आला असतो; अशा लोकांस धर्म करणें सयुक्तिक आहे. ज्यांना स्वकष्टानें पोटा पुरती भाकरी मिळवितां येईल, अशा लोकांना धर्म करणें अप्रशस्त आहे. अशा प्रकारचा धर्म आपण आजवर करीत आलों, यामुळें देशांत आळस जास्त वाढत जाऊन, रिकामटेंकड्यांची संख्याहि दिवसानुदिवस वाढत्या प्रमाणावर होत आहे. या साठीं दानधर्म करते वेळीं सत्पात्रीं दान होत आहे, कीं नाहीं, तें पाहून धर्म करावा. जात, धर्म, विद्वत्ता गरिबी किंवा भिक्षा मागण्याचा वंशपरंपरा हक्क, या गोष्टींचें महत्व धर्म करितांना लक्षांत घेण्याचें कारण नाहीं. ईश्वरी क्षोभ, शरीरव्यंग, आकस्मिक दैन्यावस्था व केलेला धर्म केवळ शरीर-पोषणाकडेसच खर्च होईल अशी खात्री, या गोष्टी मुख्यत्वें लक्षांत आणून आपल्या शक्तीप्रमाणें धर्म करावा. आपल्या लोकांतील मध्यम

रूढ असलेली जी धर्मपद्धति आहे, तीमुळें कांहीं लोकांचें व्यक्तिशः कल्याण होतें, ही गोष्ट जरी खरी आहे, तरी सार्वजनिक दृष्टीनें या पद्धतीपासून कल्याण होत नाहीं, हेंच खरें. थोड्या पैशानें पुष्कळ लोकांचें निरंतर कल्याण व्हावें, अशी धर्मपद्धति सुधारलेल्या राष्ट्रांतील लोकांत दृष्टोत्पत्तीस येते. तशी आपल्या लोकांत दिसून येत नाहीं. धर्मशाळा बांधणें, वाटसरूंना उन्हाचा त्रास होऊं नये, म्हणून सडकेच्या दोहों बाजूस झाडें लावून ठेवणें, विहिरी खणणें, धर्मार्थ दवाखाने घालणें, गरीब मुलांना शिक्षण देण्याची व्यवस्था करणें, अनाथगृहें सुरू करणें, दुष्काळ पीडितांस अन्नदान करणें, हीं कृत्यें खरोखर चिरकाळ पुण्याचीं साधनें आहेत. धट्टा कट्टा मनुष्य असून केवळ आळसामुळें भिक्षा मागणारा असला, तर त्याला भिक्षा न घालण्यांत यत्किंचित् देखील पाप नाहीं.





# भाग तेहतिसावा.

## आदा आणि खर्च.



आदा आणि खर्च—प्रपंचांत खरें सुख पैशाशिवाय मिळणें शक्य नाहीं. पण नुसता पुष्कळ पैसा असला, म्हणजे सुख होईल, अशी आशा करणेंहि व्यर्थच आहे. पैसा थोडा असूनहि, त्याची जर उत्तम व्यवस्था केली, तर त्यांत जें सुख मिळेल, तें पुष्कळ पैसा असूनहि त्याची नीट व्यवस्था नसली तर होणार नाहीं. कृपण मनुष्या जवळ पैशाचीं पोतीं जरी भरलेलीं असलीं, तरी त्याला समाधान नसतें; व तो नेहमीं दुःखीच असतो. त्या प्रमाणेंच एखादा लक्षाधीश मनुष्यहि, अव्यवस्थित खर्च करणारा असला तरी तोहि सदा असंतुष्ट व दुःखीच असावयाचा. सारांश पैशाचा योग्य प्रकारें व व्यवस्थित आदा आणि खर्च, असल्या शिवाय, प्रपंचांत खरें सुख मिळणें शक्यच नाहीं. प्राप्तीच्या मानानें खर्च किती करावा, याची सविस्तर माहिती पुढें दिलीच आहे; पण मुलांना आणि मुलींना लहानपणापासून पैशाचें महत्व कळण्यासाठीं, त्यांच्या हातांत आई-बापांनीं थोडासा नियमित पैसा, दरमहाचे दरमहा देत जावा, व तो तीं कसा खर्च करितात, यावर, वडील माणसांनीं सक्त नजर ठेवावी, हा उत्तम मार्ग आहे. मुलांना दिलेल्या पैशांचा जमाखर्च, दर रविवारीं,

अगर दुसऱ्या एखाद्या नियमित दिवशीं, वडील माणसांनीं, तपासून पहावा; व त्यांतील चुका त्यांस स्पष्टपणें समजाऊन सांगाव्या. अशी संवय लहानपणापासूनच ज्या मुलांस लागलेली आहे, तीं मुलें मोठीं झाल्यावर खास अव्यवस्थित होणार नाहींत. विकूपणा हा सद्गुण नव्हे व उधळेपणा हा तर मोठा दुर्गुणच आहे. या दोन्ही गोष्टी मुलांच्या मनावर लहानपणापासून उत्तम प्रकारें ठसलेल्या असाव्या. मितव्यया सारखें सुखाचें खरें साधन नाहीं, हें तत्व मुलांच्या मनावर उत्तम ठसविलेलें असावें. मुलांच्या हातांत पैसा दिला असतां, तीं तो भलत्याच रीतीनें खर्च करून टाकितील, ही कल्पना खोटी आहे. आपल्या खर्चावर, कोणाचीहि नजर नसते, असें त्यांस कळलेलें असलें म्हणजे तीं वाईट रीतीनें पैसा खर्च करतील, पण पैशाचें पूर्ण महत्व व त्याचा जगांतील उपयोग, या गोष्टी जे आईबाप मुलांच्या मनावर उत्तम प्रकारें बिंबवून देतील, तीं मुलें पैसा वाईट प्रकारें कधींहि खर्च करणार नाहींत, हें खास, मुलांचे कपडे, त्यांचीं पुस्तकें, कागद, शाई, वगैरे गोष्टींविषयीं काळजीपूर्वक वागण्याचा उपदेश त्यांस करित गेल्यानें, त्यांस पैशाचें महत्व सहज समजूं लागेल.

प्रपंचांत जो पैसा खर्च करावा लागतो, त्या खर्चाचे तीन प्रकार आहेत. ते खालीं लिहिले आहेत.

(१) **चालू खर्च**—म्हणजे नेहमीं नियमानें करावे लागतात ते. उदाहरणार्थ—घरभाडें, म्युनसिपल बिलें, इतर कर वगैरे, अन्नखर्च, सर्पण, कपडे, मुलांचा शाळेसंबंधी खर्च, नोकर लोकांचा पगार, दिवाबत्ती व कामानिमित्त बाहेर जाण्यासाठीं लागणारा वाहनांचा खर्च वगैरे.

(२) **अचानक खर्च**, म्हणजे नित्य नियमानें लागणाऱ्या ज्या गोष्टी वर सांगितल्या, त्यांपेक्षां इतर कामासाठीं लागणारे खर्च ; म्हणजे

एकाएकी घरांतील एखादा मनुष्य अजारी पडला असतां, त्या-संबंधानें येणारा खर्च, पाहुणचारांत करावा लागणारा खर्च व एका-एकीं प्रवास करण्याचें कारण पडलें असतां, करावा लागणारा खर्च.

( ३ ) **प्रासंगिक खर्च**—ह्मणजे सण, सोहळे, मेजवान्या, नवस, श्राद्ध पक्ष, वनभोजनें वगैरे करण्यासाठीं, जे पैसे खर्च करावे लागतात ते.

या तिन्ही प्रकारच्या खर्चांची दरमहा तरतूद लावन, आपल्या ऐपती प्रमाणें हिस्सा या प्रत्यके खर्चासाठीं काढून ठेवित जावा व त्या हिशोबानें आपला खर्च आटोक्यांत ठेविला, तरच प्रपंचांत सुख आहे, नाहीं तर सुखाचा लेश देखील नाहीं. प्रपंचांत असे कांहीं प्रसंग येतात कीं, त्यावेळीं घरच्या मालकानें अगर मालकिणीनें दृढ निश्चय राखून वर्तन ठेविलें नाहीं तर, पैशांचा खर्च अव्यवस्थित होऊंच लागतो. लोकापवाद, रुढी, शेजारच्या लोकांची श्रीमंती व स्वतःच्या मनाची हौस किंवा हट्ट या मोहजालांत पडून, पुष्काळ लोक ऐपतीच्या बाहेर खर्च करून, पश्चात्ताप पावतात. सर्व खर्च व्यवस्थित रीतीनें भागले जाऊन, दरमहा कांहीं तरी शिल्लक ह्मणून राहिलीच पाहिजे. या शिलकेलाः—

**राखून ठेविलेली रोकड** असें नांव सोईसाठीं आपण देऊं. असली शिल्लक असल्या खेरीज प्रापंचिक मनुष्याचें मन निष्काळजी व स्वस्थ कधींहि राहणार नाहीं व त्याला रात्रीं सुखाची झोंप कधीं-हि लागणार नाहीं. आयुष्यक्रमांत आजार, अपघात, मृत्यु व याहि पेक्षां न समजून येणाऱ्या अडचणी शेंकडों असतात. व त्या अड-चणींच्या प्रसंगीं जवळ पैसा नसला तर त्या अडचणींचें दुःख दुप्पट वाटूं लागतें. प्राप्ति कितीहि क्षुल्लक असली, तरी हरकत नाहीं, त्या मानानें क्षुल्लकच कां होईना, पण **रोकड** शिल्लक प्रत्येक मनुष्यानें

आपल्या जवळ ठेवावी, हा फार सुखाचा मार्ग आहे. दरमहा १ रुपया शिलक पडला तरी गरीबीच्या मानानें वर्षाचे १२ बारा रुपये निदान शिलक रहातात. ही शिलक कमी आहे, असें नाहीं "थेंबें थेंबें तळें सांचे." ही म्हण इतर गोष्टी प्रमाणें याहि गोष्टीला लागू पडतेच.

कित्येक प्रापंचिकांची अशी समजूत झालेली दृष्टीस पडते कीं, घर-दार, सोनें, शेत जमिनी, प्रामिसरी नोटा व कंपनीतलि शेअर यांतच "राखून ठेविलेली शिलक" सर्व मुरलेली असली, तरी हरकत नाहीं, पण ही त्यांची समजूत चुकीची आहे, असें विचारांतीं दिसून येईल. वरील सर्व गोष्टी **पर्यायानें** पैसा आहेत खऱ्या; पण त्या प्रत्यक्ष पैसा मात्र नव्हेत. या जिनसांचा उपयोग कालावधीनें होतो, ताबड-तोब होऊं शकत नाहीं, यासाठीं "राखून ठेवण्याची शिलक" या रूपानें ठेऊं नये. त्यापेक्षां जास्त जी शिलक ठेवावयाची असेल, ती या किंवा इतर रूपानें ठेवण्यास कांहीं हरकत नाहीं. घरांत सोनें पुष्कळ आहे. पण रोकड नाहीं तर प्रसंगीं सोन्याचा तुकडा मोडून चालावयाचें नाहीं. चलनी नाण्यानें प्रसंग जितका टाळतां येईल तितका सोन्याच्या तुकड्यानें सहज टाळतां यावयाचा नाहीं. प्रसंगीं जमीन उपयोगीं पडत नाहीं. प्रामिसरी नोटांची किंमत अडाणी ठिकाणीं कवडी मोलच असते व शेअरचे कागद खरड्या पेक्षां जास्त किंमतीचे न मानणारे लोक अद्याप पुष्कळ आहेत. यासाठीं दुस-ऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याचा प्रसंग न यावा, अशी इच्छा असल्यास, प्रत्येकानें स्वशक्त्यनुसार कांहीं **रोकड** जवळ ठेवावी हें बरें.

**खर्चाची वांटणी**-प्रत्येक कुटुंबाचें सुख, कुटुंबांतील मुख्य मनुष्याच्या प्राप्तीच्या रकमेवर अवलंबून असतें, असें समजणें चुकीचें आहे. जास्त प्राप्तीच्या घरीं जास्त सुख व कमी प्राप्तीच्या घरीं कमी सुख, हा समजच बरोबर नाहीं. प्राप्ती कितीही असली

तरी तिची खर्चाची व्यवस्था करण्यावर सुख बरेंच अवलंबून असतें, हिंदु कुटुंबांतील जुनी पद्धत झटली ह्मणजे, कर्त्या पुरुषांनीं पैसा मिळवावा व त्यांनींच तो खर्च करावा. पैशाशीं संबंध पूर्वी बायकांचा बहुधा येत नसे. पण अलीकडे ती पद्धत सुटत जाऊन, आतां बहुधा घरच्या मुख्य पुरुषाकडे, पैसा मिळविण्याच्या पलीकडे दुसरा कामगिरी राहिलेलीच नाहीं. पगाराचे रुपये बायकोच्या स्वाधीन महिन्यांतून एकवार केले कीं, घरचे पुरुष प्रपंचाच्या फिकीरींतून बहुधा पुढील महिना येईपावेतों तरी मोकळे असतात. हा प्रघात पडण्याचें कारण पूर्वीपेक्षां अलीकडे बायका जास्त हुषार होत चालल्या आहेत, हें एक व प्रपंच्यांत मन घालून त्यांतील व्यवस्था नीट लावणें, हें काम पुरुषांच्या योग्यतेला कमी आहे, असें बऱ्याच पुरुषांस वाटत चाललें आहे, हें दुसरें. कोणत्याहि कारणानें असा परिणाम झाला असला तरी, तो हितकर आहे असें म्हणावें लागतें. कारण त्याच्या योगानें प्रपंच्याची शिस्त ज्यास्त व्यवस्थेनें होऊं लागली आहे. असा बऱ्याच लोकांचा अनुभव आहे. स्त्रीवर्ग हा जात्या प्रापंचिक सर्व कामें करण्याला योग्य असा परमेश्वरानें केलेला आहे. त्यांचा स्वभाव, त्यांची ईर्षा, त्यांची महत्वाकांक्षा व त्यांची आशा या सर्व गोष्टी प्रपंचांतील कारभाराशीं अगदीं एकरूप होऊन गेलेल्या असतात. नवऱ्यानें पैशाचा सर्व कारभार बायकोच्या स्वाधीन केला ह्मणजे, तिला एक प्रकारचा अभिमान उत्पन्न होत असतो व अशा अभिमानाच्या हौसेत, स्त्रिया नेहमीं दंग असून, घराच्या आंतील सर्व कामें त्या मोठ्या उत्सुकतेनें करीत असतात. प्रपंचांतील सर्व गोष्टींची सुव्यवस्था करून नवऱ्यास कोणतीहि दगदग न पडूं देणारी बायको मिळणें ह्मणजे, मोठें भाग्यच असें मानिलें पाहिजे. आपल्या कुटुंबांतून बायकांनीं जमाखर्च ठेवण्याची पद्धत सुरू झालेली दिसत नाहीं. त्यांच्याकडे दिलेल्या पैशांचा जमाखर्च त्यांनीं अगदीं थोडा

ठेवावा व दर महिन्यास प्रत्येक जिनसाचें खोटखत घालून, प्रत्येक महिन्यास कोणता जिन्नस कमजास्त खर्च झाला आहे, तें सहज लक्षांत येईल अशी सोय करून ठेवावी व त्या मानानें पुढील महिन्याचें धोरण ठेवावें. प्रसंगानुसार आपण केलेले अंदाज चुकतील, पण ते नेहमीं चुकणार नाहींत. प्रथम कांहीं दिवस चुकतील व पुढें जास्त अनुभवांतीं आपले अंदाज बरोबर आहेत, असेंच प्रत्येक कुटुंबांतील बायकांस वाटूं लागेल. कोणी किती खर्च करावा हें नियमानें बांधून देणें अशक्यच आहे. ज्याच्या त्याच्या आवडी प्रमाणें व सोई प्रमाणें "ज्यानें त्यानें" खर्चाचें प्रमाण बसवावें हें ठीक आहे. दरमहा वीसच रुपये पगार अगर प्राप्ती असणाऱ्या कुटुंबांत साधारण मानानें विचार केला तर, खालील प्रमाणानें खर्चाचें मान बसतें. घरभाडें १ रुपया, भोजन खर्च १२ रुपये, कपडा लत्ता ३ रुपये, न्हावी, धोबी व मजुरी १ रुपया, मुलांचा विद्याभ्यास पुस्तकें वगैरे १ रुपया, अकस्मिक खर्च १ रुपया, व रोकड शिल्लक १ रुपया, यांत कमी जास्ती होण्याचा संभव असतो. ज्याचें स्वतःचें अगर वडिलोपार्जित घर असेल त्याला भाडें द्यावें लागत नाहीं. अकस्मिक खर्च दर महिन्यास येतोच असा कांहीं नियम नाहीं.

प्रपंच सुखानें करावयाचा, अशी ज्याची इच्छा असेल त्यानें प्रत्येक जिन्नस रोख पैसा देऊन घ्यावयाचा असा दृढनिश्चय केलाच पाहिजे. आपली पत मोठी, आपल्याला वाटेल तितकें उधार मिळूं शकतें, या मोठेपणाच्या अभिमानांत कधींहि गुंतूं नये. "उधारीचें पोतें सवा हात रितें" अशी आपल्या लोकांत एक पुरातन म्हण आहे, ती अक्षरशः खरी आहे. अती नड पडली, जवळ पैसा नाहीं व जिन्नस घेतल्या शिवाय तर गत्यंतरच नाहीं, असा कठीण प्रसंग आलाच तर सावकारा-कडचे पैसे कर्ज आणून, जिन्नस रोखीनें घ्यावा; पण दुकानदारच

सावकार करूं नये. पैसा कर्ज देणारा सावकार, पैशाचें नुसतें व्याजच घेतो; पण उधार जिन्नस देणारा दुकानदार किंमती इतक्या पैशाचें व्याज व त्याखेरीज मालावरील उमाप नफा या दोन्ही गोष्टी घेतो. उधार जिन्नस घेणाराची स्वतंत्रता नष्ट होऊन, तो दुकानदाराचा गुलाम बनून बसतो, व एखादे दिवशीं हातांत रोख पैसा असला तरी देखील, तो स्वस्त मिळेल त्या ठिकाणीं जाऊन, रोखीनें व्यवहार करीत नाहीं. कारण त्याचा खातेदार रागावेल व फिरून उधार माल देणार नाहीं; ही भीति त्याला असते. रोकड देऊन माल घ्यावयाचा निश्चय असल्यावर, उत्तम माल, पाहिजे तसा, घेतां येतो. ही स्वतंत्रता, उधार घेण्याऱ्याला नसते. सरळ व्यवहार करणाऱ्या व्यापाऱ्यांना देखील रोखीचा व्यवहार फार पसंत असतो. संसारी मनुष्यानें असा पक्का निश्चय करावा कीं, हातांत पैसा असल्या खेरीज, कोणताहि जिन्नस घेऊंच नये. आदा थोडा आणि त्या मानाचाच खर्च आहे, अशी स्थिति असल्यावर तर नवीन वस्तु घरांत आणण्याचे पूर्वी फारच विचार केला पाहिजे. आपणांस जी वस्तु घ्यावीशी वाटते, ती खेरीज आपलें अगदीं अडलेंच आहे कीं काय, असा मनाला वारंवार प्रश्न करावा, व वारंवार जर मनाचें उत्तर "होय" असेंच आलें तर मग ती रोकड पैसा देऊन घ्यावी. **सिडने स्मिथ** या नांवाचा प्रसिद्ध पुरुष इंग्लंडांत होऊन गेला, त्याचा नेहमीं असा उपदेश असे कीं, ज्यावेळीं एखादी नवी वस्तु विकत घ्यावयाचें एखाद्याच्या मनांत येईल, त्यावेळीं त्यानें प्रथम आपल्या मनाला असा प्रश्न करावा कीं "आपणाला या वस्तुची खरोखरीच गरज आहे कीं काय, व या प्रश्नाला "होय" असेंच उत्तर आलें तर असा प्रश्न मनाला करावा कीं ही वस्तु घेतल्याखेरीज चालेल कीं नाहीं. मनानें "चालेल" असें उत्तर दिलें तर ती आपण घेऊंच नये, म्हणजे कधींहि पैशासंबंधी संकट मनुष्याच्या पाठीमागें लागणार नाहीं.

रोजच्या खर्चाचें टिपण खालील नमुन्याप्रमाणें ठेवावें.

सन— माहे— महिन्याचें खर्चाचें टिपण.

| तारीख. | घरभाडें. | रोकड शिल्लक. | मजुरी खर्च. | भाजीपाला. | फळफळावळ. | वाण सामान. | दूध, दहीं वगैरे. | तूप. | सर्पण व रोषनाई खर्च. | शिलाई. | धुलाई. | धर्मादाय. | किरकोळ. | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | | | | | | | | | | | | | |
| २ | | | | | | | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | | | | | | |
| ४ | | | | | | | | | | | | | | |
| ५ | | | | | | | | | | | | | | |
| ६ | | | | | | | | | | | | | | |
| ७ | | | | | | | | | | | | | | |
| ८ | | | | | | | | | | | | | | |
| ९ | | | | | | | | | | | | | | |
| १० | | | | | | | | | | | | | | |
| ११ | | | | | | | | | | | | | | |
| १२ | | | | | | | | | | | | | | |
| १३ | | | | | | | | | | | | | | |
| १४ | | | | | | | | | | | | | | |
| १५ | | | | | | | | | | | | | | |
| वगैरे. | | | | | | | | | | | | | | |

वर दाखविलेल्या कोष्टकांत लिहिलेले किंवा त्यांत कमी अगर जास्त पोट विभाग पाडणें, हें ज्याच्या त्याच्या सोईवर अवलंबून आहे. ज्यांना सालाची बेगमी करण्याचें सामर्थ्य नसतें, त्यांनीं निरनिराळीं धान्यें दर महिन्यास किती घेतलीं हें समजण्यासाठीं त्या त्या नांवचीं

घरें पाडावीं. घरभाडें ज्यांना द्यावें लागत नाहीं, त्यांना म्युनसिपालिटीचे व पाण्याचे वगैरे कर द्यावे लागतात. अशा लोकांनीं घर भाड्याचें कोष्टक वजा करून, त्या ऐवजीं म्युनिसिपल कर, असें खातें घालावें. सारांश वरील कोष्टक हे एक नमुन्यादाखल ह्मणून दिलें आहे. त्यांतील विल्हेवारी कमी अगर जास्त करणें, हें प्रत्येकाच्या सोईवर अवलंबून आहे.

सर्व गोष्टींचा विचार करून, मध्यम स्थितींतील एका मनुष्याला किती खर्च येतो, याचा नियम काढण्याचा प्रयत्न आम्ही केला, पण तो बऱ्याच अंशीं निष्फळ झाला. निरनिराळ्या ठिकाणच्या आमच्या मित्र मंडळीकडून माहिती आणविली, ती एकमेकींशी अगदीं विसंगत अशी दिसून येऊं लागली; याचें कारण 'मध्यम स्थिति' या शब्दाची व्याप्ति करण्यांत, प्रत्येकाचीं मतें निराळीं झालीं, हेंच होय.

थोड्या खर्चात उत्तम प्रपंच थाटावयाचा असल्यास अवश्यक गोष्टी मिळविण्यासाठीं आंगमेहनत करावी लागते. प्रत्येक गोष्ट मजुरीने करून घेऊं, असें म्हणून चालत नाहीं. आपल्या देशांतील लोकांची स्थिति धड अडाणी न-हे व धड पक्की सुधारलेली नव्हे, अशी झालेली आहे. आह्मी आमच्या पूर्वापार चालत आलेल्या चालीरीती सोडून दिल्या व नवीन रीतीचें ग्रहण मुळींच करितनासे झालों, यामुळें एक ना धड भाराभर चिंध्या शिवून, जशी गोधडीची स्थिती होते, तशीच आमची झालेली दिसते.

विलायती तऱ्हेची सर्व चैन आह्माला पाहिजे; पण त्यांच्याप्रमाणें कष्ट करण्याची हौस आपल्या लोकांत पूर्वापार होती, ती नाहींशी होत चालली आहे. घराभोंवती लहानशी बाग असून, तींत फुलझाडें, भाजीपाला उत्पन्न केला तर, वर्षाच्या कांठीं १२ पासून १५ रुपयांची खर्चांत बचत होईल, व शिवाय देवपूजेला नेहमीं ताजीं फुलें

व जेवणाला रोज ताजी भाजी, मिळत जाईल. संध्याकाळीं हवा खाण्यास जाणें, तालीम करणें, बायसिकलवरून पळणें, सॅंडो साहेबांनीं नवीन शोधून काढिलेले व्यायामाचे प्रकार करून, शरीरसामर्थ्य वाढविणें, यांपेक्षां घराभोंवतालच्या बागेंत मेहनत करून फुलें व भाजीपाला तयार करणें, यांत स्वार्थ व परमार्थ हे दोन्ही एकदम साधतात. घरांतील मुलांना बागेंत काम करण्याची संवय लहानपणापासून लावावी. प्रत्येकाला जमिनीचा लहान लहान तुकडा नेमून द्यावा. त्यानें त्यांत मेहनत करून काय काय पिकविलें आहे हें नेहमीं पाहत जाऊन, ज्याची मेहनत जास्त झाली असेल, त्याला शाबासकी किंवा बक्षीस द्यावें. म्हणजे मुलांना जास्त उत्तेजन येत जातें. ज्या मुलांना बीं पेरणें, भांगलणें, पाणी घालणें, वगैरे कठीण कामें येण्याजोगीं नसतील, त्यांना बागेंतील सडकांवरील गवत उपटून काढणें, खडे वेंचणें, तोडून ठेविलेलीं फळें किंवा फुलें घरांत नेऊन ठेवणें, वगैरे त्यांच्या शक्तीसारखींच कामें सांगून, त्यांना बागेंत कामास लावावें, म्हणजे त्याच कामांत त्यांचें मन रमेल, व तीं पुढें मोठीं झाल्यावर देखील बागेंतील कामाला कंटाळणार नाहींत.





# भाग चौतिसावा.

## पैसा कोठें व कसा ठेवावा?



विपत्ति, आजार, वृद्धापकाळ, विश्रांति या स्थितींत घरीं बसून काळक्रमणा करण्याची हौस जरी सर्वांनाच नसते, तरी यापैकीं एका ना एकातरी प्रसंगांत मनुष्य सांपडतोच. व सर्वच प्रसंगांतून एखादा भाग्यवान् मनुष्य सुटला तरी, अखेर मरण हें त्याला सोडीतच नाहीं. तेव्हां आपल्या पश्चात् आपल्या मुलांबाळांचें कसें चालेल, याची चिंता प्रत्येकाच्या अंतःकरणांत वास करीत असलीच पाहिजे. ही चिंता अंशतः तरी कमी होण्याचा उत्तम मार्ग ह्मणजे, द्रव्यसंचय करणे हाच होय. जगांतील बहुतेक नडी पैशानें दूर होतात. पैशानेंही दूर न होणाऱ्या कांहीं नडी आहेत, पण त्या निवारण करणें, मनुष्याच्या आटोक्याच्या बाहेर आहे, म्हणून त्यांविषयीं येथें विचार करण्याचें कारण नाहीं. प्राप्तीपैकीं जो कांहीं भाग रोकड शिलकेच्या रूपानें ठेवावयाचा तो ठेवून, आणखी जास्त जी शिल्लक राहते, ती सुरक्षित कशी ठेवावी, याविषयीं आपण विचार केला तर हाही प्रश्न मोठा भानगडीचाच आहे, असें दिसून येईल. पैसा मिळविणें सोपें, पण तो राखणें कठीण आहे, असें आपले जुने लोक ह्मणत असतात

तें अक्षरशः खरें आहे. कितीही पैसा संचय केला आणि तो रक्षण करून ठेवण्यांत जर हयगय झाली, तर त्या संचयाचा कांहीं उपयोग होत नाहीं. नवऱ्यानें मरतांना पुष्कळ पैसे मिळवून ठेविले असले, तरी त्याची बायको दीन स्थितींतच राहते. श्रीमंत बायांचीं पुष्कळ मुलें गरीब स्थितींत असतांना आपल्या दृष्टीस पडतात, किंवा तरुणपणांत संचय केलेल्या पैशाचा उपयोग आपणांसच वृद्धापकाळीं होत नाहीं, असें जरी केव्हां केव्हां दृष्टीस पडतें, तरी या गोष्टी सृष्टिनियमाच्या नाहींत. हे सृष्टिनियमाचे अपवादच होत. खरा नियम असा कीं, ज्यानें योग्य संचय करून त्याचें योग्य संरक्षण केलें आहे, त्याला द्रव्यसंबंधीं विपत्ति कधींही यावयाची नाहीं. केव्हां केव्हां योग्य संचय होत नाहीं म्हणून दरिद्र येतें व केव्हां केव्हां संचय सुरक्षित नसल्यामुळें दारिद्र्य येतें. सुरक्षित स्थळीं संचय ठेवणें, म्हणजे आपण शिल्लक ठेविलेला पैसा योग्य व्यवहारांत घालून, त्यावर दक्षतेनें देखरेख ठेवणें, हें होय. या गोष्टीसंबंधानें आपल्या लोकांच्या समजुती कांहीं अंशीं चुकीच्या होत गेल्या आहेत व आपले बरेच लोक दर्शनी लाभाला भुलून आपला पैसा भलत्याच व्यवहारांत घालतात, असेंही केव्हां केव्हां नजरेस पडतें. थोडक्या श्रमांत जास्त फायद्याची इच्छा, जास्त व्याजाची आशा आणि दैविक शक्तीवर वाजवी पेक्षां जास्त भरंवसा असणें, या तीन गोष्टींमुळें जितकीं कुटुंबें अनाथ पडलीं आहेत, त्यापेक्षां दारिद्र्याच्या विपत्तींत कमी कुटुंबें सांपडलीं आहेत, असें सूक्ष्म विचार केला असतां नजरेस येतें. कोणत्याही व्यवहारांत जास्त फायदा मिळण्याची आशा धरणें म्हणजे व्याजाला भुलून मुदलाला मुकल्यासारखेंच आहे व जास्त फायद्याबरोबरच जास्त नुकसान असतें, हें कोणींहि विसरतां कामा नये. आपल्या पैशाचें व्याज जास्त यावें व थोडक्या मुदतींत आपल्या भांडवलाची दुप्पट व्हावी, या हेतूनें कांहीं लोक गरजवंत कुळांकडून नाडून २४

टक्यांपासून ३६ टक्यांपर्यंत व्याज घेतात व जवळ असलेल्या १०० रुपयांचे ३-४ वर्षांतच २०० रुपये करण्याची हाव धरितात; पण अशा प्रकारच्या शंभर व्यवहारांतील ९५ व्यवहारांत व्याज व मुद्दल हीं दोन्हीं बुडून जातात, असे आपण पुष्कळ वेळ पहातों. बाकी उरलेल्या पांच व्यवहारांत कदाचित् अवाचे सवा नफा होतही असेल, पण तो होण्यासाठीं ज्यांचे पैसे गुंतलेले असतात त्याला इतकी चिंता वाटत असते कीं, त्या चिंतेनें त्याला रात्रीं नीटशी झोंप देखील येत नाहीं व पैसा पैसा करीत त्याचा सर्व जन्म काळजींत निघून जातो. अशा द्रव्यप्राप्तीपासून काय सुख व काय फायदा आहे, हें ज्याचें त्यासच माहीत!! सारांश जगांत सुखानें दिवस जाणें, किंवा दुःखानें जाणें, हें सर्वतोपरी पैसा मिळविणें, तो व्यवस्थित रीतीनें खर्च करणें, व राहिलेला नीट रीतीनें जतन करून ठेवणें, या तीन गोष्टींवर अवलंबून आहे.

**शिलक पैसा कोठें ठेवावा?:-** यासंबंधानें सरसहा नियम घालून, देणें फार कठीण आहे. ज्यानें त्यानें आपल्या आपल्या स्थितीचा विचार करून, आपल्या शिलक पैशाची व्यवस्था केली पाहिजे. खासगी सावकाराजवळ ठेव ठेवून, थोड्याशा जास्त व्याजाच्या आशेला भुलून, ऐन व मुद्दल या दोहोंनाही मुकण्याचा प्रसंग आणून घेणारे थोडे असतात, असें नाहीं. सर्वच सावकार बेइमान व दगलबाज असतात असें नाहीं. पण एकंदर नियम काढला तर सार्वजनिक संस्थांपेक्षां खाजगी रीतीनें व्यापार करणाऱ्या पेढ्या जास्त धोक्याच्या आहेत, असें मानणें भाग पडेल. एखाद्या संस्थेची पत जाणें ह्मणजे त्यांतील पुष्कळ व्यवस्थापकांची पत गेल्यासारखें होतें, ह्मणून ते प्रत्येकजण त्या संस्थेला फार जपत असतात. तशी गोष्ट खाजगी व्यापार करणाराची नसते; यासाठीं नियमच

बांधावयाचा असला तर असा बांधला जाईल कीं, खाजगी व्यापाऱ्या-पेक्षां ज्या संस्थेला सार्वजनिक रूप असतें ती पेढी किंवा व्यांक चांगली; व अशाच ठिकाणीं प्रत्येकानें आपली रोकड शिल्लक सांठवून ठेवण्याचा निश्चय करावा. याहिपेक्षां वरिष्ठ प्रतीच्या संस्था ह्मटल्या म्हणजे ज्यांना सरकारी हमी आहे त्या, किंवा ज्या खुद्द सरकारानेंच स्थापन केल्या आहेत त्या. अशा पेढ्यांपैकीं उपयोग व सार्वजनिक स्वरूप या मानानें पाहूं गेल्यास तूर्त :—

**पोष्टाच्या सेव्हिंग व्यांका** यांचाच नंबर पहिला लागेल यांत कांहीं शंका नाहीं. या व्यांकासारखी सुरक्षित व सोइवार व्यवस्था इतर नाहींच ह्मटलें तरी चालेल. या पेढ्या इतक्या सोईवार कां वाटतात याविषयीं खालील कारणें लक्षांत घेण्यासारखीं आहेत.

१ त्यांचा बिनधोक सुरक्षितपणा म्हणजे प्रत्यक्ष आपले राज्य-कर्ते हेच त्या पेढ्यांविषयीं पूर्ण हमीदार आहेत. व त्यांचें असें अभिवचन आहे कीं, कोणीही ठेविलेला पैसा किंवा त्यावरील व्याज पाहिजे तेव्हां तात्काळ आम्हीं परत देऊं. येवढा जबरदस्त हमी-दार असल्यावर व्याजाचा दर कितीहि कमी असला तरी हरकत नाहीं. त्या ठिकाणीं सर्वांनीं आपलें शिल्लक द्रव्य नेऊन ठेवावें, असें बेलाशक ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं.

२ दुसरी गोष्ट ह्मणजे या पेढ्यांवर पैसे नेऊन ठेवणें व ते त्यांतून काढणें. या गोष्टी इतक्या सोईवार आहेत कीं, तितकी सोय इतर ठिकाणीं असणें शक्यच नाहीं. जेथें पोष्ट म्हणून आहे, तेथें ही पेढी आहेच व तेथें पैसे ठेवतां येतात व तेथूनच काढतांहि येतात ही सोय केवढी तरी मोठी आहे!

३ या व्यवहारांत कायद्याच्या नडी होतील तितक्या कमी ठेव-ण्याचा प्रयत्न केला आहे, त्यामुळें एखाद्या मृत मनुष्याच्या पश्चात्

त्याच्या सरळ वारसाला पैसे घ्यावयाचे असल्यास, सर्वच वेळीं काय-द्याचीं कोर्टें पहावीं लागत नाहींत व वकीलांचीं घरें भरावीं लागत नाहींत. सरळ व्यवहारांत पोष्टाचे मुख्य अधिकारी बहुधा पैसे योग्य मनुष्यास तावडतोब देऊन टाकीत असतात.

४ चवथी महत्वाची गोष्ट ह्मटली ह्मणजे, पोष्टाच्या व्यांकेशीं कोणाचाही जो व्यवहार असतो तो इतर मनुष्याला मुळींच कळ-ण्याचा संभव नसतो, इतक्या गुप्तपणानें तो करण्याबद्दल सक्तीचे नियम आहेत.

या गोष्टी व सवलती इतर ठिकाणीं सांपडणें अशक्यच आहेत व यासाठीं आम्हीं पैसा रक्षण करून ठेवण्याच्या या संस्थेला सर्व संस्थांत अग्रेसरत्व देतों. पूर्ण सुरक्षितपणा, पैशाचें थोडेंसें व्याज व सर्व व्यवहार नियमबद्ध व अगदीं चोख असल्यामुळें कोठें कशाची भीति ह्मणून रहातच नाहीं. जिन्नस गहाण ठेवून पैसे गुंत-विले, तर ते जिन्नस आधीं खरे आहेत कीं खोटे आहेत हें समजून घेण्याचा त्रास, व पुढें ते चोरीचे वगैरे आहेत कीं काय याची चौकशी करण्याचा खटाटोप, आणि इतक्यांतूनही पार पडलें तर ते जिन्नस आपण सुरक्षित कोठें ठेवावे, ही रात्रंदिवस चिंता; या तिहींमुळें स्वस्थ झोंप लागणें अशक्यच ह्मटलें तरी चालेल. जमीन, घरें, शेअर, कर्जरोखे व आणखी पुष्कळ प्रकारांनीं आपले पैसे गुंतविण्याची चाल आहे खरी; पण सर्वमान्य व अति सुखाची पद्धत ह्मटली म्हणजे सर-कारी व्यांकांतून पैसे ठेवणें, हाच मार्ग खऱ्या सुखाला कारण होतो, यांत कांहीं शंका नाहीं.

आपल्या इकडे पोष्टांत पैसे ठेवण्याची जी चाल आहे, त्याहिपेक्षां विलायतेकडे ती जास्तच सुलभ करून ठेविलेली आहे. आपणांला चार आण्याचे पैसे जमेपर्यंत तरी वाट पहावी लागते, पण तिकडे तसें

ही करण्याची अवश्यकता नाहीं. एका पेनीचें एक तिकीट घ्यावें व तें पोष्टाच्या ठरीव कागदावर चिकटवून ठेवावें, दुसरी पेनी जमली कीं दुसरें तिकीट घेऊन तें चिकटवावें, असें करीत करीत बारा तिकीटें त्या कागदावर चिकटाविलीं म्हणजे तो कागद पोष्टमास्तराकडे नेऊन द्यावा, म्हणजे मास्तर ती तिकीटें रद्द करतात व त्या मुलाच्या नांवानें १ शिलिंग ब्यांकबुकांत जमा करतात. या गोष्टीची सुरवात आपणांकडे करण्यास कांहीं हरकत नाहीं व हळू हळू ती होईलही.

आतां पोष्टल ब्यांकांत पैसे ठेवण्यापासून सर्वांच्याच नडी भागतात असें नाहीं. थोडेसे पैसे ज्यांचे शिल्लक रहातात त्यांना या ब्यांका उपयोगी असतात; पण कांहीं नियमित रकमेच्यापुढें या ब्यांकेंत पैसे ठेवले जात नाहींत यामुळे श्रीमान लोकांची गैरसोय होते, यासाठीं त्यांच्या उपयोगासाठीं

**सेव्हिंग ब्यांका, प्रॉमिसरी नोटा व सरकारनें हमी घेतलेल्या कर्जांचे रोखे**, हे पैसे सांठविण्याचे सुरक्षित प्रकार आहेत, त्यांत पैसे ठेवावे हें उत्तम; ज्याला उदरनिर्वाहासाठीं पैशाच्या व्याजावरच केवळ अवलंबून बसण्याचें कारण नाहीं, त्यानें यापेक्षां इतर व्यवहारांत पैसे घालूं नयेत हे चांगलें. रेलवेस्टॉक, आगबोटीचे शेअर, व्यापारी शेअर, गिरण्यांचे शेअर वगैरे अनेक व्यापार जास्त कमी नफ्याचे आहेत खरे, पण त्याबरोबरच जास्त कमी धोकाहि आहे. यासाठीं ज्याला धोक्याचें दुःख सोसावयास नको आहे त्यानें या व्यापारांच्या फंदांत पडूंनये, हें बरें. ज्याचा जन्म व्यापारांतच गेलेला आहे व ज्यांनां भावाचा चढउतार व नफानुकसानीच्या लाटा या आंगवळणींच पडल्या आहेत, त्यांनीं हे व्यापार करण्यास हरकत नाहीं. पण जन्मभर नोकरी करून, मोठ्या कष्टानें दोन पैसे ज्यानें संचय केला असेल व म्हातारपणीं त्या पैशाचा उपभोग घ्यावा, अशीच ज्याची

खरोखर इच्छा असेल, त्यानें या सट्ट्यांच्या किंवा शेअर बाजारच्या नादीं लागूं नये असें आमचें मत आहे. त्यांनीं आपल्या शिल्लक पैशांच्या प्रॉमिसरी नोटा घ्याव्या किंवा एखाद्या गव्हरमेंट ब्यांकेंत ते ठेवून स्वस्थपणें आयुष्य घालवावें व लोकोपयोगी कामें निष्काळजी मनानें करावीं हें बरें, असें ह्मटल्यावांचून रहावत नाहीं. थोडक्या मुदतींत दाम दुप्पट करणारे अनेक व्यापार आहेत व त्याचप्रमाणें आपला पैसा आपल्याच लोकांनीं काढलेल्या उद्योगधंद्यांत गुंतवून आपल्या पैशाच्या मदतीनें हजारों गरीब लोकांनीं पोटें भरावीं हें मतहि बरोबर आहे खरें, परंतु सभोंवतालच्या सर्व गोष्टींकडे लक्ष दिलें ह्मणजे ज्यांची शिल्लक बेताबाताचीच आहे, त्या लोकांनीं तसल्या व्यवहारांत पडूंनये, असें ह्मणणें भाग आहे. व्यापारी व्यवहारांत पैसे घालून बुडाले तरी चालेल, अशी ज्यांची स्थिति असेल त्यांनीं तसल्या व्यवहारांत पैसे घालण्यास कांहीं हरकत नाहीं.

थोडे बहुत पैसे ज्यांचे शिल्लक रहातात, त्यांनीं ते कोणत्या रीतीनें गुंतवावे याविषयीं वर सांगितलें; पण असे कांहीं लोक असतात कीं, त्यांचें उत्पन्न आणि खर्च या दोहोंना बहुधा गांठच असते. म्हणजे जेवढा आदा तेवढाच बहुधा खर्चहि असतो, व अशा लोकांचे वृद्धापकाळचे दिवस फारच दरिद्रांत जाण्याचा संभव असतो. अशा लोकांच्या पश्चात् तर मागील राहिलेल्या मंडळीस बहुधा भिक्षाच मागण्याचा प्रसंग येतो, किंवा एखाद्या नातेवाइकाचे घरीं मुठींत नाक धरून रहावें लागतें. अशीं उदाहरणें कमी असतात असें नाहीं. सरकारी नोकर, हातावर पोट भरणारे कारागीर व बेताबातानें व्यापार करणारे दुकानदार, यांची स्थिति बहुधा अशी असते कीं, कर्ता पुरुष जगांतून गेला कीं सर्व कारभार आटोपला. त्याच्या हयातींत त्याच्या बायकामुलांची जी स्थिति असते ती आणि त्याच्या मरणा-

नंतर त्यांची जी होते ती स्थिति, या दोहोंत जमीन अस्मानचें अंतर पडतें. रावसाहेबांच्या कारकीर्दींत ज्या वहिनीसाहेबांच्या तैनातीला दोन चार शिपाई व एक दोन खासगी नोकर असतात, त्याच वहिनीसाहेब, रावसाहेबांच्या पश्चात् दुसऱ्याच्या तैनातीस रहातात किंवा जावा, नणदा किंवा सासूसासरा यांच्या जाचांत दिवस कंठीत असतात, असें आपण पुष्कळ वेळ पहातों. रावसाहेबांचीं मुलें शाळेला निघालीं ह्मणजे आर्धी बाळवाटी झालीच पाहिजे, अशी ज्यांना संवय तींच मुलें रावसाहेबांच्या पश्चात् वारकरी बनतात व आज याचे घरीं, तर उद्यां त्याचे घरीं, अशा भिक्षुकवृत्तीनें दिवस काढीत असतात. अशीं उदाहरणें थोडीं आढळतात, असें नाहीं. या सर्वांचें कारण एकच; व तें हेंच कीं, कर्तव्यपराङ्मुखता. आपल्या पश्चात् आपणांवर अवलंबून असणारीं कांहीं माणसें आहेत व त्यांच्यासाठीं आपण कांहीं तरी करून ठेविलें पाहिजे, ही कल्पना फारच थोड्या लोकांच्या डोक्यांत घोळत असते व ह्मणून वरीलसारखे प्रकार घडून येतात. देशांतील सुबत्ता, अविभक्त कुटुंबव्यवस्था आणि स्वराज्य, या गोष्टी जेव्हां आपल्या देशांत वास्तव्य करीत होत्या त्यावेळीं पाठीमागच्या लोकांची काळजी करण्याचें कारण नव्हतें असें ह्मटलें तर शोभण्यासारखें होतें, पण दिवसानुदिवस आपल्या समाजाचें जें स्थित्यंतर होत आहे, त्याला अनुकूल असें आपलें वर्त्तन ठेवणें हें आपलें कर्तव्य आहे. जवळ पुष्कळ पैसा असला ह्मणजे तो जतन करून कसा ठेवावा याविषयीं वर विवेचन केलें आहे, पण पुष्कळ पैसा ज्याचेपाशीं नाहीं त्यानें आपल्या पश्चात्च्या मंडळीची व्यवस्था कशी करावी, हें आतां सांगावयाचें आहे. अशा प्रकारच्या व्यवस्था पूर्वीं नव्हत्या, त्या इंग्रजी राज्याबरोबरच आपल्या समाजांत आलेल्या आहेत. त्या व्यवस्थेला इंग्रजींत लाइफ इन्शुरंस ह्मणतात :—

आयुष्याचा विमा उतरणें, असें ह्मणतात. या व्यवस्थेचा फायदा ज्यानें घेतला असेल त्याची बायकामुलें, त्याच्या पश्चात्हि सुखांत दिवस काढतील यांत कांहीं शंका नाहीं. ही संस्था हजारों कुटुंबांना दारिद्र्याच्या दुःखापासून सोडविते व अनेक निराश्रित बायकामुलांना सुखि करते, यांत कांहीं शंका नाहीं. आयुष्याचा विमा उतरणाऱ्या कंपन्या जगांत अनेक आहेत. त्यांतील अमुक चांगली किंवा अमुक वाईट हें ठरविणें या पुस्तकाचें काम नाहीं. विमा उतरण्याचें तत्व व तें अमलांत आणल्यापासून होणारे फायदे अनेक आहेत, येवढेंच दाखविण्याचा आमचा उद्देश आहे. ज्याला जी संस्था उत्तम वाटेल, तींत त्यानें खुशाल विमा उतरून घ्यावा. ही गोष्ट ज्याच्या त्याच्या पसंतीची आहे व जी कंपनी किंवा संस्था एकाला चांगली वाटेल ती दुसऱ्यालाहि तशीच वाटेल, असें खात्रीनें ह्मणतां येत नाहीं. परंतु साधारण रीतीनें विचार करतां सकृत् दर्शनीं खालील तीन गोष्टींचा विचार कंपनीची पसंती करतांना केलाच पाहिजे.

( १ ) कंपनीचा जुनेपणा. विम्याची कंपनी कमींत कमी ३० वर्षें तरी टिकली आहे कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे. यापेक्षां कमी मुदत अस्तित्वांत असलेल्या कंपनींत विमा उतरणें सुरक्षित होणार नाहीं.

( २ ) जुनेपणाविषयीं विचार झाला ह्मणजे नंतर ज्या कंपनीजवळ जास्त भांडवल आहे ती चांगली, असें उघडच ह्मणावें लागेल.

( ३ ) आणि विचार करण्यासारखी तिसरी गोष्ट म्हटली ह्मणजे ती कंपनी भागिदारांच्या मालकीची आहे, कीं बिमेवाल्यांच्या मालकीची आहे, हें पहावें. या तिन्ही प्रकारच्या कसोटीला जी कंपनी उतरेल ती इतरांपेक्षां उत्तम, असें ठरविणें अविचाराचें होणार नाहीं.

कंपनीची पसंती करतेवेळींहि ज्या कंपनीला सरकारची हमी आहे ती सर्वांत श्रेष्ठ असें मानणें भाग आहे. पण तशी हमी सरकार कोणत्याहि कंपनीला देत मात्र नाहीं. तशी हमी आहे असें दर्शविणारे भ्रामक शब्द कांहीं कंपन्यांनीं वापरण्याचा क्रम चालविला असला तरी, विचारी मनुष्यांनीं त्या गोष्टीची पक्की शहानिशा केल्याखेरीज त्या व्यवहारांत पडूं नये हें उत्तम. सरकारनें, आपल्या नोकरांचा विमा उतरण्यासाठीं पोष्टखात्याकडे सोय केली आहे, तिचा फायदा जमेल त्यानें घ्यावा, हें उत्तम आहे.

कंपनीची पसंती ठरल्यावर विमा कोणत्या पद्धतीनें उतरावा, हें ठरविणें आपापल्या स्थितीवर अवलंबून आहे. विम्याचे मुख्य प्रकार खाली दिले आहेत:—

( १ ) मृत्युपर्यंत एकसारखे पैसे भरून, पश्चात् वारसास विम्याची रक्कम मिळण्याचा.

( २ ) पांच, दहा, पंधरा, वीस, पंचवीस, तीस वगैरे वर्षेपावेतोंच पैसे भरून मृत्युनंतर वारसास पैसे मिळावयाचे.

( ३ ) वरील वर्षांच्या मुदतीपर्यंत पैसे भरून ती मुदत संपतांच आपण स्वतः हयात असलों तरी पैसे घ्यावयाचे किंवा मध्यंतरीं मृत्यु आला तरी वारसास पैसे मिळावयाचे.

यांखेरीज, एकवारच पैसे भरणें, वर्षासन करून ठेवणें, मुलांमुलींचा विमा उतरणें किंवा आपल्या पश्चात् आपल्या कुटुंबाला पेनशन मिळणे, वगैरे पुष्कळ प्रकार निरनिराळ्या कंपन्यांचे निरनिराळे असे आहेत; त्याविषयीं सविस्तर माहिती देण्याचें हें स्थळ नव्हे व एकंदर शोधावरून असें दिसतें कीं, त्याप्रकारांविषयीं आमचे लोक बरेच उदासीनहि आहेत. आधीं आयुष्याचा विमा उतरावा

हें तत्वच कित्येकांना नापसंत असतें. त्यांतून एखाद्या सूज्ञ मनुष्याच्या मनांत ती कल्पना आलीच, तर आपण कंपनीला रुपये देतों किती व आपणांला मिळतील किती या व्याजबट्ट्याच्या हिशेबानें तो हा व्यवहार जुळवितच नाहीं, असें होतें. तेच पैसे आपग इतर ठिकाणीं जास्त फायदेशीर व्याजानें गुंतविले तर दाम दुप्पट फार लवकर होईल इत्यादि कल्पना त्याचे मनांत घोळूं लागतात; व आपल्या पैशावर कंपनी विनाकारण श्रीमंत होते असे कुतर्क लढवून तो या अत्यंत इष्ट अशा व्यवहारापासून पराङ्मुख होतो व शेवटीं मोठ्या लाभाला मुकतो, अशीं शेंकडों उदाहरणें नेहमीं नजरेस पडतात. आपल्या लोकांची असल्या व्यवहाराचे कामीं जी मोठी चूक होते ती ही कीं, आपण जे पैसे खर्च करितों त्यावर दुसरा किती श्रीमंत झाला तें पहावयाचें; आपणांस किती फायदा आहे या गोष्टीकडे लक्षच द्याव-याचें नाहीं. अशा पद्धतीनें व्यवहार लवकर उरकून येत नाहीं. कंपनी श्रीमंत होते ती विमा उतरणाऱ्या लोकांच्या पैशावर होते त्यांत कांहीं शंकाच नाहीं, पण त्या श्रीमंतीबरोबर विमेवाल्याचाहि अत्यंत फायदा होत असतो ही गोष्ट विसरतां कामा नये. केव्हांहि मरण आलें तर हजार, दोन हजार अगर जेवढ्या रकमेचा विमा काढला असेल तेवढी पूर्ण रकम एकदम घरांत येते व पश्चात् रहाणा-ऱ्यांना सुखानें अन्न व वस्त्र मिळण्याचें साधन होतें. याबद्दल मोब-दला आपण कांहींच द्यावयास नको काय? सारांश, संकुचित विचार दृष्टीनें या विषयाचा विचार न करतां थोड्या जास्त विस्तृतपणें विचार केला, तर विमा उतरून ठेवणें हें स्वार्थाचें व परमार्थाचेंहि साधन आहे असें कबूल करावें लागेल. अ नें विमा उतरला, त्यानें फार वर्षे पैसे भरले, म्हणजे विम्याच्या रकमेपेक्षांहि व्याजासह जास्तच पैसे कंपनीच्या घरांत गेले म्हणून त्यानें दुःख मानण्याचें कारण नाहीं. कां तर जर अ त्यापूर्वींच मरण पावला असता तर त्याच्या वारसास

पूर्ण रकम मिळाली असती हें एक; किंवा आतां तो हयात आहे म्हणून जी त्याच्या पदरची जास्त रकम जात आहे त्या रकमेंतून व जो सकाळीं मरण पावला आहे, त्याच्या कुटुंबाला पूर्ण मदत मिळत आहे. तेव्हां आपलाही फायदा आणि प्रसंगविशेषीं दुसऱ्याचाहि फायदा करून देणारी विमा उतरून ठेवण्याची संस्था आहे, यांत कांहीं शंका नाहीं.

विम्याचे निरनिराळे दर ठरवितांना, देशाची आरोग्यासंबंधाची स्थिति, त्यांतील मृत्यूचें प्रमाण आणि विमाकंपन्यांचें काम चालविण्यास लागणारा खर्च या तिहीं गोष्टींचा विचार केलेला असतो. व ज्यांचे जसजसे अनुभव असतील त्या त्या मानानें कमी जास्त दर ठरविलेले असतात व त्या दरांप्रमाणें त्यांनीं अटकळ बांधल्या प्रमाणें जर मनुष्य जगला तर निःसंशय फायदा कंपनीचा होतो व ती अटकळ चुकली म्हणजे मनुष्य मध्येंच मरण पावला तर विमाकंपनीचें नुकसान होतें. अशा नुकसानीचे प्रसंग कमी आले तरच कंपनी भरभराटीस येऊन चांगली चालते, नाहीं तर डबघाईस येऊन दिवाळें काढिते हें उघडच आहे. परंतु इतर व्यापारांपेक्षां या व्यापारांत जो एक विशेष आहे तो हा कीं, कंपनी नफ्याचें काम करीत आहे कीं नुकसानीचें काम करीत आहे हें सुमारें तीस पसतीस वर्षे गेल्याखेरीज समजतच नाहीं; कारण कंपनीनें पसंत करून घेतलेल्या लोकांचा मरणकाळ ३०-३५ वर्षे झाल्याखेरीज येत नसतो, यासाठीं होतां होईल तों नवीन कंपनींत असला व्यवहार शहाण्या मनुष्यानें करूं नये हें उत्तम.

**विम्याचे सट्टे**:—अलीकडे क्वचित् प्रसंगीं विम्याचे सट्टे केलेलीं उदाहरणें नजरेस येतात. विम्याचा सट्टा म्हणजे, दुसरा एखादा मनुष्य आपणापेक्षां लवकर मरेल अशी कल्पना करून त्याच्या

आयुष्याचा विमा उतरणें होय. या व्यवहारांत कांहीं जणांना फायदा होत असेल, नाहीं असें नाहीं; परंतु एकंदरींत तो व्यवहार नियमांनीं बांधलेला व सुरक्षित असा नव्हे, यासाठीं तो करूं नये हें उत्तम.

**कंपन्यांतील शेअरः**—चांगल्या प्रकारें चाललेल्या कंपन्यांचे शेअर विकत घेणें वाईट नाहीं, त्यांतहि पैसा सुरक्षित राहून व्याजहि बरें पडतें. पण या व्यवहारांत पडण्यापूर्वी कंपनीचे हिशेब चौकसखोर वृत्तीनें पहाण्याची संवय बरेच दिवस ठेविली पाहिजे, व नंतर त्यांत कांहीं घोटाळा नाहीं असें स्पष्ट दिसून आलें ह्मणजे त्या कंपनीचे शेअर घेतले तरी कांहीं हरकत नाहीं. कंपन्यांतील व्यवस्थापकांची बहुधा अशी चाल असते कीं, लोकांनीं आपले पैसे आपणांकडे गुंतवावे यासाठीं ते व्याजाचा दर बराच मोठा दाखवीत असतात व त्यामुळें अज्ञानी लोक फसतात. "जास्त व्याज ह्मणजे मुद्दलच बुडण्याची भीति" अशी एक इंग्रजींत ह्मण आहे, ती आमच्या लोकांनीं विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. आपल्यांतहि तशाच प्रकारची एक ह्मण आहे ती अशी कीं, "व्याजाला सोकावला आणि ऐनाला मुकला" हें अक्षरशः खरें आहे. यासाठीं जास्त व्याजाची आशा न धरतां, हिशेब पाहून व त्या व्यवहारांत वापरणाऱ्या एखाद्या चांगल्या मनुष्याचा सल्ला घेऊन हा शेअरचा व्यापार केला तरी कांहीं हरकत नाहीं.

**सराफी देवघेव, गहाणवट ठेवणें आणि अंगावर कर्ज देणेंः**—हीं कृत्यें त्या त्या धंदेवाल्यांनीं पाहिजेत तर करावीं; पण नोकरीचाकरी करून थकलेल्या लोकांनीं पेनशन घेऊन राहिलेले चार दिवस स्वस्थपणांत घालविणें असल्यास, असल्या भानगडीच्या व्यवहारांत पडूं नये हें उत्तम. कारणः—

( १ ) असल्या धंद्यांत जोखीम फार असतें.

( २ ) फसण्याची भीति पावलोपावलीं असते.

( ३ ) ज्यांच्याशीं आपण व्यापार करतों त्यांच्याकडून व्यवहाराचा उलगडा रीतिप्रमाणें झाला नाहीं, तर एकतर पैशावर पाणी सोडण्याचा प्रसंग येतो किंवा कोर्टाचे व वकिलांच्या घरांचे उंबरे झिजवावे लागतात.

( ४ ) या सगळ्या गोष्टींचा परिणाम मनाचें स्वास्थ्य नाहींसें होणें हा होतो व अखेरच्या दिवसांत 'हरी हरी' ह्मणत बसण्याच्या ऐवजीं "पैसा पैसा" असें ह्मणत इहलोकची यात्रा पूर्ण करावी लागते.

यासाठीं अशा उठाठेवीच्या भानगडींत वर सांगितलेल्या लोकांनीं पडूं नये हें उत्तम.





# भाग पस्तिसावा.

## बाजार करणें व सालबेगमी.



पैशाची शिल्लक अशी मोठमोठ्या अडचणींतून मनुष्यास पार पाडते, तशीच धान्याची व इतर अवश्यक पदार्थांची शिल्लकहि प्रपंचांतील पुष्कळ नडी दूर करते. सर्व जिनसांची सालबेगमी करून ठेवणें ही पद्धत सुव्यवस्थित कुटुंबांत नजरेस पडते व तिचें अनुकरण नवीन संसार मांडणारांनीं व ज्यांचे संसार जुनेच आहेत, पण त्यांत अशी व्यवस्था नाहीं त्यांनीं अवश्य सुरू करावी. उठल्या सुटल्या बाजारांत धांवणें पुष्कळ कारणांनीं गैर फायद्याचें असतें. अशा पद्धतीपासून मुख्य तोटे खालीं लिहिल्याप्रमाणें असतातः—

( १ ) थोडथोडे जिन्नस वारंवार घेतल्यानें ते महाग मिळतात. कारण किरकोळाचा व घाउकाचा भाव एक असणें शक्य नाहीं.

( २ ) बाजार करणाराचा वेळ वारंवार विनाकारण मोडतो.

( ३ ) थोडकाच जिन्नस घ्यावयाचा असल्यामुळें, घेणारा चार ठिकाणीं हिंडून कोठें चांगला कोठें वाईट मिळतो हें पाहून घेत नाहीं, यामुळें दुकानदार देईल तसला व सांगेल त्या भावानें जिन्नस आणावा लागतो.

(४) वेळेवर जिन्नस घरांत नसल्यामुळें घरच्या कामाचीहि शिस्त बिघडते, व केव्हां केव्हां विनाकारण खोळंबून बसावें लागतें.

यासाठीं ज्याची सोय असेल त्यानें प्रपंचांत लागणारे सर्व जिन्नस सालबेगमीचे एकदांच हंगामावर घेऊन ठेवावे हें चांगलें.

निरनिराळ्या ठिकाणीं हंगामाचे दिवस अगदीं एकच असतात असें नाहीं. व आतां आगगाडी आणि तारायंत्र यांनीं आमचे पूर्वींचे हंगामाचे दिवसहि बदलले आहेत असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. केव्हां केव्हां असें होतें कीं, आमचा तांदुळाचा हंगाम संपून गेल्यावर देखील ब्रह्मदेशांतील तांदूळ आमच्या प्रांतांत अतीशय लोटूं लागतो व ते घेणेंच कित्येकांनां सोईवार पडतें. माळव्यांतील गहूं दक्षिणेंत उतरूं लागला ह्मणजे आमच्या इकडील गव्हाच्या हंगामाचें महत्त्व कांहींच उरत नाहीं. हें जरी खरें, तरी महाराष्ट्रांत साधारणपणें प्रत्येक जिनसाची सुगी केव्हां असते तें खालीं दिलें आहे; त्यावरून प्रपंच करणारानें होईल तेवढा उपयोग करून घ्यावा.

| जिनसाचें नांव. ... ... | तो कोणत्या महिन्यांत चांगला व स्वस्त मिळण्याचा संभव असतो, तो महिना. |
|---|---|
| १ भात ... ... ... | कार्तिक, मार्गशीर्ष |
| २ गहूं ... ... ... | फाल्गुन. |
| ३ जंव (सातु) ... ... | ,, |
| ४ बाजरी ... ... ... | मार्गशीर्ष. |
| ५ जोंधळा ... ... ... | पौष व माघ मास |
| ६ नाचणे ... ... ... | आश्वीन. |
| ७ हरीक ... ... ... | ,, |

| जिनसाचें नांव. | तो कोणत्या महिन्यांत पिकला व स्वस्त मिळण्याचा संभव असतो, तो महिना. |
|---|---|
| ८ वरी ... ... ... | आश्वीन |
| ९ कांग ... ... ... | ,, |
| १० राळा ... ... ... | ,, |
| ११ सांवा ... ... ... | भाद्रपद. |
| १२ मका ... ... ... | बारमाही. विशेष फाल्गुन. |
| १३ राजगिरा ... ... ... | आश्वीन. |
| १४ हरभरा ... ... ... | माघ, फाल्गुन. |
| १५ तूर ... ... ... | ,, |
| १६ उडीद ... ... ... | आश्वीन, कार्तिक. |
| १७ मठ ... ... ... | माघ, फाल्गुन. |
| १८ वाल ... ... ... | फाल्गुन. |
| १९ कुळीथ ... ... ... | पौष |
| २० चवळी ... ... ... | ,, |
| २१ मसूर ... ... ... | माघ. |
| २२ वाटाणा ... ... ... | ,, |
| २३ लाख ... ... ... | माघ अखेर |
| २४ भुइमूग ... ... ... | माघ. |
| २५ तीळ ... ... ... | आश्वीन. |
| २६ कारळा ... ... ... | आश्वीन. |
| २७ एरंडी ... ... ... | फाल्गुन. |
| २८ करडई ... ... ... | ,, |
| २९ जवस ... ... ... | माघ, फाल्गुन. |
| ३० ताग ... ... ... | मार्गशीर्ष. |

| जिनसांचें नांव. ... ... | तो कोणत्या महिन्यांत चांगला व स्वस्त मिळण्याचा संभव असतो, तो महिना. |
|---|---|
| ३१ कापूस ... ... ... | फाल्गुन. |
| ३२ तंबाकू ... ... ... | पौष. |
| ३३ मोहरी ... ... ... | माघ. |
| ३४ सर्पण ... ... ... | फाल्गुन, चैत्र, वैशाख. |
| ३५ पावटा ... ... ... | माघ. |
| ३६ गूळ ... ... ... | मार्गशीर्ष–पौष. |

बाकीचे जिन्नस ह्मणजे साखर, तेल, खोबरें, वेलदोडे, लवंगा, मसाला वगैरे; बहुतेक परदेशी जिन्नसांचे हंगाम ते ते जिन्नस आपल्या गांवीं येण्यावर अवलंबून असतात ह्मणून त्यांचा हंगाम सर्वांना सारखा असा असत नाहीं. ते आपापल्या सोईप्रमाणें ज्यानें त्यानें खरेदी करावे; पण येवढेंच धोरण ठेवावें कीं, ते वर्षाला अगर सहा माहीला तरी निदान पुरतील येवढे एकदम खरेदी करावे, किरकोळ कधींहि घेऊं नयेत.





## भाग छत्तिसावा.

### कपडे कोणचे चांगले?



इंग्रजी राज्याच्या पूर्वी कपड्यांचें महत्त्व विशेष नसे. आता दिवसानुदिवस कपड्यांच्या तऱ्हा आणि ते शिवण्याचे नमुने इतके कांहीं झाले आहेत कीं, त्या सर्वांचें यथातथ्य वर्णन करण्याचा प्रयत्न केला तर त्या विषयावर एक नवीन ग्रंथच होईल. पण त्या विषयाच्या बारीक सारीक गोष्टींत जरी आपण शिरलों नाहीं, तरी सध्याच्या देशकालवर्तमानाकडे लक्ष दिलें म्हणजे 'पोषाक हा मनुष्याचें एक शिफारस पत्रच आहे' असें जें इंग्रजींत ह्मणतात तें बऱ्याच अंशीं खरें आहे, असें ह्मणावें लागतें. आपापल्या धंद्याप्रमाणें व ऐपतीप्रमाणें प्रत्येकाचा पोषाक निरनिराळा असेल हें रास्तच आहे. सुताराचा पोषाक घिसाड्याला उपयोगी नाहीं; व सोनाराचा पोषाक धीवराला उपयोगी नाहीं, हें खरेंच आहे; पण या लोकांचे पोषाक कितीहि हलके असले तरी ते नीटनेटके व स्वच्छ असण्यास कांहीं हरकत आहे असें वाटत नाहीं. डाक्टर, खलासी, कसाई, खाणींत काम करणारे मजूर, आगगाडी चालविणारे गाडीवान याच्या धंद्याच्या सोईप्रमाणें त्यांचे पोषाक एकमेकापासून भिन्न असतात, तरी त्यांच्या त्यांच्या पोषाकांत जर नीटनेटकेपणा असेल तर तेच लोक एक प्रकारानें

शोभिवंत दिसतात असे आपण नेहमीं पाहतों. तेव्हां पोषाकांतील पहिला गुण म्हटला म्हणजे स्वच्छपणा व दुसरा गुण नीटनेटकेपणा हा होय. डौल, छानछोकी, ऐट व अलीकडे फारफार प्रचारांत येत चाललेली फॅशन, हीं उत्तम पोषाकाचीं मुख्य अंगें नव्हत ही गोष्ट कधींहि विसरतां कामा नये.

कपडे तयार करण्यासाठीं कापड घ्यावयाचें तें वर्षातून एकवेळच घ्यावयाचें, किंवा वर्षांतून फारतर दोन वेळ घ्यावयाचें असा कांहीं तरी नियम असणें अगदीं जरूर आहे. त्या योगानें कपडे वापरणारांच्या मनावर एक प्रकारचा बोजा राहून ते कपडे बेतानें व व्यवस्थित रीतीनें वापरतात, व या पद्धतीनें खर्चहि कमी येतो असा अनुभव आहे. तिसरा असा एक फायदा असतो कीं, नवीन तऱ्हा दिसली कीं घ्यावी. ही जी कित्येक लोकांच्या मनाची हाव असते ती बंद होऊन कपड्यांत जरूरीपेक्षां जास्त पैसा जात नाहीं. "लिलांव," "शिलकी मालाची स्वस्त विक्री" "सवंगसवदा" अशा भपकेदार जाहिराती मोठमोठ्या शहरांतून ज्या केव्हां केव्हां नजरेस पडतात व त्या ठिकाणीं खरोखरच सवंग माल मिळतो अशी ज्यांची समजूत आहे, ती केवळ चुकीची आहे. तसल्या ठिकाणीं बहुधा निरुपयोगी जिन्नस विक्रीस मांडलेले असतात, व जिन्नसांचीं नांवें जरी तींच कायम असतात, तरी त्यांतील सूत, लोंकर, रेशीम किंवा रंग यांत कांहीं ना कांहीं दोष असल्या खेरीज दुकानदार तो माल कमी दरानें देतच नाहीं. कारण चांगला माल कमी दरानें देतां येणें शक्यच नाहीं. यासाठीं शहाण्या मनुष्यानें असल्या व्यापाराच्या फंदांत न पडतां, चांगल्या दुकानदाराकडून नवा कपडा योग्य ती किंमत देऊन खरेदी करावा हें योग्य आहे. लिलावांत घेतलेले तीन कपडे आणि खात्रीच्या दुकानदाराकडून घेतलेला त्याच प्रकारचा

एकच कपडा यांची किंमत बरोबरच असली, तरी हा दुसरा कपडा परिणामीं स्वस्त व चांगला आहे असाच अनुभव येतो.

निरनिराळ्या जातीचीं कापडें खरेदी करतांना त्यांतील चांगलीं कोणतीं व वाईट कोणतीं, याची परीक्षा करण्याजोगें ज्ञान प्रत्येक प्रापंचिकाला असणें जरूर आहे. नेहमीं लागणाऱ्या कापडांची परीक्षा कशी करावी तें खालीं लिहिलें आहे:—

**लुगडीं व खण**:—लांब व रुंद जितकीं पाहिजत तितकीं आहेत कीं नाहींत हें प्रत्यक्ष पाहून घेऊन, कांठाचें रेशीम पातळ आहे कीं जाड आहे हें हातांनीं तपासावें. विन पाजणीचीं लुगडीं उत्तम. ज्यांत खळ जास्त त्यांना एक प्रकारची घाण येत असते, तीं घेऊं नयेत. विणकर नुसत्या डोळ्यांनीं पाहिली तरी विरळ दिसणारीं लुगडीं किंवा खण हे वाईट आहेत असें समजावें.

**खादी**:—मीठ आणि पेज दिलेली खादी वाईट असते, यासाठीं नवी खादी धुऊन घेण्याच्या करारानें घ्यावी, व धुतल्यावर घट्ट विणकर आहे असें दिसून आल्यावर ती चांगली आहे असें मानावें.

**मांजरपाट**:—विन खळीचा आहे कीं नाहीं तें पाहून घेणें फार कठीण नाहीं. त्या कापडाचा एक कोंपरा थोडासा पाण्यांत भिजत घालावा, व कांहीं वेळानें तोच जोरानें घांसावा व पिळावा म्हणजे खळ किंवा पाजणी निघून जाऊन मूळ स्वरूप नजरेस पडतें. त्यावरून मांजरपाटाची परीक्षा सहज होते. चांगला मांजरपाट पिंवळट रंगाचा असतो.

**सैन, हरक, मलमल, कॅलिको**:—यांची परीक्षा करणेंहि विशेष कठीण नाहीं. यांतील ज्या जाती चांगल्या असतात, त्यांना चुन्याचा आर दिला असतो व त्या आराची कृत्रिम तकाकी, तें

कापड दोन बोटांत धरून जरी घांसलें तरी एकदम निघून जाते व नुसतें कापड अगदीं माशाच्या जाळ्याप्रमाणें विणलेलें आहे असें दिसतें. कापड चांगलें जातीवंत असतें त्यांतील स्वाभाविक तकाकी कितीहि तें घांसलें तरी निघून जात नाहीं. या जातींतील चांगलें कापड फाडतांना एक प्रकारचा चर्रर असा कर्कश आवाज ऐकूं येतो, तसा आवाज वाईट कापड फाडतेवेळीं निघत नाहीं.

**बनात**—शुद्ध लोंकरीची बनात आहे कीं नाहीं हें समजण्यास, त्यांतील लहानशी चिंधी घेऊन ती दिव्यावर धरावी ह्मणजे तेव्हांच समजतें. खऱ्या लोंकरीची ती असल्यास, केंस जळल्यासारखी घाण सुटते आणि धाग्यांची पक्की राख होऊन जाते, व ती नुसत्या दोन बोटांनीं धरून दाबली कीं तींत कांहीं उरत नाहीं. असा प्रकार सूत मिसळलेल्या बनातीचा होत नाहीं. तींत सुताचे जेवढे धागे असतील ते जळले तरी त्यांची राख तावडतोब होत नाहीं.





# भाग सदतिसावा.

## कपडे जतन कसे करावे?



निरनिराळ्या कपड्यांची व्यवस्था निरनिराळ्या रीतींनीं करावी लागते. एकच तऱ्हा सर्वांना लागू पडत नाहीं. **बनात, फ्लानेल, मरिना काश्मीर** वगैरे लोकरीचे जेवढे कपडे असतील ते अंगांतून काढल्या बरोबर चांगले झाडावे व त्यांवरील लागलेला घाम वगैरे असेल तो एखाद्या स्वच्छ फडक्यानें पुसून टाकून मग त्यावर ब्रशचा उपयोग करावा. ब्रशनें साफ करून झाल्यावर हे कपडे कांहीं वेळ उघड्या हवेवर ठेवावे, व मग फिरून घालावयाचे असतील तर खुंटीवर ठेवावे, नाहींतर त्यांचेसाठीं केलेल्या योग्य ठिकाणीं ते नेऊन ठेवावे.

**रेशमी कपडे**:—काढल्याबरोबर आधीं एका टेबलावर अगर जाजमावर ते हंतरावे व एखाद्या स्वच्छ फडक्यानें अगर हात रुमालानें झाडून मग ते खुंटीवर ठेवावे. लोंकरीचे अगर रेशमी कपडे खुंटीवर ठेवतांना नेहमीं हें लक्षांत ठेवावें कीं, त्यांची आंतील बाजू बाहेर करून ते खुंटीवर ठेवावे व त्यावर पुरेल असा दुसरा एखादा कपडा टाकावा म्हणजे धुरळा त्यांवर बसणार नाहीं.

सैन, हरक, मांजरपाट, मलमल वगैरे सुती कपडे अंगांतून काढल्याबरोबर थोडावेळ हवेवर टांगून ठेवावे ह्मणजे त्यांतील घामाचा ओलसरपणा सुकून जातो व मग ते खुंटीवर किंवा दोरीवर टांगून न ठेवतां, त्यांच्या हलक्या हातानें घड्या घालून ते कपाटांत अगर पेटींत जेथें ठेवावयाचे तेथें ठेवावे. असले कपडे टांगून ठेवल्याच्या योगानें त्यांतील इस्तरीचा ताठपणा नाहींसा होऊन ते अगदीं विशविशीत होतात.

उपयोगांत नसलेले कपडे गाठोड्यांत अगर कपाटांत किंवा पेट्यांतून ठेवण्याची जी चाल आहे, त्यांतील कपाटांत ठेवण्याची रीत उत्तम आहे असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. कपड्यांची गाठोडीं बांधून ठेवणें अगदीं अप्रशस्त आहे. त्यामुळें कपड्यांचा चोळामोळा होऊन जातो व त्यांवरील सफाई नाहींशी होऊन सुरकुत्या पडतात. पेटींतील हवा तो कपडा हव्या त्या वेळेस सहज काढतां येत नाहीं. सर्वांच्या खालीं ठेवलेला कपडा जर पाहिजे असेल तर जेव्हां वरील सर्व कपडे काढावे तेव्हां खालचा हातीं येतो. शिवाय गाठोडें किंवा पेटी यांत मोकळी हवा खेळत नसल्यामुळें कपडे कुबेटतात व त्यांना एक प्रकारचा वाईट वास येऊं लागतो; तसा प्रकार कपाटांतील कपड्यांचा होणें संभवनीय नाहीं. पावसाळ्यांत तर कपडे गाठोड्यांतून अगर पेट्यांतून कधींच ठेवूं नयेत. या दिवसांत कसर लागण्याची भीती फार. कुंद हवा व दमटपणा या गोष्टी कसर लागण्याला फार अनुकूल आहेत. यासाठीं कपड्यांना स्वच्छ व मोकळी आणि मुबलक हवा पोंहोंचेल अशा रीतीनें ते ठेविले पाहिजेत.

**कसर न लागण्यास काय करावें?**:—पांढऱ्या स्वच्छ फडक्याच्या लहान लहान पिसव्या कराव्या आणि त्यांत कापूर घालावा. कापराचे खडे फार मोठे न ठेवतां साधारण बारीक करावे

[अश]ा रीतीनें तयार केलेल्या एकेक सोनरोम पिशव्या कपड्यांच्या [प्रत्ये]क घडीच्या पोटांत ठेवाव्या. पाच, सबजा, दौणा, मरवा, केवडा वगैरे सुवासिक किंवा उग्र वासाच्या वनस्पतींचीं पानें कपड्यांच्या पोटांतून ठेविलीं, तर कपड्यांना कसर लागत नाहीं व बेरीज वासहि चांगला येतो.

**कसरीचा नाश कसा करावा?:**—कसर फारच झाली तर ती नुसत्या वरील उपायानें बंद होणार नाहीं. तिचा अगदीं बीमोड करून टाकला पाहिजे. कसर नाहींशी करण्यास सर्वांत उत्तम औषध म्हटलें म्हणजे तंबाकूचा काढा, हा कपाटें, पेट्या वगैरेंच्या आंतून व बाहेरून सारवून टाकावा व तसाच वाळूं द्यावा म्हणजे कसरीचा अगदीं बीमोड होऊन जाईल. कापराचा अर्कहि कसर नाहींशी करणारा उत्तम दवा आहे. त्याचप्रमाणें काळीं मिऱ्यें कुटावीं आणि ती पूड कसर झालेल्या ठिकाणीं पसरावी म्हणजे कसर नाहींशी होते.

**काश्मीर, मरीना व सर्ज यांचे केलेले कपडे परटाकडे** देण्याचें कारण नसतांना, पुष्कळ लोक ते धुऊन आणण्यासाठीं परटाकडे देतात ही मोठी चूक आहे. असल्या प्रकारचे कपडे जर घामानें भिजले किंवा मळले तर ते घरींच साफ करावे. वारंवार साफ केल्यानें ते अगदीं नव्यासारखे दिसतात व पुष्कळ दिवस वापरतां येतात. हे कपडे साफ करावयाचे असल्यास प्रथम ते चांगल्या ब्रशानें झाडावे व मग गरम पाण्यांत साबणाला फेंस आणून त्या पाण्यांत ते कपडे भिजवावे. त्या पाण्यांत बराचसा अमोनिया टाकिला तर स्वच्छ करण्याचें काम सहज होईल. कपडे भिजल्यावर ते हातानें अगर ब्रशानें घासूं नयेत. घासण्याच्या योगानें आंचेवरील तजेला नाहींसा होतो. बरेच वेळ भिजत ठेवल्यावर

ते उमळून त्यांतील मळ आपोआपच सुटतो व पाण्यांत मिळतो. नंतर ते पाण्यांतून काढावे व दुसरें पाणी घेऊन त्यांत थोडें मीठ घालून त्यांत कांहीं वेळ ठेवावे व हलक्या हातानें पिळावे. असल्या कपड्यांवर सावण कधींहि घासूं नये. सर्ज धुण्याची रीत याहूनही निराळी आहे. थंड पाण्यांत साबणाला फेंस आणावा व त्यांत सर्ज भिजवून तो त्यांत फार थोडा वेळ ठेवावा व लगेच ऊन पाण्यांत टाकावा व पिळून बाहेर काढून सावलींत वाळवावा.





# भाग अडतिसावा.

## घराला शोभा आणणारें सामान.



इंग्रजी सुधारणेबरोबरच घरांतील सामानाचीहि सुधारणा झाली आहे. मुसलमानी राज्याच्या पूर्वी आमच्या हिंदु कुटुंबांत शोभादायक व आरामास योग्य असे जिन्नस प्रचारांत कोणते कोणते होते, याची यादी करण्याचा प्रयत्न केला तर दऊत, लेखणी आणि कागद यांची मुळींच जरूरी लागणार नाहीं. ती यादी करण्याचा सर्व कारभार एका हाताच्या बोटांवर भागणार आहे! मिजाशी मुसलमानांनीं आम्हां हिंदु लोकांत मिजासीचें बीज पेरलें. पेशवाईत त्या बियाचा मोठा वृक्ष होऊन त्याला बरीचशीं चवदार फळें येऊन, त्यांपासून आमच्या समाजाच्या सुखांत भर पडली व नंतर ऐहिक सुखासाठींच केवळ ज्या राष्ट्रांचा जन्म अशांपैकीं इंग्लंडानें आमच्यावर स्वामित्व करण्याचें पतकरल्यापासून त्या झाडांच्या फळांना केवळ ऊत येऊन, तीं झाडें फळभारानें अगदीं लवून गेलीं आहेत व जिकडे पहावें तिकडे सुख व आराम यांच्या साधनांची अगदीं रेलचेल होऊन गेली आहे. अगदीं भिकारी कां यजमान असेना, पण घरांत एखादी मोडकी तोडकी

खुर्ची ही असावयाचीच. मुलगा शाळेंत जाऊन इंग्रजीची "ए बी सी" शिकावयास लागला कीं त्याला बसावयाला एक खुर्ची आणि लिहावयाला एक टेबल असें साहित्य पाहिजेच, असा प्रकार होऊन बसला आहे. ज्या गोष्टी पूर्वी चैनीच्या वाटत होत्या त्या आतां अगदीं अवश्यक अशा गणल्या जात आहेत. हें आपल्या देशाच्या बरकतीचें लक्षण आहे कीं कम बरकतीचें लक्षण आहे हें सांगणें हा विषय या पुस्तकाचा नव्हे; पण सुखानें म्हणा किंवा दुःखानें म्हणा जी स्थिति प्राप्त झाली आहे तींतच सुव्यवस्था व मितव्यय कसा करावा, हें सांगणें प्रस्तुत पुस्तकाच्या कर्तव्या बाहेरचें आहे असें आम्हांस वाटत नाहीं. म्हणून या जिनसांविषयीं कांहीं माहिती देणें अयोग्य होणार नाहीं, असें वाटतें.

**सामानाची निवड**—आमच्या लोकांची पहिली मोठी चूक अशी होत असते कीं, त्यांना असल्या सामानाची निवडच चांगल्या रीतीनें करतां येत नाहीं. आपणांस सामानसुमानाचा मोठा शौक आहे, असें त्यांचें त्यांसच वाटत असतें व सुंदर किंवा चमत्कारिक दिसलेला पदार्थ विकत घ्यावा, असा त्यांना नादच असतो. इंग्रजी सामान जें बनविलेलें असतें त्यांत आपल्या लोकांच्या सुखाचा व सोईचा विचार केलेला नसतो, हें उघडच आहे. पण तसल्या प्रकारच्या सामानानें घर सुशोभित करण्याचा नाद आमच्यांतील बऱ्याच लोकांना लागला असल्यामुळें, कोणत्या तरी सामानाचा आम्ही कोठें तरी आणि कसा तरी उपयोग करतों व यामुळें त्या सामानाची खरी शोभा जाऊन त्या स्थळाला विशोभितपणा मात्र येतो, असा अनुभव पुष्कळ ठिकाणीं येतो. साहेब लोकांच्या बंगल्यांतून कपडे ठेवण्यासाठीं म्हणून जीं एक प्रकारचीं विशेष तऱ्हेचीं कपाटें केलेलीं असतात, तींच कधीं कधीं आपल्या घरांत पुस्तकें ठेवण्याच्या कामीं

आपण उपयोगांत आणितों; त्यांच्यांतील कांचेच्या सुंदर कुंड्या ज्या फुलझाडांसाठीं ह्मणून निर्माण केलेल्या असतात त्यांच्या आह्मीं पिक-दाण्या बनवितों; त्यांचीं जेवणाचीं टेबलें आमच्या आफिसांतील टेबलांचें काम करूं लागतात व त्यांच्यांतील जोडप्यांनीं बसण्याजोग्या ज्या विशेष प्रकारच्या खुर्च्या असतात त्या एखाद्या पङवींत ठेवून त्यांवर पाहुण्यांस बसविण्याची चालही बऱ्याच ठिकाणीं नजरेस पडत नाहीं असें नाहीं. सारांश, नुसत्या हौसेनें सामान खरेदी करून तें कसें तरी सांठवून ठेवणें, या योगानें घराची शोभा वाढत नाहीं. घर खरोखर सुशोभित दिसावयास पाहिजे असेल, तर त्यासाठीं इंग्रजी तऱ्हेचें सामान घेऊन तें घरांत मांडलेंच पाहिजे असें नाहीं. आपल्या देशी पद्धतीनें देखील घराची शोभा वाढवितां येईल यांत कांहीं शंका नाहीं. पाट, तिवया, चौरंग, झोंपाळे, पेट्या, डब्या, झुंबरें, समया वगैरे साध्या पदार्थांनीं देखील सुशोभित दिसणारीं घरें दृष्टीस पडतात. शोभा ही पदार्थांवर अवलंबून नसते, ते पदार्थ ज्या पद्धतीनें ठेवावयाचे त्या पद्धतीवर अवलंबून असते, यासाठीं आम्हांस तर असें वाटतें कीं, ज्याचें इंग्रजी सामानसुमानाखेरीज नडत नसेल, त्यानें तें घेण्याच्या भरीस पडूंच नये; व जर घेण्याचें असेल तर तें योग्य ठिकाणीं योग्य रीतीनें उपयोगी पडेल व शोभेल असेंच घ्यावें. इंग्रजी सामान योग्य रीतीनें मांडावयाचें ह्मणजे आधीं आपलें घर इंग्रजी पद्धतीचें असलें पाहिजे; नाहींतर एकाद्या भिक्षुकाच्या बायकोस बूट स्टॉकिंग घालून झगा नेसावयास दिला, तर ती जशी दिसेल तशांतला प्रकार व्हावयाचा. उत्तम उत्तम देखावे काढलेल्या मोठमोठ्या तसबिरी, नितळ बिलोरी मोठमोठे आरसे, फुलांचे चित्रविचित्र रंगाचे गुच्छ ठेवण्यासाठीं टेबलावर ठेवण्याजोगीं केलेलीं सुंदर आकाराचीं कांचेचीं भांडीं, निरनिराळ्या आकारांच्या व निरनिराळ्या सोईच्या खुर्च्या, पलंग, कपाटें, टेबलें,

दिव, पडदे, मूर्ती वगैरे पदार्थ व्यवस्थित मांडण्यास जागाहि व्यवस्थित व त्या पद्धतीला योग्य अशी असली पाहिजे. तशी पुष्कळांस अनुकूल नसते. म्हणून अशा लोकांनीं या सामानाचा संग्रह करण्याचा हव्यास करूं नये, हें उत्तम. (सर्व प्रकारची अनुकूलता ज्यास आहे त्याच्याविषयीं बोलणेंच नाहीं.)

लांकडी सामान, कांहीं दिवस वापरलेलें असें घेतलें तरी चालेल. मात्र लांकडाला एक प्रकारची कोरडी कीड लागून लांकूड भेंडासारखें पोकळ होऊन जातें, तसें झालें नाहीं असें पाहून घ्यावें. वापरलेलें सामान कांहीं स्वस्त मिळतें, हा तर एक फायदा आहेच पण वापरण्याच्या योगानें कित्येक लांकडें भेंडाळतात, तसें झालेलें नाहीं असें पाहून घेण्यापासून पुष्कळच फायदा होतो. गाद्या, उशा, मच्छरदान्, पडदे वगैरे जिन्नस मात्र वापरलेले कधींहि घेऊं नयेत. कित्येक आंबटशौकी व दरिद्री लोकांना असें वाटत असतें कीं, आपण थोडक्यांत साहेब बनावें. म्हणून ते नेहमीं "जुने बाजार," "चोर बाजार," "सवंग लिलांव" वगैरेंची वाट पहात बसलेले असतात; व तशी संधी येतांच, कोणत्या तरी साहेबाची पाटलोण, कोणाचा तरी बूट, कोणाचा तरी कोट व कोणाचें तरी जाकीट खरेदी करून, आपण पुष्कळ किमतीच्या जिनसा थोडक्या पैशांत घेतल्या म्हणून धन्यता मानीत असतात. हा प्रकार तरुण पण गरीब असून इंग्रजी ढंगांत गुंग झालेल्या मंडळींत फार आढळतो. पण हा सवदा स्वच्छतेच्या मानानें पहातां फारच वाईट आहे असें म्हटल्यावांचून रहावत नाहीं. असले कपडे मूळचा मालक निरुपयोगी म्हणून टाकून देतो, ते त्याचा कोणी तरी बटलर किंवा बबरजी बक्षीस म्हणून घेतो व कांहीं तरी पैसे घेऊन, तो ते एखाद्या जुन्या कपड्यांच्या दुकानदाराला विकतो व तो नंतर ते बाजारांत आणतो. एवढ्या थोरल्या प्रवाहांत त्या

बिचाऱ्या कपड्यांचें किती तरी स्थित्यंतर होऊन गेलेलें असतें. साहे-बाचें प्रशस्त व स्वच्छ कपाट सुटून तो कपडा बटलर साहेबांच्या घाणेरड्या पेटींत किंवा गाठोड्यांत जाऊन बसतो, तेथें त्याला सूर्य-दर्शन तर काय पण शुद्ध हवेचा स्पर्शहि होत नाहीं. त्यामुळें त्यांत निरनिराळ्या प्रकारचे जीव तयार होऊं लागतात, व तशा स्थितींत तो दुकानदाराच्या दुकानांत सांठविलेल्या जुन्या कपड्यांच्या ढिगांत जाऊन पडतो. मग रोगबीजांच्या उत्पत्तीस व वाढीस प्रत्यवाय कोणता? असो, सारांश एवढाच कीं कपडे खेरीज करून इतर जें सामान घराच्या शोभेसाठीं वगैरे घ्यावयाचें तें वापरलेलें घेतलें तरी हरकत नाहीं.

ज्या घरांत पुष्कळ मुलेंबाळें आहेत, अशा घरांत सामानाची व्यवस्था नीट रहात नाहीं. तीं तें सामान मोडतात, तोडतात वगैरे कुरकुरी करणारीं प्रापंचिक माणसें कमी आहेत असें नाहीं; पण अशा प्रकारची सबब पुढें आणणें म्हणजे स्वतःच्या आंगीं वकूब कमी आहे, आपणां स्वतःस मुलांना कसें वागवावें हें कळत नाहीं, असें म्हणण्या-सारखेंच आहे. व अशा रीतीच्या खोड्या करणाऱ्या मुलांपेक्षां त्या मुलांचे आईबापच वाईट असें म्हणावें लागतें. मुलेंबाळें पुष्कळ असल्यामुळें मोठें घर घेण्याची जरूरी असते; पण पैशाच्या अडचणी-मुळें तसें करतां येत नसलें तर लहान घरांतच निर्वाह करावा लागतो. अशा समयीं, प्रत्येक गोष्टीसाठीं निरनिराळी खोली किंवा जागा असणें शक्य नाहीं; व त्या मानानें सामानहि विशेष लागत नाहीं. पुष्कळ सामान घेऊन तें जागेच्या संकोच्यामुळें कोठें तरी अडकवून ठेवण्यापेक्षां, जेवढी जागा आहे तेवढ्या बेताचेंच सामान घेणें चांगलें. गरीबीच्या घरांत बसण्याउठण्याची जागा नसली तरी चालेल, पण निजण्याची जागा सर्वांची एक मात्र चालवयाची नाहीं. स्वच्छ

मोकळी हवा, निरोगीपणा आणि मुलांबाळांची नीति या गोष्टींकडे लक्ष दिलें, तर त्यांची निजण्याची जागा व घरांतील मोठ्या माण-सांची निजण्याची जागा या निरनिराळ्या असल्याच पाहिजेत.

निजण्याच्या खोलींतील सामान हवेस प्रतिबंध होईल अशा तऱ्हेनें मांडूं नये. लांकडी पलंगांपेक्षां लोखंडी पलंग चांगले; व त्यांतही ज्या पलंगांनां लोखंडी पट्या नसून स्प्रिंग–म्याट्रेस असेल ते तर उत्तमच. पण या सर्व गोष्टी प्रत्येकाच्या ऐपतीवर अवलंबून आहेत हें तर उघडच आहे. पट्यांच्या पलंगावर नुसती गादी घातली किंवा गादीखालीं सतरंजी वगैरे जरी घातली, तरी पट्यांना गंज चढून त्याचे डाग वरील सतरंजीला किंवा गादीला पडतात; ते न पडावे अशी ज्यांची इच्छा असेल, त्यांनीं पलंगावर ब्राऊन पेपरचे दोन तीन थर आधीं हंतरावे व मग त्यांवर गादी वगैरे घालणें ती घालावी, म्हणजे डाग पडले तरी ते कागदाला पडतील, गादीला वगैरे पड-णार नाहींत.

कातड्याचे जिन्नस होतां होईल तितके करून नवे व न वापरले-लेच घ्यावे. वापरण्याच्या योगानें ते खराब होऊन निरुपयोगी होतात असें नाहीं, पण ते अनेकांच्या हातीं पडून पडून त्यांत रोगो-त्पादक जीव उत्पन्न होण्याचा संभव जास्त असतो. हवेंतील दमट-पणा शोषून घेण्याची शक्ति इतर कांहीं पदार्थांपेक्षां चामड्याचे आंगीं जास्त असते व तें जर वारंवार साफसूफ करून ठेविलें नाहीं, तर त्यावर बुरा धरून त्यांतून बारीक जीव उत्पन्न होऊं लागतात. यासाठीं तें वापरणारांनीं विशेष खबरदारी घेतली पाहिजे.

---



# भाग एकुणचाळिसावा.

## स्त्रीवर्गाचे व्यवसाय.



अमुक एका घरांतील सर्व टापटीप व व्यवस्था कशी आहे, हें पहाण्यासाठीं त्या त्या घरांत जाऊन कांहीं वेळ तेथें राहिलें पाहिजे. त्याखेरीज खरा प्रकार समजावयाचा नाहीं, हें बहुतांशीं जरी खरें असलें तरी तें सर्वांशीं खरें, नाहीं, असें पुष्कळ उदाहरणांवरून दिसून येतें. सणवार पाहुण्यांचें आदरातिथ्य करण्याचे प्रसंग किंवा अशा कांहीं इतर वेळीं विशेष काळजी घेऊन घर नीटनेटकें, स्वच्छ व व्यवस्थेशीर केलेलें दृष्टीस पडेल, पण तें नेहमीं तसेंच असतें असें मात्र समजतां यावयाचें नाहीं. मात्र घरांतील ज्या बायका असतात त्या नेहमीं नीटनेटक्या व व्यवस्थेशीर असतील तर त्यांचा प्रपंचही व्यवस्थेशीर व नीटनेटका आहे असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. अशा बायका दिवसानुदिवस जास्त होऊं लागल्या आहेत कीं कमी होऊं लागल्या आहेत, हा एक मोठा प्रश्नच आहे. वरकांती देखावा नीटनेटका दिसतो, तो तसाच घरींदारीं व प्रपंचांतही असेल तर फार मोठें सुचिन्हच समजलें पाहिजे. पण बारीक विचार केला असतां अलीकडील बायकांच्या आंगीं नुसता वरील नीटनेटकेपणा

जास्त येऊं लागला असून, त्यांचीं खरीं खरीं कामें व कर्तव्यें त्या विसरत चालल्या आहेत असें दिसून येईल. पियानो वाजविणाऱ्या बायकांची संख्या कदाचित् जास्त वाढत चालली असेल, पण घरांत एकदम १० पाहुणे आले असतां नोकर चाकर नसतांनाही त्यांना लवकर स्वयंपाक करून वाढणाऱ्या बायका दिवसानुदिवस कमी कमी होत चालल्या आहेत. कमरेला झगा, अंगांत पोलका व पायांत बुट स्टाकिंग घालून मिरविणाऱ्या बायकांची संख्या वाढत चालली आहे व यापुढें वाढेलही, पण आमच्या देशी तऱ्हेचीं लुगडीं व चोळ्या घालून शरीराला व समाजालाही शोभा देणाऱ्या बायका कमी कमी होत चालल्या आहेत. कशिद्याचें काम, लोंकरीचे जिन्नस, सुताचे रुमाल, मखमलीवरील नाजूक नक्षी,यांत जास्त जास्त बायका प्रविण होत चालल्या आहेत; पण पासोडीला ठिगळ लावावयाचें असलें म्हणजे शिंपीदादांचें आर्जव करण्याचे प्रसंग वारंवार येऊं लागले आहेत. सृष्टीच्या मनोहर देखाव्यांचीं रम्य चित्रें कागदावर चित्र-विचित्र रंगांनीं रेखाटणाऱ्या बायका जास्त जास्त उत्पन्न होत आहेत, पण घरापुढील बागेला शोभा कशी आणावी व ती जास्त उपयोगी कशी करावी, या गोष्टींचें ज्ञान नाहींसें होत चाललें आहे. आर्ट स्कूल मधील ड्राइंगच्या परीक्षा पास झालेल्या बाईच्या घराच्या भिंती विशोभित व ओंगळ दिसूं लागतात अशींहि उदाहरणें आहेत. तेव्हां सारांश इतकाच कीं, आमच्या सुधारणेचा झोंक, जुनें सुधारून नवें करावें असा नसून जुन्याचा उच्छेद करून, त्याच्या ठिकाणीं नवें आणून बसवावें असा चालला आहे व तो अगदीं अनिष्ट आहे.

मुलांच्या शाळांतून जसें कांहीं कांहीं व्यवहारदृष्टीनें निरुपयोगी गोष्टींचें ज्ञान मुलांच्या डोक्यांतून बळेंच भरविलें जातें, तसाच प्रकार मुलींच्या शाळांतूनही होत आहे. व याचा परिणाम असा होतो

चालला आहे कीं, आमच्या समाजांतील स्त्रिया संसारोपयोगी बायका म्हणून पुढें सरसावत नसून, त्या नीटनेटक्या सुंदर दिसणाऱ्या कळसुत्री बाहुल्या म्हणून प्रसिद्धीस येत चालल्या आहेत. आणखी याचा परिणाम असा होत आहे कीं, संसारांतील सुखाची मर्यादा आकुंचित होत आहे व बाह्य सौख्याची गोडी जास्त जास्त वाढत आहे. हा अनिष्ट प्रकार नाहींसा होण्यास खालील उपायांची योजना करून पहावी.

मुलींच्या शाळांतून जें शिक्षण तूर्त मिळत आहे, त्याचा कल आमच्या स्त्रियांना हिंदु गृहिणि करण्यापेक्षां युरोपियन गृहिणि करण्याकडे विशेष असल्यामुळें असा घेडगुजरी प्रकार होत आहे. यासाठीं त्या शाळांतून हिंदु पद्धतीला योग्य, किंवा देशी पद्धतीला योग्य असें शिक्षण देण्याची खटपट झाली पाहिजे. मुलांच्या शाळांतून चालणारीं पुस्तकें व मुलींच्या शाळांतून चालणारीं पुस्तकें, एकच असल्यामुळें, स्त्रीवर्गाला योग्य असें शिक्षण देण्याची संधी स्त्रियांच्या शाळांतील शिक्षकांना येतच नाहीं. बायकांना उपयोगी पडतील व त्यांच्या मनावर ठसा उमटेल, अशा स्त्रियांच्या गोष्टी, नवऱ्याविषयीं प्रेम व पूज्यबुद्धि उत्पन्न होईल अशा गोष्टी, पाकशास्त्र, शिवणकला, प्रपंचशास्त्र, मुलांची जोगवण, धान्यादिकांचे हिशेब करण्याच्या तऱ्हा वगैरे गोष्टी, त्यांस ज्या रीतीनें शिकवावयास पाहिजेत त्या रीतीनें शिकविल्या जात नाहींत. या गोष्टींचें शिक्षण मुलींस मिळत नाहीं असें नाहीं. कोठें कोठें या सर्व अगर कांहीं गोष्टी शिकविण्याची तजवीज केलेली आहे. पण ती युरोपियन पद्धतीची असल्यामुळें, त्या शिक्षणाचा उपयोग आह्मां लोकांस व्हावा तसा होत नाहीं. आमच्या मुलींच्या शाळांतून केव्हां केव्हां स्त्रियांचीं चरित्रें वाचण्यांत येत असतील, पण तीं

स्त्रीचरित्रें पाश्चिमात्य बायकांचीं असल्यामुळें, त्यांपासून आमच्या मुलींच्या मनावर कांहीं संस्कारच होत नाहीं, म्हटलें तरी चालेल. मिस मेरी कार्पेंटर, आनि बिसांट, मिसिस फॉसेट, क्वीन व्हिक्टोरिया, एलिजाबेथ राणी वगैरेंच्या चरित्रांपासून बोध घेण्याजोग्या पुष्कळ गोष्टी असतील, पण हिंदु समाजांतील बायका आणि पाश्चिमात्य स्त्रिया यांच्यांत जमीन अस्मानचें अंतर असीच ज्या मुलींची समजूत व साहेब लोक म्हणजे एक प्रकारचीं विचित्र माणसें, असा ज्यांचा समज त्या मुलींना, त्या स्त्रियांच्या गोष्टी गोड कशा लागतील? साहेबाला शिवलें तर विटाळ होतो, साहेबांच्या बायकांत व पुरुषांत फारसा फरक नाहीं, दोघेंही टोपी घालतात, दोघेंही कोट घालतात व दोघेंही बूट घालतात, असा त्यांच्यांत घाणेरडा प्रकार सुरु आहे; म्हणून आमच्या मुलींच्या मनांत त्यांचेविषयीं पूज्यबुद्धी उत्पन्न होण्याचा संभव कमी. त्या साहेबांच्या स्त्रियांच्या गोष्टींपासून चांगला बोध मुलींच्या मनावर ठसत नाहीं. यासाठीं आमच्या अगदीं परिचयांतलि जीं नांवें म्हणजे तारा, द्रौपदी, सीता, मंदोदरी, अहिल्या, झाशीकर लक्ष्मीबाई वगैरे बायकांचीं चरित्रें शिकविल्यापासून अत्यंत फायदे होतील यांत कांहीं शंका नाहीं. मुलींच्या कल्पनेला जुळतील अशा गोष्टी त्यांना वाचावयास दिल्यापासून पुष्कळ फायदा होतो व त्या, त्या गोष्टींपासून बोधही घेतात. दुसरी चूक

शिवणकाम या विषयासंबंधानें होत असते. शाळेंत शिवण काम शिकून ज्या मुली तयार होतात, त्याच पुढें संसाराच्या मालकिणी बनल्यावर त्यांना जरूर लागणारे जे त्यांचे किंवा त्यांच्या मुलाबाळांचे कपडे ते त्यांना शिवतां येत नाहींत. पण इंग्रजी तऱ्हेचीं झबलीं पोलकीं, पेट्या, चोळ्या, आंगिटें, हे कपडे त्यांना शिवतां येतात. आमच्या प्रचारांत नेहमीं लागणारे कपडे म्हणजे चोळी, परकर,

कपडे, शेवण, भांगराचे वगैरे शिकण्यास लागणारें कौशल्य मुलींना शाळेंत आऊन येत नाहीं ; यामुळें अत्यंत अवश्य गोष्टीसाठीं लोकांच्या तोंडाकडे पहाण्याचा प्रसंग येतो व जीं कामें बायकांच्या हातून सहज होण्याजोगीं असतात त्यांसाठीं प्रत्येक कुटुंबांतील किती तरी पैसे खर्च होत असतात.

**लोंकरीचें काम:**—लोंकर, रेशीम, कलाबतु, मणी, खोटे मोतीं वगैरेंचें काम करण्याच्या कामीं मुली तरबेज होत आहेत खऱ्या, पण या गोष्टी केवळ श्रीमंत लोकांच्या घरीं उपयोगी पडण्यासारख्या असल्यानें व या जिनसांच्या बनविलेल्या वस्तु केवळ ऐषआरामाच्या उपयोगी पडणाऱ्या असल्यामुळें, मध्यम स्थितीच्या कुटुंबांत या जिनसांचा कांहीं उपयोग होत नाहीं; व याप्रीत्यर्थ खर्ची पडलेला पैसा केवळ पाण्यांत टाकल्यासारखा होतो. यासाठीं या कामीं खर्च पडणारा पैसा व काळ इतर उपयुक्त गोष्टींकडे लाविला तर जास्त फायदा होईल. शरीर रक्षणासाठीं लागणारे लोंकरीचे कपडे करण्याची विद्या संपादन केली, तर ती उपयोगी विद्या आहे असें म्हटलें पाहिजे; पण ज्या जिनसांचा कधीं उपयोगच होत नाहीं व ज्यांच्यामुळें नुसती शोभा वाढण्याला मदत होते, ती विद्या अवश्य आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं.

**सूपशास्त्र** या विषयासंबंधानें देखील, कांहीं कांहीं मुलींच्या शाळेंत जी व्यवस्था केलेली असते तीमुळें मुलींना आमच्या मध्यम प्रतींतील संसाराला उपयोगी असे पदार्थ तयार करावयास शिकविण्याचें एकीकडे राहून, साहेबांच्या खान्याच्या मेजावर शोभणारे असे जिन्नस म्हणजे, ब्रेड (पाव), बिसकिटें, वगैरे पदार्थ करावयास शिकवितात. कित्येक वेळीं आमच्या लोकांतील श्रीमंत दरजाच्या कुटुंबांत नेहमीं जरूर लागणारीं पक्कान्नें शिकविण्याची व्यवस्था

केलेली दृष्टीस पडते. परीक्षेच्या वेळीं किंवा इतर प्रसंगीं कोणी सभ्य मनुष्य शाळा पहावयास गेला असतां, त्याच्या नजरेपुढें वरील प्रकारचे पदार्थ पडले ह्मणजे साहजिकच तो खूष होतो व पाकनिष्पत्तींत शाळेंतील मुली सरस रीतीनें तरबेज झाल्या आहेत, असा शेरा मिळतो. ही दर्शनी स्थिति उज्वल दिसते खरी व ही पाहून क्षणभर कौतूकही वाटतें खरें; पण याच मुली पुढें संसारांत पडल्यानंतर त्यांस साधी आमटी, भाजीभाकरी, भात वगैरे पदार्थ नीट करतां येत नाहींत, हा दोष कोणाचा आहे बरें? पूर्वींची गृहशिक्षणाची पद्धत मोडून त्याऐवजीं ही नवीन शाळांतून शिक्षण देण्याची पद्धत सुरू झाल्यामुळें, आईबाप आपल्या मुलींबद्दल स्वाभाविकपणें निष्काळजी होऊं लागले आहेत व याचा परिणाम असा होत आहे कीं, अलीकडील संसारांतील बायका श्रीमंती डौलाला शोभतील अशा निपजूं लागल्या आहेत खऱ्या; पण गरीबी प्रपंचाला त्या अगदीं निरुपयोगी झाल्या आहेत.

**व्यायाम**—शारिरिक श्रमाचे पूर्वींचे प्रकार बंद पडून त्याऐवजीं नवीन खेळ आमच्या बायकांच्या आंगीं अद्याप खेळूं लागले नाहींत हें खरें; पण पूर्वींच्या धर्तीचे खेळ शाळांतून शिकविण्याची व्यवस्था कोठेंच केलेली दिसत नाहीं. तशी व्यवस्था झाल्याखेरीज मुलींची शारिरिक संपत्ति सुधारावी तशी सुधारणार नाहीं, हें उघड आहे.





## भाग चाळिसावा.

### लहान मुलांची सुश्रुषा.



लहान मुलांची सुश्रुषा कशी करावी हें पुष्कळ जाणत्या देखील बायकांस कळत नाहीं, याचा परिणाम असा होतो कीं, लहान मुलांच्या सहवासानें संसारांत जें एक प्रकारचें सौख्य असतें व जी एक प्रकारची शोभा असते ती नाहींशी होऊन, तो संसार नुसता कष्टमय कारभार वाटूं लागतो व त्या संसारांतील पुरुषांनां व बायकांनां देखील असें वाटत असतें कीं, या किरकिर असणाऱ्या घरांतून आपण एकदां मोकळे होऊन जाऊं तर बरें? आपल्यामध्यें दहापांच मुलें जिला झालीं आहेत ती अनुभवानें सुश्रुषेच्या कामांत कांहीं अंशीं जाणती होते, व तिचा सल्ला इतर लहान बायका घेतातही, पण हा अनुभव सशास्त्र नसल्यामुळें त्याची किंमत शहाण्या लोकांच्या मतानें विशेष ठरत नाहीं. या-साठीं या अत्यावश्य विषयाची माहिती प्रत्येक स्त्रीनें करून घेतली पाहिजे, यांत कांहीं शंका नाहीं. लहान मुलांच्या जन्मापासून तीं पांच वर्षांचीं होईं तोंपर्यंत त्यांच्या शरीराची व शक्तीची वाढ फारच विलक्षण प्रकारानें होत असते, व ह्या पांच महत्वाच्या

वर्षांत जर त्यांच्या शरीराची आईबापांनीं काळजी घेतली नाहीं, तर त्याचे परिणाम मुलांना जन्मभर सोसावे लागतात.

लहान मुलांना अत्यावश्य ज्या गोष्टी आहेत, त्या खालीं दिल्या आहेतः—

( १ ) सहज पचेल असें मुबलक अन्न त्यांना दिलें पाहिजे.

( २ ) ऊबदार व भरपूर कपडे त्यांना असले पाहिजेत.

( ३ ) त्यांच्या शरीराच्या प्रत्येक अवयवाला पुष्कळ व्यायाम मिळाला पाहिजे; पण तो सतत न देतां कांहीं वेळ व्यायाम व कांहीं वेळ विश्रांती असें झालें पाहिजे.

( ४ ) त्यांचीं शरीरें, त्यांचे कपडे व त्यांच्या आसपास असणारी हरएक जिन्नस अत्यंत स्वच्छ व निर्मळ असली पाहिजे.

( ५ ) उजेड आणि मोकळी हवा हीं त्यांना मुबलक मिळालीं पाहिजेत.

वरील सर्व गोष्टींची अवश्यकता लहान मोठ्या सर्वच माणसांना आहे खरी, पण त्यांतही लहान मुलांना या गोष्टी अगदीं अत्यावश्यच आहेत, म्हणून त्यांविषयीं मुलांच्या आईबापांनीं कधींहि हलगर्जी-पणा किंवा चालढकलपणा करूं नये. या प्रत्येक गोष्टीविषयीं स्वतंत्र विचार त्या त्या प्रसंगीं मागें केलेलाच आहे. आतां मुलांना घाल-ण्याचें जें अन्न त्याविषयीं मात्र सविस्तरपणें लिहिणें अवश्यच आहे, ह्मणून तें खालीं लिहिलें आहे.

लहान मुलांचें अन्नः—मूल जन्मल्यापासून तें नऊ अथवा सहा महिन्यांचें होईपावेतों, त्याला आईच्या अंगावरील दूध पाजावें.

स्तनांतील दूध इतकें उत्तम असतें कीं, त्यांतील गुणांचें पुरतेपणीं वर्णन करणें देखील अशक्य आहे. या दुधाखेरीज इतर कोणत्याही अन्नाची मुलांना जरूरच नसते. एवढेंच केवळ नव्हे, तर जर इतर कांहीं पदार्थ त्यांस खाऊं घातले, तर ते खास अपायकारक होतात. नुसत्या दुधानें मुलाची भूक भागत नाहीं व तें अंग धरीत नाहीं, अशा कल्पना कित्येक बायकांच्या असतात त्या अगदीं खोट्या व निराधार आहेत. अशा वेडगळ समजुतीमुळें पुष्कळ आया आपल्या मुलांस तवकील, साबूदाणा किंवा मुलांसाठीं तयार केलेले इतर कांहीं विलायती अगर देशी पदार्थ घालितात, पण त्यामुळें मुलांची प्रकृती कधींहि सुधारत नाहीं. उलट त्यांच्या प्रकृतींत श्वास, दमा, कफ, खोकला किंवा मलावरोध हे विकार जडतात व ते जन्माचे साथीदार होऊन बसतात. ज्या पदार्थांत पिठाचा अंश जास्त असतो ते पदार्थ मुलांना मुळींच पचत नाहींत, म्हणून तसले पदार्थ त्यांना कधींही खाऊं घालूं नयेत. बटाटे, रताळीं, धान्याचीं सत्वें वगैरे पदार्थ या वर्गांतील आहेत. असल्या पदार्थांचें चर्वण चांगलें झाल्याखेरीज जर ते पोटांत गेले, तर ते मुळींच पचत नाहींत. यासाठीं मुलांना दांत येण्याच्या पूर्वी तर हे पदार्थ कधींही देऊं नयेत. या पदार्थांत जो पिठूळ भाग असतो तो पोटांत गेल्यावर त्याची साखर बनून ती पोषणाला उपयोगी पडते खरी, पण पोटांत जाण्यापूर्वी या पदार्थांत लाळ मिसळली तरच साखर होते, नाहींतर नाहीं; व दांत येण्यापूर्वीची लाळ या कामीं उपयोगी पडण्याजोगी नसते, म्हणून असले पदार्थ मुलांस देण्यापासून फायदा होत नाहीं.

आई जर निरोगी आणि सशक्त असेल तर तिनें आपलेंच दूध मुलाला पाजावें. आईच्या दुधाची सर इतर कोणाच्याही दुधाला किंवा इतर कोणत्याही पदार्थाला येणार नाहीं. ती जर रोगी व

अशक्त असेल, तर मात्र तिचें दूध मुलाच्या पोटांत न जावें हें बरें. अशा अडचणीचे प्रसंगीं काय करावें तें पुढें सांगितलें आहे.

आपल्या लोकांतील कित्येक बायकांना अशी संवयच पडून गेलेली असते कीं, मूल जरासें रडूं लागलें कीं त्याला प्यावयास द्यावयाचें. पण असें करणें मोठी चूक आहे. मूल नेहमीं किंवा कधीं कधीं जें रडतें तें दूध पिण्यासाठींच रडत असतें असें नाहीं. कधीं कधीं त्याला अजीर्ण झाल्यामुळें पोट फुगून देखील तें रडतें. अशा प्रसंगीं देखील त्यास दूध पाजणें ही केवढी तरी चूक आहे, पण ती पुष्कळ आयांच्या लक्षांत येत नाहीं. त्या मुलाला दूध पाजून गप्प करण्याचा प्रयत्न करतात तो फार चुकीचा असतो. अशा प्रसंगीं मुलाच्या पोटांत जास्त दूध गेल्यानें त्याची प्रकृती जास्तच बिघडते. यासाठीं नियमित वेळांपेक्षा जास्त वेळां दूध पाजणें तें फार काळजीपूर्वक, मुलाची प्रकृती पाहून, मग अत्यावश्य वाटलें तरच पाजावें. बहुधा असा नियमच ठेवावा कीं, ठरलेल्या वेळांखेरीज दूध पाजावयाचेंच नाहीं. मुलांना दूध किती किती वेळानें पाजावें याविषयीं खालील नियम ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत:—

| | |
|---|---|
| मूल उपजल्यापासून तें तीन महिन्यांचें होईपावेतों. | दिवसा दर दोन तासांनीं व रात्रीं दर तीन तासांनीं एकवार असें दूध पाजावें अशा रीतीनें दूध पाजलें तर पहिल्या महिन्यांत सरासरीच्या प्रमाणानें रोज अर्धा शेर, दुसऱ्या महिन्यांत रोज २॥ पाव व तिसऱ्या महिन्यांत ३ पाव किंवा पाऊण शेर दूध जातें व तेवढे मुलांना बस असतें, असें डॉक्टर लोकांचें मत आहे. |

पुढील सहा किंवा आठ महिन्यांत दूध किती व कसें द्यावें त्याचें प्रमाण.

दिवसा दर तीन तासांनीं एक वार व रात्रीं दर चार तासांनीं एक वार असें कांहीं दिवस करून तासांचें अंतर हळूं हळूं वाढवीत जावें. दिवसरात्र मिळून मुलाच्या पोटांत पाऊण शेरापासून दीड शेरापर्यंत दूध जावें ह्मणजे पुरें होईल.

कित्येक वेळां असें होतें कीं, आईचें दूध मुलाला पुरेसें मिळेनासें होतें किंवा मुळींच मिळत नाहीं असेंही होतें. अशा प्रसगीं नाइलाजास्तव गाईचें दूध मुलांना घालणें भागच पडतें. हें दूध इतर कोणत्याहि दूधापेक्षां उत्तम आहे खरें; पण आईच्या दुधाची सर या दुधाला मुळींच यावयाची नाहीं.

गाईचें दूध घालण्याचा प्रसंग आलाच तर तें नुसतें कधींही घालूं नये. ज्या मुलाला तें घालावयाचें आहे तें मूल जर एक महिन्यापेक्षां कमी वयाचें असेल, तर दोन भाग पाणी व एक भाग गाईचें दूध मिसळून तें मुलाला पाजावें. असें केल्यानें तें दूध सत्वहीन होतें हें खरें, पण तसें जर केलें नाहीं तर तें नुसतें कधींही चांगल्या रीतीनें पचत नाहीं; ह्मणून असें करणें भागच आहे. अंगावरील दुधांत जे तीन मुख्य धर्म अंगभूत असतात ते या दूधांतून नाहींसे होतात. ते धर्म ह्मटले म्हणजे.

( १ ) नायट्रोजन उत्पन्न करणारे गुण.

( २ ) चर्बी किंवा साय उत्पन्न करणारा गुण.

( ३ ) साखर उत्पन्न करणारा गुण.

हे तिन्ही अवश्य धर्म राखण्यासाठीं पाणी कमी प्रमाणानें घालावें तर तें दूध मुलास मानवत नाहीं. निम्में दूध आणि निम्मे पाणी

असें जरी प्रमाण घेतलें तरी अंगावरील दुधाची सर त्याला यावयाची नाहीं. दोन भाग दूध व एकच भाग पाणी घेतलें तर मात्र वरील तिन्ही गुण नष्ट न होतां तें मुलांच्या उपयोगीं पडेल. पण त्या स्थितींत तें मुलांस चांगल्या रीतीनें पचत नाहीं; म्हणून प्रथम सांगितलेलें प्रमाणच कायम ठेऊन, हे तिन्ही गुण कृतीनें उत्पन्न करण्यासाठीं त्या दुधांत थोडीशी साखर घालावी व थोडीशी सायही टाकावी, म्हणजे तें सर्वांशीं नाहीं तरी, कांहीं अंशीं तरी, आईच्या दुधाचें काम करील यांत शंका नाहीं.

ही कृति करण्याचें कारण असें आहे कीं, आईच्या दुधांत जे नायट्रोजन उत्पन्न करणारे पदार्थ असतात ते जितक्या लवकर पचतात तितक्याच लवकर गाईच्या दुधांतील ते पदार्थ पचत नाहींत. दूध पोटांत गेल्याबरोबर तें नासूं लागतें व त्याच्या लहान लहान गोळ्या बनूं लागतात; व त्या गोळ्यांवर पित्तांशाचा परिणाम होऊन दुधाची पचनक्रिया सुरू होते. ह्या गोळ्या जर लहान लहान असतील, तर त्या लवकर पचतात व मोठ्या असल्या तर तितक्या लौकर पचत नाहींत. अशा प्रकारच्या गोळ्या, गाईच्या दुधाच्या मोठमोठ्या बनतात, व आईच्या दुधाच्या लहान व मृदु अशा बनतात. म्हणून गाईच्या दुधापेक्षां आईचें दूध मुलाला पचावयास सोपें पडतें. व यासाठींच तें जास्त हितावह होय. गाईचें दूध आणि पाणी यांचें मिश्रण करण्याचे जें प्रमाण वर सांगितलें आहे तेंहि वरील गोष्टी लक्षांत ठेवूनच सांगितलें आहे. मूल अगदींच लहान असतांनां त्याची पचनशक्ति सूक्ष्म असते, म्हणुन गाईच्या दुधांत जास्त पाणी घालून तें पचनाला योग्य असें करावयाचें, व मूल जसजसें मोठें होतें तसतशी त्याची पचनशक्ति वाढत जाते, म्हणून दुधांत पाणी कमी कमी घालून दूध जास्त पौष्टिक ठेवावयाचें, हेंच तत्व पाणी मिसळण्यांत

ठेविलें आहे असें सहज लक्षांत येईल. गाईचें दूध पाजण्याचा प्रसंग आल्यास पाणी मिसळल्याखेरीज तें कां पाजूं नये हें सांगितलें. त्याच-प्रमाणें त्या मिश्रणांत थोडीशी साखर आणि अगदीं निराळ्या दुधाव-रची साय, अशी प्रत्येक खेपेला घातल्याखेरीज तें मुलाला पाजतां कामा नये. कारण:—

( १ ) गाईच्या दुधांत पाणी मिसळलें ह्मणजे तें अगदींच निःसत्त्व होत असतें.

( २ ) दूध जर बाजारांतील घेतलें असलें तर त्यावरील सत्त्वांश म्हणजे सायही बहुधा पूर्वीच काढून घेतलेली असते.

( ३ ) निःसत्व अन्न घातल्यामुळें मुलांना—कित्येक मुलांना—वरील प्रकारानें तयार केलेलें गाईचें दूध देखील पचत नाहीं. अशी स्थिती असते त्यावेळीं दुधांत थोडीशी चुन्याची निवळी मिसळून तें मुलांस पाजावें, ह्मणजे पचण्यास जड जाणार नाहीं. नुसतें पाणी मिसळण्या ऐवजीं जवस भिजवून त्यांवरील पाणी दुधांत मिसळून तें मुलांस देणें फारच हितावह आहे. याचें कारण असें कीं, जवसाचें पाणी पौष्टिक असून शिवाय त्यांत असा एक गुण असतो कीं, त्याच्या योगानें मुलांच्या पोटांत दूध गेल्यावर ज्या गोळ्या बनतात त्या फार लहान लहान बनतात व त्या पचण्याला फार हलक्या असतात. जवसाचें पाणी आणि दूध हें मिश्रण पाजून पुष्कळ मुलें चांगल्या रीतीनें वाढतात व सशक्त होतात, असा पुष्कळांचा अनुभव आहे; पण आपल्या लोकांत अशा तऱ्हेनें दूध पाजण्याचा प्रघात नसल्या-मुळें, प्रथम प्रथम जुन्या पद्धतीच्या बायकांना ही पद्धत बिलकुल पसंत पडणार नाहीं, व त्या या गोष्टीबद्दल पुष्कळ अडचणी पुढें आणतील, हें अगदीं उघडच आहे. पण या अडथळ्यांना न भितां ही रीत सुरू करण्यास कोणतीही नड नाहीं, इतका खात्रीचा हा उपाय

आहे. आह्मी जें ह्मणतो तें खरें आहे की नाहीं, हें पहाण्याला दूर जाण्याचें कारण नाहीं. अशा रीतीनें तयार केलेलें दूध मुलाला पाजीत जावें व त्या मुलाचें वजन दर आठवड्यास एकवार करीत जावें, ह्मणजे सहज खात्री होईल. सदृढ प्रकृतीचें व उत्तम तऱ्हेनें सर्व प्रकारची ज्याची व्यवस्था आहे, असें मूल दर आठवड्यास पांच ते दहा तोळ्यांपर्यंत वजनानें वाढत असतें. तसें या मिश्रणानें वाढतें की नाहीं हें पहावें ह्मणजे खात्री होईल.

गाईचें दूध मुलांना पाजण्यापूर्वी तें चांगलें तापवावें. असें केल्यानें दोन फायदे होतातः—

( १ ) तापविलेलें दूध सहज पचतें.

( २ ) व कच्च्या दूधांतून रोग उत्पन्न करणारे जे वायु असतात किंवा दूध विकणारानें जें पाणी मिसळलें असतें, तें उष्णतेनें जळून जातें व दूध निरोगी होतें.

मुलांना दूध पाजण्याच्या बाटल्या स्वच्छ व कोरड्या न केल्यामुळें पुष्कळ तोटे होतात, ही कल्पना आमच्या लोकांतील सर्व बायकांच्या मनांत येत असेल की नसेल याची मोठी शंकाच आहे. दूध पाजण्याची बाटली प्रत्येक खेपेस दूध पाजून झाल्याबरोबर, ऊन पाणी व पापडखार घालून धुऊन कोरडी करावी व फिरून दूध पाजतेवेळीं दुसरी बाटली घेऊन तींतून दूध पाजावें. अशा रीतीनें प्रत्येक मुलासाठीं दोन दोन बाटल्या असल्या पाहिजेत. एकाच बाटलीचा वारंवार उपयोग केल्यानें, तिच्या आंतील ओलावा, अंबुस वास व दुधाचे अंश जे राहिलेले असतात त्यामुळें नवीन घातलेलें दूध नासून जातें, ह्मणून त्याच बाटलीचा उपयोग करूं नये हें चांगलें. मुलाला दूध पाजण्यासाठीं जी बाटली घ्यावयाची, ती लांबट व चपट्या आका-

लांबी असून तिला रबराचें एक बोंड लाविलेलें असतें, ती घ्यावी. बाटलीच्या तोंडाला रबरी लांब नळी लाविलेली असून, तिच्या शेवटास रबरी बोंड असतें, तसली बाटली कधींहि घेऊं नये.

**दुधाचे डबे**—कांहीं कृतीनें दूध घट्ट करून तें डब्यांत घालतात व त्या डब्यांत हवेचा बिलकुल प्रवेश होणार नाहीं, अशी तजवीज करून, दूध पुष्कळ महिने नासल्याशिवाय टिकेल, अशी व्यवस्था करितात. अशा दुधाला इंग्रजींत **कँडेन्स्ड मिल्क** म्हणजे घट्ट केलेलें दूध असें म्हणतात. हें दूध आणि गाईचें ताजें दूध यांची तुलना करूं गेल्यास, असें दिसून येतें कीं, दुधांत केसीन म्हणून जो एक घटकावयव असतो, तो दोहोंतहि सारख्याच प्रमाणानें असतो खरा, पण घट्ट केलेल्या दुधांतील तो घटकावयव पचनाला फार हलका असा असतो. गाईच्या दुधांतील केसीन लवकर पचत नाहीं, यामुळें घट्ट केलेलें दूध मुलांच्या प्रकृतीस मानवतें व तीं त्यामुळें अंग धरितात हें खरें आहे. हें दूध दिल्यानें मुलांना बाळसेंहि येतें; पण या दुधावर वाढलेलीं मुलें पायांत लटकीं असतात व अशक्त होऊन त्यांचें पोट मोठें होतें, हाताचीं मनगटें लठ्ठ होऊन मूल फिक्कें दिसूं लागतें; असा अनुभव आला आहे. आणखी एक दोष या दुधांत असतो तो हा कीं, त्यांत वाजवी पेक्षां जास्त साखरेचें प्रमाण असतें व सत्वांश जी साय ती कमी असते. यासाठीं होतांहोईल तों हें दूध मुलांना देऊं नये हें बरें.

**पेटंट मिळविलेले पदार्थ** आपल्या नजरेखालून रोज शेंकडों वेळां जातात. फावल्या वेळीं, करमणुकीकरितां म्हणून वाचण्यासाठीं, एखादें वर्तमानपत्र घ्या, कीं मासिक पुस्तक घ्या, किंवा एखादा गहन विषयावरील ग्रंथ घ्या, त्यांत मोहक शब्दांनीं वर्णन केलेल्या पदार्थांच्या जाहिराती या असावयाच्याच!! सर्वच जाहि-

राती मोहक असल्यामुळें, अमुक जिन्नस चांगला व अमुक वाईट, असें कळण्यास मार्गच नसतो. पण सर्वसाधारण असा अनुभव आहे कीं, अशा रीतींनीं प्रसिद्धीस आणलेलीं औषधें व इतर पदार्थ आपणांस वाटतात तितके गुणकारी नसून, त्यांत सत्याचा भाग बराच कमी असतो व गुणांचा अभाव जाहिरातींतील भपक्यानें भरून काढिलेला असतो; यासाठीं असले पदार्थ खरेदी करून, ते मुलांच्या अगर रोग्यांच्या पोटांत घालण्याच्या पूर्वीं, ज्या डॉक्टराला आपल्या मुलाची किंवा रोग्याची प्रकृति चांगली माहिती आहे, त्याला विचारावें व तो जर सांगेल तर पेटंट औषध यावें, हें बरें. 'मेलिन्स फुड' 'बेंजर्स फुड' वगैरे कृतीनें गुणकारी बनविलेलीं मुलांचीं किंवा रोग्यांचीं अन्नें प्रत्येकाला सारखींच हितावह होतात, असें नाहीं. विशेष प्रकारच्या प्रकृतीला तीं मानवतात, व कित्येकांनां त्यांपासून अपाय होतो, यासाठीं डॉक्टराला विचारल्याखेरीज, त्यांचा उपयोग करूं नये, हें चांगलें. आपली तारीफ आपणच करून, आत्मस्तुतीचे लेख लिहून, लोकांचें मन आपल्याकडे ओढून घेण्याचें व्यसन मूळ विलायती खरें, पण त्याचें अनुकरण आमचे कित्येक लोक इतके बेमालूम करूं लागले आहेत कीं, विलायती दुकानदार जास्त लबाड कीं आमचा हिंदी दुकानदार जास्त लबाड हें ठरविण्याचें काम पुष्कळ कठिण होत चाललें आहे. एवढेंच केवळ नव्हे, तर केव्हां केव्हां असें नजरेस पडतें कीं, आम्ही लोक या कामांत विलायती लोकांच्याहि पुढें जाऊं लागलों आहों. त्या व्यापाऱ्यांची निदान येवढी तरी सचोटी असते कीं, त्यांचेपाशीं असलेल्या पदार्थांची तरी ते तारीफ करून, तो खपविण्याचा प्रयत्न करितात. पण आमच्यांतील जाहिराती देणारे "जगप्रसिद्ध" वैद्य, त्यांच्याजवळ मुळीं नसणाऱ्या व त्यांना ज्याविषयीं कांहीं देखील माहिती नाहीं, अशा काल्पनिक वस्तूंची महति गाऊन देखील बिचाऱ्या भोळ्या गिऱ्हाईकांस लुब-

वितात !! म्हणजे उचल उचल या व्यापाराचें प्रमाण असें पडतें कीं, ते लोक "पराचा कावळा" करितात आणि आमचे कांहीं लोक शून्याचा डोंगर करून दाखवितात. "बालामृतें," "बालघटिका," "श्वासकुठार" "सहस्रपुटीअभ्रक" "रामबाण" "मृत्युंजय" "आतंकानिग्रह" वगैरेंची व रोगांची जंगी लढाई चालली होती तींत "शत्रु मागें हटले" असें आपण जरी वर्तमानपत्रांत वाचतों, तरी खऱ्या वैद्यांना व डॉक्टरांना अद्याप रोगांशीं मोठ्या निकरानें लढावें लागतें त्याचें कारण काय? आमचा तर समज असा आहे कीं, अशा धंद्यांत पडून पैसे कमाविणारे "जगप्रसिद्ध वैद्य" त्या शास्त्रांतील श्रीगला देखील अगदीं परके असे असतात व त्यांच्या डोक्यांत जो एकप्रकारचा धूर्तपणा असतो, त्याच्या जोरावर ते पैसे कमावितात. अशा लोकांपासून आपणांस अपाय न होण्याचा मार्ग म्हटला म्हणजे डॉक्टराच्या अगर खात्रीच्या वैद्याच्या सल्ल्याखेरीज, तीं औषधें घेण्याच्या भानगडींत न पडणें, हाच होय. लहान मुलांनां तर, असलीं औषधें कधींहि देऊं नयेत. लहान मुलांनां बाळपणीं जे रोग किंवा आजार होतात, त्यांपैकीं शेंकडा ९५ आजार वाईट अन्न अगर वाईट दूध वगैरे खाण्यास घातल्यापासून होतात. आमांश होणें हें दुखणें तर आपल्या मुलांना वारंवार होतच असतें व त्याचें कारण अजीर्णाखेरीज दुसरें कांहींच नाहीं. अजीर्णाची उत्पत्ति जास्त अन्न खाल्ल्यापासून तर होतेच, पण वाईट अन्नापासूनहि अजीर्ण होत असतें, हें लक्षांत ठेवावें. वाईट दूध मुलाच्या पोटांत गेल्यानें *स्कर्व्ही नांवाचा रोग होतो, यासाठीं मुलांनां नेहमीं ताजें व स्वच्छ दूध पाजावें.

---

* स्कर्व्ही म्हणून एक दांतांचा रोग होतो. त्यामुळें हिरड्या सुजतात व त्यांतून रक्त यावयास लागतें.

मूल नऊ महिन्यांचें झालें म्हणजे त्याला नुसत्या दुधावर ठेवूं नये. केव्हां केव्हां थोडेसें अन्न त्याच्या पोटांत जाईल, अशी व्यवस्था ठेवावी. नवव्या महिन्यांत दूध पिणें बंद करणें अशक्यच असेल तर, पुढील तीन महिने कांहीं वेळ दूध व कांहीं वेळ अन्न असा क्रम ठेवावा.

**लहान मुलांचे दांतः**—आपल्या लोकांत मुलांच्या दांतांविषयीं मुळींच काळजी घेत नाहींत, ही गोष्ट फार वाईट आहे. पुष्कळ बायकांची आणि पुरुषांचीहि अशी समजूत असते कीं, लहान मुलांनां प्रथम जे दांत येतात, त्यांची काळजी घेण्याचें कांहीं कारणच नाहीं; कारण ते लवकरच पडून जावयाचे असतात, व त्यांचे जागीं दुसरे कायमचे दांत यावयाचे असतात; तेव्हां पडून जाणाऱ्या दातांची काळजी कां घ्या? पण ही मोठी चूक होत आहे. पडून जाणाऱ्या दांतांत जी कीड किंवा जो रोग उत्पन्न होतो, तो दातांच्या मुळाशीं जाऊन पोंचला म्हणजे तोच फिरून नवीन दांतांतहि उत्पन्न होतो व यामुळें ज्या मुलांच्या दातांची काळजी लहानपणीं घेतली नाहीं, त्या मुलांचे दांत जन्मभर रोगी व किडलेले असे राहतात. लहानपणीं दातांची काळजी न घेतल्यानें आणखी असें एक नुकसान होतें कीं, मुलांना अन्न चांगलें चावतां येत नाहीं व तें अर्धवट चावलेलें अन्न पोटांत गेलें म्हणजे पचनाची क्रिया नीट न होऊन, त्याचें रक्त बनत नाहीं व यामुळें मुलें अशक्त व रोगी होतात. यासाठीं प्रथमपासूनच आईबापांनीं मुलांच्या दांतांबद्दल काळजी घेतली पाहिजे.





# भाग एकेचाळिसावा.

## आजारी मनुष्याची शुश्रुषा.



या पुस्तकांत आतांपर्यंत ज्या गोष्टी सांगितल्या, त्याप्रमाणें वागणाऱ्या मनुष्यापासून आजाराचें बिऱ्हाड बरोबर फार दूर राहील. हें जरी खरें आहे, तरी सृष्टिक्रमाप्रमाणें अशक्तपणा व आजार या गोष्टी मनुष्याच्या पाठीमागें केव्हां ना केव्हां तरी लागावयाच्याच. यासाठीं तसा प्रसंग आला असतां कसें वागावें, याविषयीं दोन शब्द लिहिणें अप्रासंगिक होणार नाहीं.

मुलांची किंवा आजाऱ्याची शुश्रुषा करण्यासाठीं विशेष प्रकारचें शिक्षण मिळविलेलीं माणसें लागतात; पण अशीं माणसें प्रत्येक कुटुंबांत ठेवून घेणें अशक्य आहे. तसेंच ऐपतवान् जे लोक असतात, त्यांच्या घरीं अशा कामासाठीं शिकवून तयार केलेल्या बायका ठेविलेल्या असतातच. बाकीच्या कुटुंबांत हीं कामें घरांतील बायकांनांच करावीं लागतात व अशा बायकांनीं खालील गोष्टी वाचल्यापासून पुष्कळ फायदा होईल, यांत कांहीं शंका नाहीं.

**हा धंदा शिकणारीं माणसें**:—आजाऱ्याची शुश्रुषा करण्याच्या कामगिरीवर बायकांचीच योजना करण्याचा परिपाठ सुधारलेल्या देशांत आहे व अलीकडे ती पद्धत आपल्या लोकांतहि सुरु

होत चालली आहे. अशा बायकांना इंग्रजींत "नर्स" असें म्हणतात. नर्स शब्दाचा अर्थ दाई असा करितात, पण दाईची कामें आणि नर्सची कामें, या दोहोंत फार फरक आहे. नर्स हा शब्द उच्चारल्याबरोबर जी कल्पना मनांत येते, ती दाई शब्दानें येत नाहीं. दाईचा उपयोग लहान मुलांना पाजणें, खेळवणें, त्यांच्याबरोबर हिंडणें वगैरे कामांकडे होतो. हीं तरी कामें दाईकडे नवीनच आलेलीं आहेत. त्यांचें पूर्वींचें मूळ काम म्हटलें म्हणजे मूल संभाळणें येवढेंच आहे. नर्सकडे जीं कामें असतात तीं या पेक्षां वरिष्ट दर्जाची असून तीं उत्तम प्रकारें करण्यास त्यांना एक प्रकारचें शिक्षण लागतें. तें शिक्षण देण्यासाठीं अलीकडे शाळांची व्यवस्था झालेली आहे व त्यांत शिकून थोड्या बहुत बायका हें काम करण्याजोग्या तयारहि होत आहेत. पण ज्या बायका तयार होतात, त्या सर्वच कुलशीलानें चांगल्या असत नाहींत, म्हणून या अत्यंत उपयुक्त संस्थेबद्दल जितका आदर लोकांच्या मनांत असावयास पाहिजे, तितका असत नाहीं, व अशा संस्थांपासून फायदा व्हावा तसा होत नाहीं. ज्या बायकांना आगा ना पिच्छा, अशा संशयी जातींच्या बायका किंवा उत्तम कुलांत जन्म घेऊनहि ज्यांचें पाऊल अविचारानें वांकडें पडलेलें असतें, अशा बायका नर्सच्या वर्गांत शिकून तयार होतात व त्याच पुढें तो धंदा संभाळून इतरहि कांहीं बऱ्या वाईट गोष्टी करितात. यामुळें त्यांविषयींची पूज्यबुद्धि नाहींशी होते व त्यांच्या ज्ञानाचा फायदा सर्वत्रांना होत नाहीं. ही गैरसोय नाहींशी होण्याला एकच मार्ग आहे, व तो हा कीं, जातिवंत व संभावित कुळांतील बायकांनीं हें काम करण्याचें मनावर घेतल्यास, समाजाला व त्यांनाहि मोठा फायदा होईल, यांत कांहीं शंका नाहीं.

**नर्स कशी असली पाहिजे?** रोग्याची शुश्रुषा करणें, ही एक विद्याच आहे व ती गुरुपासून शिकणें अत्यंत अवश्यक आहे.

आजारी मनुष्याची शुश्रूषा करण्याच्या कामीं ममताळुपणा आणि कठिण अंतःकरण या दोहोंचाहि बारखाच उपयोग होतो; म्हणून ज्यांच्या आंगीं या दोन्ही विरुद्ध गोष्टी एकसमयावच्छेदें करून वसत नाहींत, त्यांना या धंद्यांत यश यावयाचें नाहीं. आई, बायको, बहीण वगैरेच्या आंगीं नुसता ममताळुपणा असतो, रोग्याच्या वेदनांमुळें त्यांच्या अंतःकरणांत वेदना उत्पन्न होत असतात, व रोगी हाय हाय करावयास लागला म्हणजे त्यांच्या अंतःकरणांत हाय हाय होत असतें, अशा माणसांच्या हातून नर्सचीं कामें होणें, शक्यच नाहीं, तसेंच या माणसांच्या अंतःकरणांत जी ममता वास करीत असते ती जिच्या आंगीं नसेल, अशी नर्स—आपल्या कसबांत कितीहि निपुण असली तरी कुचकामाची होय. सारांश इतकाच कीं, आई किंवा बायको यांचे ठिकाणीं असणारें प्रेम व चांगल्या डाक्टराच्या आंगीं असणारें कौशल्य आणि प्रसंगविशेषीं लागणारा अंतःकरणाचा कठोरपणा, या तीन गोष्टी उत्तम नर्सच्या ठिकाणीं वास करीत असल्या पाहिजेत. रोग्याचें अंतःकरण उद्विग्न झालें असतें, त्याच्या पुढें एखादी "रोती सूरत" उभी केली तर त्याच्या दुःखांत भर पडणार हें उघडच आहे. यासाठीं नर्सच्या कपाळाला आठी आणि तोंडाला मिठी, असा प्रकार असूं नये. उल्हासवृत्ति, आनंदी चेहरा आणि हंसतमुख असणें हे तीन गुण कमी महत्त्वाचे आहेत असें नाहीं. नुसत्या या तीनच गोष्टींनीं रोगी बरा होणार नाहीं, हें खरें, पण या गोष्टींमुळें त्याच्या बरें होण्याला मदत होईल, यांत कांहीं शंका नाहीं. हे तीन गुण वाजवीपेक्षां फाजील असल्यापासूनहि तोटाच आहे. "अति सर्वत्र वर्जयेत्" असें म्हणतात, तें या गोष्टीला लागू आहेच. रोग्याची शुश्रूषा करणाऱ्या नर्सनें, तुम्हांला अमुक हवें कां? अमुक आवडतें कां? अमुक खाल्लें तर तुमच्या तोंडाला चव येईल कां? वगैरे प्रश्न कधींहि करूं नयेत. आमच्या लोकांस

अशी चाल आहे कीं, घरांत एखादा मनुष्य अजारी असला म्हणजे, वरील प्रकारचे प्रश्न करून करून घरचीं बायकामनुष्यें अजाऱ्याला दमवून सोडितात. हा प्रकार बरा नव्हे. असें न करतां रोग्याला खावयास घालण्या जोगे जे जे पदार्थ आपणांस अनुकूल असतील, ते तयार करून, ते व्यवस्थित रीतीनें त्याच्या नजरेपुढें आणावे, व मग त्याला पसंत असेल तो, तो खाईल व बाकीचे टाकून देईल. यावरून त्याची इच्छा काय आहे, त्याला कोणत्या प्रकारचे पदार्थ पसंत पडतात वगैरे सहज कळून येईल. पुष्कळ डॉक्टर लोकांचा असा अनुभव आहे कीं, जे आजारी लोक अन्नद्वेषानें अगदीं थकत चालले असतात, ते देखील या सुलभ उपायानें थोडथोडें खाऊं लागून, चांगले बरे झालेले आहेत.

रोग्याला औषध देणाऱ्या डाक्टरानें अगर वैद्यानें जसें सांगितलें असेल, त्या प्रमाणें वागणें हें अत्यंत अवश्यक आहे. "आपण म्हणतां तसें न करतां, असें केलें तर काय होईल" वगैरे प्रश्न डॉक्टराला अगर वैद्याला करणें, हें नर्सच्या कर्तव्याच्या बाहेरील काम आहे व तें तिनें कधींहि करूं नये. कित्येक बायांना अशी खोडच असते कीं, आपण काय बोलतों, व त्याचा परिणाम काय होईल याचा विचार न करतां, डॉक्टर निघून गेल्यावर, त्या त्याचे विरुद्ध कांहीं कांहीं गोष्टी उगीच बोलत असतात व आपण डॉक्टर पेक्षां जास्त विद्वान् आहों, असें घरच्या मंडळीस व आजारी माणसास दाखविण्याचा प्रयत्न करीत असतात, पण या पासून फार मोठें नुकसान होतें. एक तर डॉक्टर हा मनुष्य, नर्सपेक्षां जास्त शिकलेला व अनुभवि असून, त्याच्यावर रोग्याला बरें करण्याची जबाबदारी फारच असते, व ती मनांत ठेवून, तो सर्व प्रकारचे उपाय करितो व पथ्यपाणी अमुक प्रकारचें पाहिजे, असें सांगून ठेवितो. त्यानें सांगितलेल्या व्यवस्थेंत ढवळाढवळ

केल्यापासून जे अपाय होतात, त्याचे परिणाम रोग्याला प्रत्यक्ष रीतीनें व डॉक्टराला अप्रत्यक्ष रीतीनें भोगावे लागतात. नर्स ही नेहमीं जागा निराळी राहून लहानशा चुकीमुळें मोठे अनर्थ करीत असते; या कामीं वर सांगितलेला दोष कोणत्याहि नर्सच्या आंगीं असतां उपयोगी नाहीं.

एखाद्या रोग्याचें दुखणें जर कठीण आहे, असें दिसत असलें तर, नर्सनें फारच खबरदारी व सावधगिरी ठेविली पाहिजे. अगदीं क्षुल्लक गोष्टी देखील, व्यवस्थित रीतीनें टिपून ठेवून, डॉक्टर आल्यावर, त्या त्यास दाखविल्या पाहिजेत. मनुष्य आजारी असतांना त्याच्या प्रकृतींत व स्थितींत वारंवार होणारे फरक लिहून ठेविल्याच्या योगानें, डॉक्टराच्या डोळ्यांपुढें प्रत्यक्ष आजाराचें चित्र उभें रहातें व त्या प्रमाणें तो उपचार सुरू करितो. रोग्याविषयीं काळजी उत्पन्न करण्या जोगी एखादी गोष्ट जर डॉक्टरानें नर्सला सांगितली तर ती तिनें कधींहि बाहेर फुटूं देतां कामा नये, येवढेंच नव्हे, तर ती कळल्यामुळें आपल्या चर्येत कांहीं बदल झाला आहे, असें देखील दाखवितां कामा नये. रोग्याची नजर नेहमीं डॉक्टर व नर्स यांच्या चेहऱ्या कडे फार चाणाक्ष पणानें लागलेली असते व त्यांच्या चर्येत जर कां दुःखाची नुसती झुळूक दिसली तरी त्याची प्रकृति एकदम ढासळून पडते, अशीं उदाहरणें कैक दाखवितां येतील. रोगी आणि नर्स हीं दोघेजण एकेठिकाणीं असलीं म्हणजे त्यांचें बोलणें सहजगत्याच होत असतें; त्या भाषणांत नर्सनें इतर रोग्यांच्या गोष्टी व आपण त्यांनां बरे करण्या साठीं केलेल्या गोष्टींचें वर्णन करीत बसूं नये. रोग्याचें मन, दुखणें खेरीज करून, इतर कांहीं चांगल्या विषया कडे लागेल अशा प्रकारच्या गोष्टी बोलून त्याच्या मनाला आनंद देणें, हें देखील नर्सच्या कर्तव्यां पैकींच एक होय.

आतां वेळ पावेतों नर्सनें रोग्याच्या संबंधानें काय केलें पाहिजे, तें

सांगितलें, पण तिनें स्वतः संबंधीहि कांहीं कांहीं नियम अवश्य पाळले पाहिजेत, ते जर न पाळले तर, ती आपल्या प्राणावर देखील एखादे वेळीं, संकट ओढवून घेईल, व ज्याची नोकरी बजावण्यासाठीं ती राहिली असेल त्याचेही प्राण ती धोक्यांत घालण्यास चुकणार नाहीं. नियमित आणि पुरेशी झोंप तिनें अवश्य घेतलीच पाहिजे; व त्याप्रमाणेंच योग्य व पुरेसा व्यायाम तिनें केला पाहिजे. तिनें नेहमीं अजाऱ्याच्या खोलींतच रहातां कामा नये. तेथें नियमित तास काम केल्यावर, तिनें मोकळ्या हवेंत फिरावयास जावें. रोग्याच्या खोलींत पुष्कळ वेळ राहिल्यामुळें, तेथील दोषी वायु तिच्या पोटांत शिरून जे वाईट परिणाम करतात, ते टाळण्यासाठीं तिनें स्वच्छ हवेंत फिरावयास जाणें हें अत्यंत अवश्यकच आहे. तिनें आपले कपडे नियमितवेळीं वारंवार बदलले पाहिजेत, तेच ते कपडे अंगावर ठेविल्यानें रोगाच्या बीजाचें पोषण होत जातें. स्वतःची जेवणाची वेळ तिनें टाळतां कामा नये. कित्येकांनां अशी खोड असते कीं, रोग्याची शुश्रुषा चालली असतांच, एकीएडे भोजनाचें काम उरकून घ्यावयाचें, पण हें बरें नव्हे. नर्सच्या प्रकृतीवर पुष्कळ अंशीं रोग्याची प्रकृति अवलंबून रहाते, असें म्हणणें अतिशयोक्तीचें नाहीं, यासाठीं तिनें आपलें जेवणखाण, स्नान, कपडे बदलणें, फिरावयास जाणें वगैरे विधि वेळचेवेळीं नियमित रीतीनें केलेच पाहिजेत. कांदे, लसूण वगैरे पदार्थ तिनें खाऊं नयेत. कारण हे पदार्थ खाल्या नंतर तोंडाला जी एक प्रकारची घाण येत असते, ती एखाद्या रोग्याला मुळींच सोसत नाहीं; व केव्हां केव्हां या वासामुळें त्याला वांतीहि होते, यासाठी असले पदार्थ न खाणें बरें.

---



# भाग बेचाळिसावा.

## आजाऱ्याच्या खोलीची व्यवस्था



आजाऱ्याच्या खोलींतील इतर व्यवस्था आजारी माणसाला हवा लागतां कामां नये, हें तत्व आमच्या लोकांत व विशेषतः बायकांत फारच आढळून येतें. एखादेवेळीं अजाऱ्याला पडसें आलें तर, तें खोलींतील खिडक्या उघड्या टाकल्यामुळें आलें, असें पुष्कळांनां वाटतें व लगेच खोलींतील सर्व खिडक्या बंद करण्याविषयीं हुकूम सुटतात. परंतु खरा प्रकार असा नाहीं. रोग्याच्या खोलींत अवश्य मोकळी हवा खेळलीच पाहिजे, नाहींतर त्याची प्रकृति बिघडते व त्याच्या जिवावरहि प्रसंग येतो, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. आजाऱ्याच्या खोलींत, दूषित वायु वारंवार व पुष्कळ उत्पन्न होतात, ते बाहेर जाऊन, त्या ऐवजीं स्वच्छ हवा आंत आली नाहीं तर तेच दूषित वायु फिरून पोटांत जातात व प्रकृति सुधारण्याचे ऐवजीं ती अधीक बिघडते, हें उघडच आहे. आजारीमाणसाच्या खोलींतील खिडक्या उघड्या टाकावयाच्या त्यांतून हवेचा प्रवाह मनुष्याच्या आंगावर न येईल, असा मात्र बंदोबस्त ठेविला पाहिजे. याकरितां उघड्या खिडक्यांना बारीक कापडाचे पडदे लावावे, म्हणजे हवेचा

प्रवाह आजाऱ्याच्या अंगावर यावयाचा नाहीं. खिडक्या उघड्या टाकून स्वच्छ हवा खोलींत येऊं दिल्यानें थंडी कधींहि होत नसते. बाहेरील हवेचा प्रवाह अंगावर घेतल्यानें मात्र थंडीपासून प्रकृति बिघडते, हें खरें आहे. खोलींतील खिडक्या कांहींवेळ उघड्या टाकणें व बाकी बंद करून ठेवणें, हें देखील प्रशस्त नाहीं. खिडक्या सर्व वेळ उघड्या ठेविल्या पाहिजेत. खिडक्या उघड्या टाकल्याच्या योगानें बाहेरील हवेबरोबर जी थंडी आंत शिरते, ती मात्र अपाय-कारक असते, व ती बंद करण्यासाठीं ऊबदार कपडे, ऊन पाण्याच्या बाटल्या, हातमोजे, पायमोजे, रग वगैरे साधनांचा उपयोग योग्य रीतीनें करावा हें चांगलें. खोलींत ऊब जी आणावयाची ती या साधनांनीं आणावी; खिडक्या बंद करून व हवा कोंडून आणूं नये.

आजारी माणसाच्या खोलींत कोणताही प्रकारची अडगळ अगर जरूर नसेल तें सामान ठेवूं नये. ओले कपडे वाळत घालणें, त्याच खोलींत चूल पेटवून पथ्याचे जिन्नस तयार करणें, किंवा केलेले असतील ते पुढील उपयोगासाठीं त्याच खोलींत ठेवणें हें अत्यंत अहित-कारक आहे.

**नर्सचा पोषाक**—नर्सच्या पोषाकांत ऐट असता कामा नये. नीटनेटकेपणा व स्वच्छता या गोष्टींकडे मात्र विशेष लक्ष दिलेलें असावें. पोषाक केल्यावर इकडे तिकडे हिंडतांना तो खडखड वाजला पाहिजे अशी जी कित्येक बायकांना किंवा पुरुषांना हौस असते, तशी नर्सला मुळींच असतां उपयोगी नाहीं. त्या कडकडीत पोषाकाच्या आवाजानें देखील रोग्याचें मन बेचैन होण्याचा संभव असतो. तिनें अंगाबरोबर एखादा कोंकरीचा कपडा घालावा हें

र्थी. तिचे हात विशेषतः फारच स्वच्छ असले पाहिजेत. जखमा धुणें, पट्टी बांधणें व मलमूत्राची व्यवस्था करणें, हे सर्वांहि कामें वारंवार करावयाचेच. अशावेळीं हात स्वच्छ धुतल्याखेरीज इतर कोणत्याहि कामाला लागूं नये.

**इतर किरकोळ गोष्टी**—वरील गोष्टी चांगल्या प्रकारानें करून, त्याखेरीज जर नर्सला साधारण वैद्यकीचें ज्ञान असेल, तर तिच्या-सारखी बहुमोल वस्तूच नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. पण अशा दोहीं तऱ्हेनें उत्तम अशा बायका क्वचितच आढळण्यांत येतात. अशक्ताचा बिछाना उत्तम घालणें, कांहीं वेळतरी उपयोगी पडतील अशा रीतीनें जरूरीचे कपडे धुणें, जखमा धुणें, मलमपट्या लावणें, औषधें देणें वगैरे गोष्टींत तर ती फारच दक्ष असली पाहिजे.

**रोग्याशीं नर्सचें वर्तन**—अत्यंत प्रेम करणारी आई, खरोखर कुशल व कर्तव्यदक्ष वैद्य आणि दूरदर्शी बाप या तिघांच्या अंगीं जे गुण असतात, ते नर्सच्या अंगीं, रोग्यासंबंधानें असले पाहिजेत. त्याच्याशीं बोलणें, त्याचा मनोभंग न होतां, त्यानें नर्सच्या सांगण्या-प्रमाणें वागणें आणि नर्स सांगत आहे, तें केवळ आपल्या हितासाठींच आहे, अशी रोग्याची दृढ कल्पना होणें, हें वास्तविक नर्सच्या मनावर व कृतीवर अवलंबून असतें. नर्सचें दर्शन हें कंटाळवाणें नसून ती आपला रोग खास बरा करील, अशी रोग्याची कल्पना होऊन बस-ण्याजोगी जर खरोखर नर्सची कृति असेल तर वैद्याच्या औषधापेक्षांहि या नुसत्या कल्पनेनें, जास्त गुण येत जातो, देखील असा अनुभव पुष्कळांचा आहे. रोग्याला एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं उच-लून ठेवणें हें काम अत्यंत कुशलतेचें आहे. रोग्याच्या शरीराचें हाल न होतां त्याला उचलून ठेविलें पाहिजे. तें कसें करतां येईल

हें समजण्यासाठीं खालीं एक चित्र दिलें आहे, त्यावरून रोग्याला एका अंथरुणावरून दुसऱ्या अंथरुणावर कसें ठेवावें, हें चांगलें लक्षांत येईल.



---



# भाग त्रेचाळिसावा.

## चहा कॉफी आणि कोको.



इंग्रजी राज्याच्या लोटाबरोबर जीं पांच सहा व्यसनें आह्मांत शिरलीं, त्यांतीलच चहा कॉफीचें व्यसन आहे खरें, पण इतर व्यसनांत आणि या व्यसनांत इतकाच फरक आहे कीं, इतर व्यसनें पूर्वी कोणत्या तरी प्रकारानीं आह्मांस माहीत तरी होतीं; ह्मणजे त्यांचा प्रचार थोड्या बहुत प्रमाणानें तरी आह्मांत होता, त्यांत इंग्रजी ज्ञानानें सुधारणा होऊन त्या व्यसनांची आतां रूपांतरें होत चालली आहेत. तसा प्रकार चहा कॉफीचा नसून, हे जिन्नस पूर्वी आह्मांस माहीत देखील नव्हते, ह्मटलें तरी चालेल. इंग्लंडानें आह्मांस ज्या कांहीं बऱ्या वाईट देणग्या दिल्या आहेत, त्या सर्वच त्यांच्या देशांतील मूळच्या नाहींत. त्यांनीं ज्या गोष्टी परकीयांपासून उचलल्या आहेत, त्यांतीलच चहा कॉफीची गोष्ट आहे. चहा पिण्याची खोड त्यांना चीन देशानें लाविली व कॉफी पिण्याची संवय त्यांनीं अरबलोकांपासून उचलली आहे व नंतर ती इंग्रजांपासून आह्मीं घेतली. चहा, कॉफी आणि कोको, हे जिन्नस अगदीं अवश्यक पैकीं नसून, ते पिणें ही एक केवळ चैन आहे, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. या पदार्थांच्या अंगीं जे दुर्गुण आहेत, त्यां विषयीं

विचार केला तर देखील त्यांचे वर जे नंबर लाविले आहेत त्याच मानानें ते घातक आहेत, असें ह्मणण्यास कांहीं नको नाहीं. अपाय करण्याचें कामांत चहाचा नंबर पहिला. कॉफीचा दुसरा आणि कोकोचा तिसरा आहे. हे पदार्थ घेणें चांगलें नाहीं, असें पुष्कळ अनुभवि लोकांचें ह्मणणें आहे, पण असा उपदेश आज कित्येक वर्षें चालला असतांहि दिवसानुदिवस त्यांचा खप हिंदुस्थानांत वाढत्या प्रमाणावरच आहे, यावरून त्या उपदेशापासून कांहीं उपयोग झाला नाहीं, असें ह्मणावें लागतें. आतां लोक तर ऐकत नाहींतच तेव्हां ते जें करीत आहेत, तेंच उत्तमांत उत्तम कसें करावें, हें सांगणेंच शिल्लक राहिलें आहे व तें शिल्लक राहिलेलें काम संपविण्याचा उद्देश या भागांत आहे.

चहा—योग्य तऱ्हेनें चहा घेतल्याच्या योगानें कांहीं थोडासा फायदा होतो. पण आपल्या पैकीं बऱ्याच कुटुंबांत तो योग्य तऱ्हेनें तयार करण्याची रीत माहीत नसते. चहा तयार करणें व काबेचिराइताचा किंवा तुळशीचा काढा तयार करणें, यांत कांहींच फरक नाहीं, असा पुष्कळ बायकांचा व पुरुषांचाहि समज झालेला दृष्टीस पडतो. पण या चुकीच्या समजुती मुळें फार नुकसान होत आहे. खाण्याचे आणि पिण्याचे असे जे कांहीं पदार्थ आहेत, त्यांत असे कांहीं आहेत कीं, ते शिळे किंवा निवालेले घेतले तरी चालतात व कांहीं असे असतात कीं, ते जेव्हांच्या तेव्हां ताजे करूनच घ्यावे लागतात. यांतील दुसऱ्या वर्गा पैकीं चहा हा जिन्नस आहे. चहा घेण्याची वेळ नियमित असली पाहिजे. अलीकडे आपल्या लोकां पैकीं कांहीं लोकांनां उठल्या बसल्या चहा घेण्याचें व्यसन जडत चाललें आहे व कित्येक ठिकाणीं तर पाहुणचाराच्या अनेक कर्तव्यांपैकीं चहा पिण्यास देणें, हें एक कर्तव्यच ठरून गेलें आहे, हें अगदीं अप्रशस्त आहे.

**चहा घेण्याची वेळ**–कोणत्याहि प्रकारचे श्रम केल्यावर, जो थकवा येतो, तो घालविण्यासाठीं चहा घ्यावा. सकाळीं उठल्या बरोबर चहा घेण्याची जी रीत आहे, ती चांगली नाहीं. कारण त्या वेळीं कोणत्याहि प्रकारचा थकवा आलेला नसतो. तिसऱ्या प्रहरीं, अगर मध्यंतरीं केव्हांहि श्रम करून थकवा आला तर, तो शीण घालविण्यासाठीं चहा घेतला तर तो हितावह होतो. रात्रीं चहा कधींहि घेऊं नये.

**चहा कसा तयार करावा?**–चहाच्या पानांवर अधणाचें पाणी ओतलें म्हणजे, चहाचे मुख्य तीन जे घटकावय ते पृथक् होऊन पाण्यांत मिसळतात. ते घटकावय खालीं लिहिले आहेतः–

( १ ) उडून जाणारें तेल.

( २ ) थीन या नांवाचें एक द्रव्य.

( ३ ) टॅनिन.

यांपैकीं उडून जाणारें तेल हिरव्या चहांत जास्त असतें, व काळ्या चहांत कमी असतें. आणि हें जर जास्त प्रमाणानें पोटांत गेलें, तर डोकें दुखूं लागतें आणि झोंप नाहींशी होते. थीन या नांवाचा पदार्थ असतो, तो श्रमपरिहारक आहे. याचे अंगीं क्विनाइनचे कांहीं गुण आहेत. चांगल्या चहांत हें क्विनाइनचें प्रमाण शेंकडा ३ ते ४ पावेतों असतें. टॅनिनचें प्रमाण शेंकडा १५ पासून २० पावेतों असतें. व तो सर्व अंश पाण्याच्या उष्णतेनें निघून येतो. चहांत जो अपायकारक घटकावय आहे, तो हाच होय व म्हणूनच चहा फार घेऊं नये असें चांगल्या डॉक्टरांचें मत आहे. हें द्रव्य पोटांत गेल्यानें पचन क्रिया मंदावते.

चहा करण्याची कृति. आमच्या पैकीं पुष्कळ लोकांना माहीत

नसते. चहा ह्मणजे दूध साखर आणि कसा तरी बनविलेला चहाच्या पानांचा काढा, यांचें मिश्रण करून पिणें, हें बरें नव्हे. चहा आधणाचे पाण्यांत कधींहि शिजवूं नये. आधणाचें उत्तम पाणी तयार ठेवावें. ज्या भांड्यांत चहा तयार करावयाचा असेल, तें चिनी मातीचें असून, त्याला घट्ट झांकण घालतां येईल, असें असावें. हें मांडें प्रथम थोडेंसें गरम करावें. मग त्यांत चहाचीं पानें किंवा पूड, जें कांहीं असेल तें घालावें व त्यावर आधणाचें पाणी ओतून तें भांडें झांकून पांच मिनीटें ठेवावें. चांगल्या प्रकृतीच्या माणसाला चहा घ्यावयाचा असल्यास पांच मिनिटें ठेवावा, पण अशक्त प्रकृतीच्या मनुष्याला चहा देण्याचा असल्यास तीन मिनिटेंच ठेवावा हें बरें. परंतु चहा उत्तम प्रतीचा असला तर १० मिनिटें पावेतों ठेविला तरी हरकत नाहीं. मात्र वाईट प्रतीचा चहा ३ मिनिटांपेक्षां जास्त ठेवूं नये. आतां उत्तम चहा कोणता व वाईट कोणता हें येथें सांगणें कठिण आहे. पण व्यापारांतील फसवा फसव जमेस न धरली तर साधारणपणें असा नियम काढतां येतो कीं एक रुपयाला अगर त्या पेक्षां कमी किंमतीला अर्धा शेर दरानें मिळणारा चहा वाईट असतो व १ रुपया पुढें अच्छेराला किंमत पडते तो चहा चांगल्या वर्गांपैकीं असतो. हिंदुस्थानांत सर्वांत उत्तम चहा एका पौंडाला पांच रुपये या भावानें मिळतो. नंतर या काढ्यांत आपणांस लागेल तेवढें दूध व साखर घालून चहा घ्यावा. फार वेळ ठेवलेला चहा किंवा शिजविलेला चहा कधींहि घेऊं नये.

**कॉफी**–आपल्या लोकांत तुपावर परतून मग कॉफीच्या बियांची पूड करण्याची चाल आहे; पण हें करणें बरें नव्हे. एकदम त्या बिया पुष्कळशा कुटून ठेवणें हेंहि चांगलें नव्हे. जेव्हां लागेल तेव्हां आयत्या वेळीं त्या बिया घेऊन नुसत्या परताव्या व कुटून पूड तयार करावी. कॉफी घ्यावयाची असल्यास त्या पुडीवर आधणाचें पाणी

घालून ती झांकून ठेवावी व पांच मिनिटांनीं ती कॉफी तयार झाल्यावर त्यांत लागेल तितकें दूध व साखर घालून घ्यावी. चहा पेक्षां कॉफींत अन्नांश जास्त आहे.

**कोको**–हा बाजारांत मिळतो तो तयारच घेतला पाहिजे. त्याचीं फळें आपल्या इकडे तयार होत नाहींत. कोकोचे पुडींत दूध घालून त्याचा काढा करावा व त्यांत साखर घालून घ्यावा. चहा व कॉफी पेक्षांहि हा पदार्थ निरुपद्रवि असून खेरीज यांत पौष्टिक अंश बराच असतो; म्हणून शरीर प्रकृतीवर उत्तम परिणाम करण्याचें संबंधानें वर्गवारी लावावयाची असल्यास पहिली प्रत कोकोची दुसरी कॉफीची व तिसरी चहाची अशी लागेल.





# भाग चवेचाळीसावा.

## लहान मुलांचें अन्न.



आपल्या लोकांतील पुष्कळ पुरुषांना देखील, लहान मुलांची जोगवण, त्यांचें अन्न व त्यांचे कपडे या अत्यंत महत्वाच्या विषया विषयीं पाहिजे तितकी माहिती नसते, मग बायकांना अशी माहिती नसते यांत नवल तें काय? त्या तर बोलून चालून बायकाच!! या अज्ञानापासून व्यक्तिशः नुकसान तर होतच आहे, पण एकंदर राष्ट्राचें केवढे मोठे नुकसान होत आहे, याचा कधीं कोणी विचार केला आहे काय? मुलांच्या संगोपनाची शास्त्रीय पद्धत ज्यांच्या अंगीं खिळून गेली आहे, अशा लोकांचीं मुलें, कशीं सतेज, सुदृढ, उल्हासि आणि निरोगी दिसतात, हें आपणांस पुष्कळवेळां दिसून येतें व आपलीं मुलें तशीं नाहींत ह्मणून आपण लज्जेनें मान खालीं घालितों. आपलीं मुलें तशीं सतेज कां नसतात, असा प्रश्न कोणी केला तर आपणांतील कितीएकजण असें उत्तर देतात कीं, "अहो तीं साहेबांचीं मुलें, मांस खातात व दारू पितात ह्मणून लठ्ठ व गुलाबी रंगाचीं दिसतात, दुसरें काय आहे?" पण हें उत्तर मुळींच बरोबर नाहीं. त्यांचा सशक्तपणा व गालांवरील

गुलाबी, मांस खाण्यापासूनच केवळ येते, असें नाहीं. तसें असेल तर आपणांतील शूद्र लोकांचीं मुलें देखील तितकींच सतेज व सशक्त दिसलीं असतीं; तीं दिसत नाहींत, यावरून ते गुण केवळ मांस खाण्यापासूनच येतात, असें ह्मणतां येत नाहीं. मुलांच्या जोपासनेचें पूर्ण अज्ञान आमच्या बायकांना असतें, तें नाहींसें होण्यास जितके उपाय योजावे, तितके थोडेच आहेत.

या विषया संबंधानें सविस्तर नियम देण्याचें हें स्थल नव्हे. पण खालीं दिलेले ठोकळ नियम ध्यानांत ठेवून, त्याप्रमाणें मुलांच्या आईबापांनीं वागण्याचा निश्चय केला तरी देखील, पुष्कळ फायदा होईल, यांत कांहीं शंका नाहीं.

लहान मुलांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था, तें जन्माला आल्या-नंतर करण्याची आहे, त्या पूर्वी कांहीं देखील करण्याचें कारण नाहीं, असा जो आमच्या बायकांचा समज असतो, तो चुकीचा आहे, आईचे उदरांत गर्भधारणा झाल्यापासून तिच्याकडे खरें मातृत्व येतें व तेव्हांपासूनच तिनें आपल्या भावी बाळकाच्या खाण्यापिण्याची तरतूद ठेविली पाहिजे. गर्भाशयांतील मूल प्रत्यक्ष रीतीनें खात नाहीं, हें जरी खरे आहे, तरी त्याची आई जें जें खाते, त्यावरच त्याचें पोषण व त्याच्या शरिराची वाढ अवलंबून असते. ह्मणून गर्भारपणीं आईनें आपल्या खाण्यापिण्याविषयीं फारच काळजी घेतली पाहिजे. गर्भाशयांतील मूल सात महिन्यांचें झाल्यावर तर गरोदर बाईनें चांगलें पौष्टिक अन्न थोडें थोडें पुष्कळवेळां असें खालें पाहिजे. कारण तिचें स्वतःचें पोषण होऊन, खेरीज तिच्या पोटांतलि मुलाचेंहि पोषण व्हावें लागतें. तिनें आपला कोठा नेहमीं साफ ठेविला पाहिजे. अजीर्ण किंवा

मलावरोध केल्याच्या योगानें मुलाच्या वाढीला प्रत्यवाय होतो व त्याची शरीर प्रकृतीहि चांगली रहात नाहीं. झोंपेचें प्रमाण देखील वाढविलें पाहिजे. एरवींच्या स्थितींत आठ किंवा नऊ तास झोंप पुरी होते खरी; पण गरोदरपणाच्या स्थितींत निदान दहा तास तरी झोंप अवश्य घेतली पाहिजे व तीहि चांगली गाढ लागेल अशी तजवीज ठेवणें अवश्य आहे. रात्रीं फार वेळ जागत बसल्यापासून पिंडास इजा पोंचते. मानसिक श्रम मुळींच उपयोगी नाहींत. पण शक्य असेल तर शारिरिक व्यायाम घेतल्यापासून फार फायदा आहे. हा जो व्यायाम घ्यावयाचा, त्यांत थोड्या वेळांत शरीराला फार व्यायाम होईल अशा रीतीनें मेहनत करणें चांगलें नाहीं. साव-काश रीतीनें व्यायाम करून शरीराला मेहनत पडेल, असा व्यायाम घ्यावा. ओझीं उतरणें, जिन्यावर वारंवार चढ उतार करणें; पुष्क-ळशा प्रदक्षिणा घालणें, घाई घाईनें लांबवर पुष्कळ चालणें; असे व्यायाम करणें चांगलें नाहीं. सावकाश रीतीनें चालत जाणें, यापा-सून पुष्कळ हित होतें. शरीराचे सर्वच अवयव स्वच्छ राखिले पाहिजेत, परंतु त्यांतहि विशेषतः स्तन व ज्याच्या योगानें मुलें दूध पितात तो स्तनाचा भाग फारच स्वच्छ ठेविला पाहिजे. याचें कारण असें आहे कीं, त्या भागाला बारीक बारीक सुरकुत्या अस-ल्यामुळें त्यांत घाण सांठण्याचा विशेष संभव असतो. या करितां त्या भागाची काळजी विशेष घेतलीच पाहिजे. प्रसूती नंतर आई फार थकलेली असते व केव्हां केव्हां तर बेशुद्धहि असते; अशा स्थितींत तिच्याकडून मुलाला पाजविणें वाजवी नाहीं. ती हुषार झाल्या बरोबर मुलाला तिनें पाजावें. कितीएक बाय-कांची अशी चाल असते कीं मूल जन्मल्याबरोबर त्यास एरंडेल थोडेंसें पाजावयाचें; पण असें करण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण

एरंडेलाचा जो धर्म आहे, तोच हुबेहुब आईच्या अंगावरील पहिल्या दुधांतहि आहे. मुलांच्या कोठ्यांतील काळसर रंगाचा "सांठलेला" मळ काढून टाकणें हा धर्म एरंडेलाचा आहे व तोच पहिल्या दुधाचाहि पण आहे; तेव्हां हें परमेश्वरी कृतीचें रेचक सोडून कृत्रिम रेचक कां द्यावें, हें कळत नाहीं. प्रसूतीचा थकवा जाण्यास निदान तीन तास तरी वेळ लागतो. व तितका वेळ होऊन गेल्यावर मुलास पाजण्यास हरकत नाहीं. कृत्रिम रीतीनें बनविलेलीं मुलांचीं अन्नें व बाजारांतील इतर पदार्थ हे तर मुलांना या स्थितींत देऊंच नयेत.

पहिल्या आठवड्यांत मुलाला दूध पाजणें, तें एकेक तासाच्या अंतरानें पाजावें. मुल पाजण्यास कसें घ्यावें हें येथें लिहून दाखविण्यापेक्षां तें शिक्षण अनुभवानें लवकरच मिळतें, असें ह्मणणें जास्त शोभेल. मात्र मूल पाजतांनां एवढा एक नियम ध्यानांत ठेवावा कीं, पितां पितां मूल केव्हांहि झोंपी जाऊं देऊं नये; किंवा झोंपीं गेलेल्या मुलास कधींच पाजूं नये. मुलाला झोंप येत नसली आणि तें त्रास द्यावयास लागलें ह्मणजे त्याला पाजावयास घेऊन व त्याचें डोकें थापटून त्याला मुद्दाम झोंप आणावयाची, हा प्रकार अगदींच वाईट आहे. मुलाला अमुकच मिनिटें पाजावें, तितकीं मिनिटें भरल्याबरोबर त्याचें पिणें बंद करावें, असें लिहिणें अगदींच वेडेपणाचें आहे. मुख्य नियम हा लक्षांत ठेवावा कीं मुलाची तृप्ति होईपर्यंत त्यास पाजावें. अगदीं कमी वेळांत तृप्त होणाऱ्या मुलांस दहा मिनिटें पुरी होतात व फार वेळ पीत बसणाऱ्या मुलांस वीस मिनिटें बहुधा पुरीं होतात,

पहिल्या आठवड्यापासून नऊ महिने होईपावेतों मुलांला पाजण्याच्या वेळा कोणकोणत्या असाव्या हें समजण्यासाठीं खालील कोष्टक

तयार केलें आहे व त्याप्रमाणें वागलें असतां पुष्कळ फायदा होईल, यांत कांहीं शंका नाहीं.

| | | |
|---|---|---|
| १ ते ४ आठवडे | १ ते २ महिने | दोन महिन्यांपासून ९ महिने पावेतों |
| पहाटे पांच वाजता | पहाटे ५ वाजतां | पहाटे ५ वाजतां |
| सकाळीं ७ वाजता | सकाळीं ७–३० नीं | सकाळीं ८ वाजतां |
| ,, ९ ,, | ,, १० वाजतां | ,, ११ वाजतां |
| ,, ११ ,, | दुपारीं १२–३० नीं | दोन प्र. २ ,, |
| दोन प्र. १ वाजतां | तिसरे प्र. ३ वाजतां | सं. का. ५ ,, |
| तिसरे प्र ३ ,, | सं. का. ५–३० नीं | रात्रीं ८ ,, |
| संध्या का.५ ,, | रात्रीं ८ वाजतां | ,, ११ ,, |
| रात्रीं ७ ,, | ,, १०–३० नीं | |
| ,, ९ ,, | ,, ,, ,, | |
| ,, ११ ,, | | |

अशा प्रकारची कांहीं तरी नियमित व्यवस्था जर केली नाहीं, व वाटेल तेव्हां व वाटेल तितकें दूध मुलास पाजावयाचें, असा प्रकार सुरू ठेविला तर, मुलाला भूक केव्हां लागते तेंहि समजत नाहीं व त्याच्या पोटांत दूध किती गेलें आहे, हेंहि पण समजत नाहीं. या अनियमितपणामुळें दूध पचण्यास जो वेळ लागतो, त्यांतहि नियम रहात नाहींसा होऊन मुलाला अजीर्ण होतें, यासाठीं वरील नियमानें वागणे फार हितावह आहे.

आईची प्रकृति बिघडलेली असेल तर तिनें मुलाला पिण्यास देऊं नये, हें उत्तम कारण तिच्या अंगातील दुखणें दुधाच्या द्वारें मुलांच्या अंगीं जाऊन मुरतें व मूलहि अजारी पडतें. ज्या आईच्या अंगीं गरमी, परमा, क्षय, विषारी ताप वगैरे विकार जडलेले असतील, तिचें दूध तर मुलास अगदीं देतां कामा नये. हिस्टेरिया ( फेपरें ) येणाऱ्या आईनें देखील आपलीं मुलें अंगावर पाजूं नयेत. तसेंच स्तनांवरील बोंडांना जर कांहीं विकार झाला असेल, तरी देखील मूल पाजण्यास घेऊं नये.

**आईनें पाजणें केव्हां बंद करावें:**–आईची प्रकृति वाईट असली तर मुलांचें स्तनपान केव्हां केव्हां सहाव्या महिन्यांतच बंद करावें लागतें; व मुलाची प्रकृति अशक्त असली तर तें बाराव्या महिन्यापर्यंत देखील लांबणीवर टाकतात; पण हे दोन्ही नियम नव्हेत. हे अपवाद आहेत. नियम असा आहे कीं, मूल आणि आई ह्या दोहोंचीहि प्रकृति चांगली असली ह्मणजे, मुलांचें स्तनपान ९ व्या महिन्यांत किंवा फार तर १० व्या महिन्यांत बंद करावें. स्तनपान बंद करणें तें थंडीच्या दिवसांत करणें चांगलें. उन्हाळ्यांत करणें चांगलें नाहीं. कारण उन्हामुळें गाईचें दूध लवकर नासून निरुपयोगी होण्याचा संभव जास्त असतो. मुलाला पहिला दांत फुटल्या नंतर व दुसरा दांत फुटेपर्यंत, जे दिवस लागतात, त्या दिवसांत स्तनपान बंद करणें चांगलें आहे. मुलाचें दूध तोडून त्याला अन्न खाऊं घालणें हें काम एकाएकीं धाई घाईनें करतां उपयोगी नाहीं. त्याला नुसत्या अन्नावरच ठेवणें हेंहि प्रशस्त नाहीं. दूध आणि अन्न या दोहोंचें मिश्रण त्याच्या कोठ्यांत जाईल अशी तजवीज ठेविली पाहिजे आणि आपल्या इकडील हवामानाला अनुसरून दूध केव्हां पाजावें व त्याच्या पोटांत अन्नांश केव्हां घालावा हें प्रमाण खालील कोष्टकांत दाखविलेलें आहे.

| वेळ | पहिला आठवडा | दुसरा आठवडा | तिसरा आठवडा | चवथा आठवडा | पांचवा आठवडा |
|---|---|---|---|---|---|
| पहाटे ५ | स्तनपान | स्तनपान | स्तनपान | स्तनपान | स्तनपान |
| सकाळीं ८ | मिश्रण | मिश्रण | मिश्रण | मिश्रण | मिश्रण |
| ,, ११ | स्तनपान | स्तनपान | स्तनपान | ,, | ,, |
| दुपारी २ | ,, | ,, | मिश्रण | ,, | ,, |
| सं. का. ५ | ,, | ,, | स्तनपान | स्तनपान | ,, |
| रा. ८ वा. | ,, | मिश्रण | मिश्रण | मिश्रण | ,, |
| ,, ११ ,, | ,, | ,, | स्तनपान | ,, | ,, |

वरील कोष्टकांत मिश्रण द्यावयाचें म्हणून जें लिहिलें आहे, तें

खालील प्रमाणें तयार करावें व मूल जसजसें वाढत आईल तसतसें साईचें प्रमाण वाढवावें.

**अन्न रसाचें मिश्रण कसें करावें तें:**–एक भाग साय, दोन भाग दूध, आणि तीन भाग जवसाचें पाणी, असें एके ठिकाणीं मिसळून तें साधारण गोड होईपर्यंत त्यांत पिठीसाखर घालावी व तें मुलांस द्यावें.

याप्रमाणें मूल दोन वर्षांचें होईपर्यंत करावें व मूल दोन वर्षांचें झाल्यानंतर त्याला खालीं लिहिल्याप्रमाणें अन्न वेळच्यावेळीं चांगलें कुसकरून देत जावें. ह्मणजे सर्व दांत आल्या नंतर सकाळीं ७ वाजतां दुधांत भाकरी किंवा भात चांगला कुसकरून तो घालावा.

नंतर दहा वाजतां एक पावशेर दूध किंवा कोको तयार करून घालावा.

मग दोन प्रहरीं एक वाजतां बटाटे किंवा तसली एखादी शाक भाजी, थोडा भात व दूध असें द्यावें.

नंतर संध्याकाळीं ५ वाजतां थोडासा कोको, भाकरी व लोणी असें द्यावें. मग रात्रीं ९ वाजतां मऊ भात व साबूदाण्याची कांजी किंवा खीर करून द्यावी.

**मुलांसाठीं कृतिम अन्न:**—आई रोगी, अशक्त अगर इतर रीतीनें दूध पाजण्यास असमर्थ असेल तर कृत्रिम अन्न घालून मुलांचें संरक्षण करावें लागतें. तें अन्न ह्मणजे दूधच होय. एकंदर जनावरांचें दूध घेऊन त्याची जर परिक्षा केली तर आईच्या दुधासारखें जवळ जवळ गाढवीचें किंवा बकरीचें दूध असतें. पण सर्वांत सोईवार व सहज मिळण्यासारखें गाईचें दूध असल्या कारणानें

गाईच्या दुधांत थोडा फेरबदल करून देण्याचा प्रघात आहे. म्हणून तेंच देत जावें. तें दूध नुसतें देऊं नये. दूध व पाणी स्वतंत्र उकळून पाजतेवेळीं दोन भाग ऊन पाणी व एक भाग दूध या प्रमाणानें द्यावें. देतेवेळीं त्यांत साखर घालावी. हें दूध पाजावयाचें तें अर्थात बाटलींतून पाजिलें पाहिजे. ती बाटली कशी असावी वगैरे माहिती मागें ( भाग:—४० पहा ) सांगितलीच आहे. मात्र हें लक्षांत ठेवावें कीं, हें दूध मूल एक महिन्याचें होईपावेतों दोन दोन तासांच्या अंतरानें द्यावें. दुसऱ्या महिन्यात २½ तासांच्या अंतरानें द्यावें व तीन महिन्यापासून नऊ महिने होईपावेतों तीन तीन तासांच्या अंतरानें देत जावें.





# भाग पंचेचाळीसावा.

## लहान मुलांचे कपडे.



लहान मुलांच्या कपड्यांसंबंधानें आपण विचार करूं लागलों तर आपणांस असें दिसून येतें कीं, कांहीं लोकांचीं मुलें कपड्यांत अगदीं गुरफटलेलीं असतात व कांहीं मुलें अगदीं उघडीं हिंडतानांच आपण पहातों. शरीररक्षण करावें हा कपड्यांचा धर्म आहे खरा; पण ते कपडे अतीशय किंवा भलत्याच प्रकारचे घातल्यानें मुलाच्या शरीराचें रक्षण न होतां उलटा अपाय मात्र होतो. यासाठीं मुलांना कपडे करतांनां खालील तीन गोष्टींकडे अवश्य लक्ष्य दिलें पाहिजे:—

( १ ) त्यांच्यापासून शरीरांत ऊब उत्पन्न होईल कीं नाहीं ?

( २ ) ते घालण्यापासून शरीराच्या हालचालीस कांहीं अडथळा होण्याचा संभव आहे कीं काय ?

( ३ ) ते घातल्याच्या योगानें मुलाच्या शरीराला चोळवटून वगैरे कांहीं इजा होण्याचा संभव आहे कीं काय ?

या तीन मुख्य गोष्टी लक्ष्यांत ठेवून, केलेल्या कपड्यांपासून थंडीपासून मुलांचें निवारण होतें, त्यांच्या शरीरांत पुरेशी उष्णता रहाते व त्यांच्या शरीराला सर्व प्रकारें कपड्यांपासून सुखच होतें.

मुलांचे कपडे सैल असावे. असे असल्याच्या योगानें, शरीराच्या वाढीला व्यत्यय न येतां, कपडे घालतांना व काढतांना मुलांना इजा होत नाहीं.

मुलांचीं डोकीं घट्ट टोप्यांनीं जखडून टाकण्याची चाल फारच वाईट आहे. डोकें वास्तविक पहातां मोकळें ठेविलेलें फार चांगलें. पाय मात्र उघडे ठेवूं नयेत.

अंगाबरोबर घालण्याचा कपडा मलमलीचा असावा ह्मणजे मुलांच्या नाजुक त्वचेला इजा होत नाहीं व कपडे घालतांना तें कधींहि रडावयाचें नाहीं. मलमलीच्या कपड्यावर फ्लानेलचा किंवा गरम उबदार कपडा घालावा. बनात, सर्ज, रेशमी कापड व मखमाल वगैरे रंगीत व शोभेचे कपडे होईल तितकें करून घालूं नयेत.

मूल दोन वर्षांचें होऊन चालूं लागल्याबरोबर त्याला पायांत घालण्यासाठीं नरम कातड्याचे व लवचिक असे जोडे तयार करून द्यावे. अनवाणी चालण्यापासून पायांना फार इजा होते.

डोक्याला घालण्याची टोपी शक्य असेल तितकी हलकी व मऊ असावी. टोपीचा पाठीमागचा भाग जाड असून मऊ असावा कारण मूल पाठीवर पडण्याचा संभव फार असतो. अशा वेळीं या टोपीपासून डोक्याचें रक्षण होतें.

विलायती धर्तीचीं लोंकरीचीं झबलीं गळेबंद, विजारी आणि कंबरपट्टे व बूट यांनीं मुलें सजवून ठेवावयाची संवय जी आपल्या लोकांना लागली आहे तींत सुख व सोय यांचा भाग मुळींच नसून

नुसत्या दृष्टिसुखाचा भाग जास्त आहे, येवढेंच नव्हे, तर असल्या कपड्यांपासून मुलांच्या प्रकृतीवर व शरीरावर देखील वाईट परिणाम होतात. जाड व रंगीत कपड्यांमुळें शरीर उबून जाणें, घट्ट कंबरपट्यामुळें नाजुक शरीरावर अयोग्य दाब बसणें व पायांतील घट्ट बुटामुळें पायांची वाढ खुंटून त्यांनां भलताच आकार येणें, किंवा निदान बोटें वेडीं वांकडी होणें, हे वाईट परिणाम असल्या पोषाकापासून घडत असतात. यासाठीं आपल्या लोकांनीं त्या विलायती फंदांत न पडणें हाच सरळ मार्ग होय.





# भाग शेचाळिसावा.

## प्रवास.



पंचिक मनुष्याच्या सुखाला ज्या ज्या गोष्टी कारणीभूत आहेत, त्यांतीलच प्रवास ही एक गोष्ट आहे खरी; पण हेतु उत्तम असून कृति वाईट असल्यामुळे जसे एखाद्या गोष्टीचे परिणाम वाईट होतात तसाच प्रकार सध्याच्या काळीं आमच्या लोकांच्या प्रवासांचा झाला आहे. प्रवास करण्याच्या एकंदर तऱ्हा खालीं दिल्या आहेत:—

( १ ) चालणें, पळणे, पोहणें, बायसिकल अगर ट्रायसिकल वरून जाणे, म्हणजे आपली स्वतःची शक्ति खर्च करून अंतर तोडणें व एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाणें.

( २ ) घोडयावर किंवा गाडींत बसून जाणें. ह्मणजे चालण्याचे कामीं स्वतःची शक्ति खर्च करण्याचें कारण नाहीं अशा तऱ्हेनें प्रवास करणें.

( ३ ) आगगाडी किंवा आगबोट अथवा जहाजांत बसून जाणें; ह्मणजे स्वतःला मानसिक किंवा शारिरिक कोणतीहि शक्ति खर्च करण्याचें कारण न पडतां एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाणें.

आतां यापैकीं प्रवासाची कोणती रीत चांगली आणि कोणती वाईट याचा निर्णय सर्वत्र लागू पडणाऱ्या अशा एकाच नियमानें होणें शक्य नाहीं. प्रत्येक प्रकारच्या प्रवासांत फायदे आणि तोटे हे आहेतच

पण ते ते फायदे किंवा तोटे त्या प्रवासपद्धतीच्या अंगचे नसून ते आपण त्यांच्या अंगीं लावितों, ही प्रवास करणाराची चूक आहे.

थोडक्या वेळांत पुष्कळ काम करण्याची हौस आणि एक पैसा खर्चून चार पैसे खर्च करावे लागतील असें सुख पदरीं पाडून घेण्याची इच्छा असल्यामुळें आपल्या लोकांचे प्रवासांत फार हाल होत असतात. तसेंच आणखी दुःख होण्याचें असें एक कारण आहे कीं, आमचे रीतिरिवाज व संवयी बाराव्या शतकांतल्या ज्या होत्या त्याच कांहीं अंशीं कायम असून त्यांची सांगड आह्मीं विसाव्या शतकांतील सुधारणेच्या शिखरास पोंचलेल्या गोष्टींशीं घालण्याचा प्रयत्न करितों, यामुळेंहि आमचे प्रवासांत केव्हां केव्हां अत्यंत हाल होतात. सध्याचे दिवस असे आहेत कीं सर्वच गोष्टी नियमांनीं व कायद्यांनीं बांधलेल्या आहेत. त्यांच्या चक्रांत जर आमच्या पैकीं एखादा अनियमित व हलगर्जी माणूस सांपडला तर त्याचा चुराडा उडून जात असतो असा अनुभव प्रत्येकाला आहेच. ह्मणजे आयुष्याचा एकंदर क्रम केवळ यांत्रिक बनला असल्या कारणानें, आमच्या इच्छेच्या स्वाधीन असें कांहींच ठरलेलें नाहीं. आगीनगाडीची निघण्याची वेळ होऊन तिनें "शिटी" मारल्या बरोबर जरी आम्हीं गाढ झोंपेचें सुख अनुभवित पडलों असलों तरी आह्मांस झोंपेचा भंग करून खाडकन् जागें व्हावें लागतें व प्रकृतीच्या आणि मनाच्या अस्वस्थतेकडे बिलकुल लक्ष न देतां आगीन-गाडींत बसून पळत सुटावें लागतें!! प्रातर्विधीचा वेळ आगीनगाडीच्या मर्जीवर अवलंबून ठेवणें भाग पडतें; स्नानाच्या नांवानें तर शून्यच. आणि जेवणाचा अंतर्भाव "डाळें कुरमुऱ्यांत" करून घेणें भाग पडतें, अशा स्थितींत शारिरिक सुख तर मुळीं नसतेंच पण मानसिक सुखाचा देखील लेशहि नसतो. तेव्हां आमच्या प्रवास करण्याच्या पद्धतीपासून सुखाच्या ऐवजीं दुःखच जास्त प्राप्त होतें असें ह्मणण्यास नड काय आहे?

आमच्या संबंधानें प्रवास करण्याचा प्रसंग येतो, त्यावेळीं "वेळ हा पैसा आहे" या तत्त्वावर आपलें वर्तन अवलंबून ठेवणें चालेल, पण अशा प्रसंगीं "कमी" वेळ खर्च करून जो "जास्त" पैसा उद्योगी मनुष्याला मिळणार आहे, त्यांतील त्यानें आपल्या सुखाकडे "जास्त" खर्च कां करूं नये हें कळत नाहीं. आह्मांस तर असें वाटतें कीं, वास्तविक नड पैशाची नसून ती खरोखर इच्छेची मात्र असते; व यामुळें आमच्या बऱ्याच लोकांचा प्रवास कष्टमय होऊन त्यापासून त्यांच्या प्रकृतीवर कायमचे वाईट परिणाम होतात. व्यवस्थित प्रवासापासून प्रकृतीवर परिणाम चांगले होतात; पण आमच्या लोकांच्या प्रकृतीवर तसे चांगले परिणाम न होण्याचें कारण आमचा अव्यवस्थितपणा व कंजूषवृत्ति हें होय.

वैद्यशास्त्राच्या दृष्टीनें जो प्रवास उत्तम ठरेल, त्यापासून खरोखरच हित आहे. वर जे प्रवासाचे निरनिराळे प्रकार सांगितले आहेत, त्यांतील अमुक एक चांगला किंवा अमुक वाईट हें सार्वत्रिक रीतीनें सांगणें कठीण आहे खरें; पण येवढें मात्र खरें कीं, प्रवासाच्या ज्या पद्धतीवर आपला ताबा नसतो, ती पद्धत फार वाईट आहे व ती होतांहोईल तों टाळावी हें चांगलें. आपले शारीरिक व्यवहार व नित्यक्रम यांनां व्यत्यय न येतां जो प्रवास करतां येईल तो उत्तम. भुकेच्या वेळीं रोजच्या प्रमाणें जेवण मिळालें पाहिजे, झोंपेच्यावेळीं झोंप नेहमींप्रमाणें मिळाली पाहिजे व विश्रांतीचे वेळीं विश्रांति मिळाली पाहिजे; सारांश आपल्या रोजच्या आहारविहारांत कमतरता न पडतां जो प्रवास करतां येईल तो उत्तम. येवढेंच नव्हे, तर त्यापासून शरीरप्रकृति सुधारून मनासहि जास्त उल्हास उत्पन्न होत असतो, हें आमच्या लोकांनीं विसरतां कामा नये.